## प्रास्ताविक

१

'पाटरी शिडें' हा काणेकरानी गेल्या दोन तपात लिहिलेल्या १२० लघुनिबंधांचा संग्रह आहे. त्याच्यासारख्या एका अव्वल दर्जाच्या लघुनिबंध-काराचें या वैशिष्टयपूर्ण वाङ्मयप्रकारातले सर्व लेखन एका ग्रंथात समाविष्ट होत आहे, ही गोष्ट रसिक वाचक, डोळस अभ्यासक आणि विवेचक टीका-कार या सर्वांच्या दृष्टीनें मोठी आनंददायक आहे. विविध प्रकारची सुगंधी फुलें सुटीं सुटीं घेतली तरी त्याचा सुवास मनाला आल्हाद देतो हें खरें आहे; किंबहुना प्रत्येक प्रकारच्या फुलांत, इतकेंच नव्हे तर त्याच्या प्रत्येक पाकळींत, आकृतीचें सौंदर्य आणि रंगाचें वैचित्र्य आपल्याला जाणवते. तथापि, अशा विविध आणि विपुल फुलाचा गेंदेबाज हार गुंफला म्हणजे त्याना निराळीच शोभा प्राप्त होते. अशा हारामुळे त्या सर्व फुलात जसा एकसूत्रीपणा येतो, तसें त्यांना कलात्मक सौंदर्यहि लाभतें. अशा हारात भव्यता आणि रम्यता याच्या जोडीनें विशिष्टताहि प्रचीत होऊं लागते. तुळशीजवळ सांजवात म्हणून ठेवलेली पणती सुंदर दिसते हे तर खरेंच ! पण दिवाळीत गच्चीच्या कठड्या-वर, पुढल्या दाराच्या पायऱ्यावर आणि घराच्या खिडकीखिडकींत पणत्या चमकूं लागल्या म्हणजे प्रत्येक पणतीचें सौंदर्य द्विगुणित होतें हें कोण नाकारील ?

रसास्वाद व मूल्यमापन या दोन्हींच्या द्वारें ललित साहित्याचा आनंद वाचकाला लाभतो. 'पाटरी शिडें' या संग्रहामुळें काणेकराच्या लघुनिबंधाच्या

आवृत्तीत हीं दोन्ही कामें सुलभ झाली आहेत. हे सर्व लघुनिबंध लेखनकालाचा अनुक्रम लक्षात घेऊन छापले आहेत. साहजिकच, या दोन तपात लघुनिबंधकार काणेकराची शैली, विचार, व्यक्तित्व आणि आवडीनिवडी यात कोणते बदल झाले, त्याच्या लघुनिबंधाच्या विषयात फरक पडला आहे किंवा नाहीं, पंचविशी ते पन्नाशी या जीवनातल्या प्रवासात त्याना आलेल्या विविध अनुभवाची या निबंधात कोणत्या प्रकारे नोंद झाली आहे, कलेच्या दृष्टीनें त्यात चढउतार आहेत किंवा काय आणि असल्यास ते का निर्माण झाले आहेत, ललित वाङ्मयाचा एक नवा प्रकार या दृष्टीनें काणेकराच्या लघुनिबंधाच्या स्वरूपाविषयी काय कल्पना आहेत, इत्यादि गोष्टीवर या संग्रहाच्या वाचनानें प्रकाश पडेल. विजेच्या चमकाऱ्यासारखा नव्हे, तर शुक्ल पक्षातल्या चादण्यासारखा — प्रसंगीं प्रातःकाळच्या सौम्य सोनेरी उन्हासारखा — हा प्रकाश भासेल, यात मला शंका वाटत नाही.

२

१९१९ साली झालेले गडकरी व हरिभाऊ आपटे याचे मृत्यु ही निबंधमालेच्या युगाचा अस्त होत असल्याची पूर्वसूचनाच होती. त्या युगातले धुरंधर साहित्यिक कोल्हटकर व खाडिलकर हे १९२० नंतर अनेक वर्षे विद्यमान होते. पण या काळात त्याचे लेखन मंदावले. इतकेंच नव्हे, तर तें निस्तेज झालें. लेखनाचा एकतृतीयाश भाग प्रतिभेचा ( inspiration ) तर दोनतृतीयांश भाग व्यासंगाचा ( perspiration ), हें सूत्र प्रमाण मानून चालणारे केळकर त्याच्याइतके एकदम कोमेजले नाहीत. पण १९२५ नंतरच्या कालखंडावर त्याना आपला असा विशिष्ट ठसा उमटविता आला नाही. वामनराव जोशी एका बाजूनें मागील युगाचे — हरिभाऊ आपटे, श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, न. चिं. केळकर प्रभृतीचे — ऋणी होते; पण दुसऱ्या बाजूनें पाहिले तर नंतरच्या काळांतील डॉ. केतकराशीच त्याचे अधिक निकटचें नातें होतें.

१९२०–२५ नंतर माटे, चिं. वि. जोशी, फडके, न. र. फाटक, दिवाकर कृष्ण, अत्रे, सानेगुरुजी, शेजवलकर, माडखोलकर, विभावरी शिरूरकर, काणेकर, नाट्य-छटाकार दिवाकर, कुमार रघुवीर, यशवंत, माधव ज्यूलियन्, य. गो. जोशी, विनोबा, र. धों. कर्वे, अनिल, चोरघडे, कुसुमावती देशपांडे,

प्रभृति अनेक लेखक व कवि साहित्याच्या निरनिराळ्या क्षेत्रात कमीअधिक प्रमाणात चमकूं लागले. यापैकी दोन-तीनच लेखक निबंधमालेच्या अस्ताचला-कडे वळलेल्या युगाशी अधिक निगडित असे होते. ते म्हणजे माटे, फाटक व माडखोलकर. त्याच्यावरसुद्धा अंशतःच त्या युगाची छाया होती. कुणाच्या बाबतीत शैलीची, कुणाच्या बाबतीत विचारपद्धतीची. पण ती छायासुद्धा हळूहळू ओसरली. १९२५ नंतरचें ललित वाङ्मय मागच्या कालखंडातील वाङ्मयापेक्षा अनेक दृष्टींनी भिन्न झालें तें यामुळेंच.

केवळ भिन्नतेमुळे कुठलीहि गोष्ट श्रेष्ठ ठरत नाही, हें मला मान्य आहे. भोजनात काय किंवा जीवनात काय, रुचिपालट म्हणजे सरसता नव्हे! आणि नुसती सरसता म्हणजे सकसपणा नव्हे! अभिजात साहित्याच्या कसोटीला उतरणारा हरिभाऊंच्या तोडीचा कादंबरीकार किंवा गडकरी-खाडिलकरांशी तुल्यबल असा प्रभावी नाटककार १९२० नंतरच्या काळात झाला नाही हें सत्य आहे. पण १९२० पासून पुढल्या दोन तपात मराठी साहित्याचा जो विविध दिशानी विस्तार आणि विकास झाला तो केवळ अपरिहार्यच नव्हे, तर प्रगतीचा पोषक आणि आवश्यक होता हे अमान्य करणे अरसिकपणाचें ठरेल. १९२० पूर्वीचे लेखक ध्येयवादाने भारावलेले होते हें कुणीच नाकबूल करणार नाही. पण अनेक वेळा कलेचें कंबरडें मोडण्याइतका तो भार जड होत असे — किंबहुना आपल्या लेखनाकडे कला या दृष्टीने पाहण्याचें भानहि कित्येक कलावन्ताना राहत नसे — हेंहि या संदर्भात लक्षात ठेवलें पाहिजे. अव्वल दर्जाची विनोदी प्रतिभा लाभलेल्या कोल्हटकरानी सामाजिक सुधारणेच्या कल्पनात गुरफटून जाऊन निर्माण केलेली निर्जीव नाटकें, त्या त्या वेळच्या राजकीय समस्याचें व संघर्षाचें प्रतिबिंब नाटकात पडलेंच पाहिजे या ईर्ष्येनें खाडिलकरांनी आपल्या तेजस्वी कलेवर केलेलीं अनेक कृत्रिम आणि कुरूप कलमें, विद्युल्लतेची चमक असणारी कल्पकता लाभूनहि शिवरामपंत परांजप्याच्या निबंधाना एक पिढी उलटताच प्राप्त झालेला शिळेपणा, आणि हरिभाऊंसारख्या प्रतिभासंपन्न कादंबरीकाराच्या कृतींतहि अनेक स्थळी चिरंतनावर क्षणभंगुरानें केलेली मात — अशीं अनेक उदाहरणें हें सिद्ध करण्याकरितां देता येतील. निबंधमालेच्या शक्तिमान् युगाच्या या मर्यादा होत्या. सौंदर्यापेक्षां सामर्थ्याची आणि वास्तवापेक्षा आदर्शाची पूजा

या काळातल्या साहित्यिकानीं मोठ्या प्रमाणात केली. डोळ्यात तेल घालून राज्य करणाऱ्या परकीय राजसत्तेशीं आणि अंध परंपरागत अंध रूढीशी झुंज घेण्याच्या ईर्ष्येत असें घडणें स्वाभाविकच होतें. निबंधमालेच्या युगातील कलाकृतीत सौंदर्य प्रकट झालें तें काही अंशी अभावितपणें — वाहता वाहता नदीच्या प्रवाहाला शोभा लाभते ना ? तसें त्या सौंदर्याच्या बाह्य किंवा आतरिक स्वरूपाचा अथवा त्याच्या संवर्धनाचा सूक्ष्म विचार करायला बहुतेक लेखकाना फुरसद नव्हती. त्यानी लिहिलें तें उमाळ्यानें लिहिले; पोटतिडिकीने लिहिलें; ध्येय किंवा आदर्श पुढे ठेवून लिहिलें. त्यामुळें त्याच्या लेखनानें लोकाना रडविलें, हंसविलें, प्रक्षुब्ध केले. त्यानें लोकाना खुलविले, फुलविले, झुलविलें. पण कलेच्या दृष्टीनें ते वाङ्मय एका मर्यादेपलीकडे जाऊं शकलें नाही. तंत्र हा शब्दच त्या वेळी कुणाला माहीत नव्हता. १८७४ पासून १९२० पर्यंतच्या ललित वाङ्मयाचा भर तंत्रापेक्षा मंत्रावर होता. ती सोन्याच्या खाणीतली माती होती. तिच्यात जसे विपुल सुवर्णकण होते, तशी मातीहि भरपूर होती. असें होण्याचे कारण एकच होतें. या कालखंडातील लेखकांनी कलात्मक लिहिलें; पण ते कलेच्या जाणिवेनें लिहिलें नाही.

३

१९२५ नंतरच्या काळात ‘ कलेकरिता कला ’ या घोषणेला जें महत्त्व आलें तें या विशिष्ट पार्श्वभूमीमुळेंच. ती घोषणा ही एका दृष्टीनें नव्या कालखंडाची प्रतिक्रिया होती. वाङ्मयाचा किंबहुना जीवनाचा विकास अशा परस्परावर प्रतिक्रिया करीत जाणाऱ्या द्वंद्वानींच होत असतो. म्हणूनच १९२० पूर्वीच्या काळात साहित्यानें सामर्थ्याच्या उपासनेंत मग्न होऊन ज्या सौंदर्याकडे नकळत दुर्लक्ष केलें होते, त्याची पूजा नतरच्या पिढीनें सुरू केली. १९२५ ते १९३५ हें दशक त्या दृष्टीने अभ्यसनीय आहे. पूर्वीच्या सैल बाधणीच्या प्रसंगप्रधान गोष्टीला जें रेखीव व भावगर्भ रूप प्राप्त होऊं लागलें ते याच काळात. लघुनिबंध जन्माला येऊन हां हा म्हणता स्वच्छंदानें जे नाना प्रकारचे खेळ खेळूं लागला ते याच कालखंडात. काव्य, नाटक, कादंबरी, नाट्य-छटा, शब्द-चित्र, रूपक-कथा या सर्व क्षेत्रातलें या काळातलें साहित्य पाहिलें म्हणजे पूर्वीच्या कालखंडात उपेक्षिल्या गेलेल्या सौंदर्याच्या उपासनेकडे — पुढें या उपासनेत मंत्रापेक्षा तंत्राचेंच प्रस्थ अधिक माजलें असा आक्षेप घेतला जातो. तो अंशतः सत्यहि आहे — ललित वाङ्मय वेगानें वळलें होतें हें स्पष्ट दिसतें.

४

सौंदर्य स्वभावतःच वैचित्र्यप्रिय असतें. तें विविध अनुभूतीप्रमाणें आविष्काराचे नवनवीन मार्ग शोधीत असतें. लघुनिबंध हा मराठीला अपरिचित असा लेखनप्रकार १९२५ नंतरच्या पंधरा वर्षात रूढ — केवळ रूढच नव्हे, तर लोकप्रिय — झाला तो यामुळेच. लघुनिबंधाच्या या विकासाला काणेकरानीं फार मोठा हातभार लावला आहे. फडक्यानी १९२६ साली आपली पहिली गुज-गोष्ट लिहिली. काणेकरानी आपला पहिला लघुनिबंध १९३३ सालीं लिहिला. कालदृष्ट्या काणेकर थोडे उशिराच या क्षेत्रात आले. पण त्याचा लघुनिबंध हा फडक्याच्या गुजगोष्टीहून अनेक बाबतीत भिन्न आहे. फडक्यानी साध्यासुध्या आणि लहान लहान गोष्टींतून किंवा अनुभूतीतून सौंदर्याचे कण शोधून काढणें हा आपल्या गुजगोष्टीचा आत्मा मानला. साध्यासुध्या आणि लहान लहान गोष्टीतून किंवा अनुभूतीतून सत्याचे कण शोधून काढणे हा लघुनिबंधकार काणेकराचा विशेष आहे. त्यामुळें फडके-पद्धतीची गुजगोष्ट केवळ परिपुष्ट करण्याचें काम त्यानीं केलें नाही ! तर त्यानी फडक्याच्या लघुनिबंधाच्या प्रवाहात एक नवा जोमदार प्रवाह आणून सोडला. हे दोन्ही प्रवाह संपूर्णतः समरस झाले असें म्हणता येणार नाही; पण दोन्हीच्या चटकदारपणामुळें लघुनिबंधाकडे लोकाचें लक्ष चटकन् वेधलें. तीन पिढ्या गंभीर निबंधांवर निर्वाह करीत आलेल्या मराठी रसिकतेला हा नवा नाजुक पदार्थ मोठा रुचकर वाटला. जवळ-जवळ कथेइतक्या गोडीनें १९३०-४० मधल्या वाचकानी लघुनिबंध या नव्या वाङ्मयप्रकाराचा आस्वाद घेतला.

५

फडक्यांच्या गुजगोष्टीचा उगम जसा त्याच्या सौंदर्यनिष्ठ वृत्तींत होता, तसाच तो त्या काळच्या वाङ्मयविषयक परिस्थितीतहि होता. ‘रत्नाकर’ या तत्कालीन अग्रगण्य मासिकाचे फडके संपादक होते. त्या मासिकातून रसिकांना वाङ्मयाच्या नव्या नव्या परी सादर करणें त्याना आवश्यक होतें. त्याच वेळी इंग्रजीतला आत्मनिष्ठ प्रकारचा निबंध ( Personal Essay ) गार्डिनर, लिंड, ल्यूकास, चेस्टर्टन्, वगैरेंच्या वाङ्मयाच्या द्वारें आपल्याकडे परिचित होऊं लागला होता. तत्कालीन विद्यार्थ्यांकडून गार्डिनरचीं पुस्तकें अभ्यासिली जात होती. लिंड, चेस्टर्टन्,

चेलॉक् वगैरेंच्या निवडक लघुनिबंधाचें एक पुस्तक त्या वेळच्या इंटरच्या अभ्यासक्रमात पाहिलेले मला आठवते. हा नवा आत्मपर निबंध आकारानें लहान आणि वाचनाच्या दृष्टीने चटकदार होता. जुन्या निबंधापेक्षा तो स्वभावतःच अधिक रंजक व कथेशी जवळचें नाते असलेला असा होता. मराठी कथा त्या वेळी लोकप्रियतेच्या शिखराची वाट भरभर चालत होती. कथेच्या जोडीनें कथेइतकेंच रंजक असलेले अन्य प्रकारचे साहित्य वाचकाना देणे जरूर होते. अशा स्थितीत ' रत्नाकरा 'चे संपादक असलेले फडके आपल्या मासिकात ज्या गुजगोष्टी लिहूं लागले, त्याचे वळण वर उल्लेखिलेल्या इंग्रज लघुनिबंधकाराच्या लिखाणाशी मिळतेजुळतें होणें स्वाभाविक होतें. प्रेरणेपुरता परकीय वाङ्मयाचा उपयोग करून घेण्यात अनुचित असे काहीच नाही. किंबहुना विष्णुशास्त्री चिपळूणकरापासून गंगाधर गाडगीळापर्यंत अनेक लेखकाच्या वाङ्मयाचें थोडें सूक्ष्म सिंहावलोकन केलें, तर इंग्रजीच्या द्वारें परिचित होणाऱ्या ग्रंथकारानी आणि त्याच्या विविध प्रयोगानी त्यांना प्रेरणा दिली आहे, असेच दिसून येईल. मग ते ग्रंथकार मेकॉले, स्कॉट, डिकन्स, शेले, वर्ड्स्वर्थ, शेक्सपीअर आणि मार्क ट्वेन असोत, अथवा लिकॉक, गार्डिनर, झ्वाइग, ब्रेट्स, हेमिंग्वे, इलियट इत्यादि असोत. फडक्याच्या ' गुजगोष्टी 'तले ' पाऊस ', ' सहल ', ' एकान्तवास ', ' मित्र ' वगैरे पहिले पहिले विषय इंग्रजी लघुनिबंधकारानी हाताळलेले असेच आहेत, हे या दृष्टीनें अभ्यास करणाऱ्याच्या सहज लक्षात येईल.

६

काणेकरांच्या पहिल्या लघुनिबंधाचीं कांही शीर्षकें वाचली — ' बुद्धीला पटतें, पण मनाला कसेंसेंच वाटतें ', ' एकाला जें अमृत तें दुसऱ्याला विष ', ' आत्मप्रतीति — आंतले आवाज... आणि अंतःकरण प्रवृत्ति ', ' क्रिया आणि प्रतिक्रिया ', ' निःपक्षपाती मतें '— तरी फडक्याच्या गुजगोष्टीपेक्षा त्यांचा लघुनिबंध मूलतःच भिन्न आहे हें लक्षांत येतें. त्याच्या या शीर्षकाचें आवाहन विचाराला आहे; भावनेला किंवा कल्पनेला नाही. जीवनातल्या सूक्ष्म किंवा सुप्त सौंदर्याचा शोध करण्यात रमणारा हा लघुनिबंध नाही. व्यक्ति आणि समाज याच्यांत आढळणाऱ्या विविध विसंगतींवर त्याचा रोख आहे, हें वरील मथळ्यांवरूनच स्पष्ट दिसतें. किंबहुना, आपल्या सामाजिक आणि जीवनविषयक विचारांवर जें शेवाळें

माजलें आहे तें हंसत-खेळत दूर करून आतील स्वच्छ पाण्याचें वाचकाना दर्शन घडविणें हा लघुनिबंधकार काणेकराचा एक प्रमुख विशेष आहे. ‘पिकलीं पानें’, ‘शिंपले आणि मोती’, ‘तुटलेले तारे’, ‘उघड्या खिडक्या’ आणि ‘विजेची वेल’ ही आजपर्यंतच्या आपल्या लघुनिबंधसंग्रहाना त्यानीं दिलेली नावें पाहिली तरी त्याची ही वैचारिक भूमिका प्रचीत होते. अंधारात माणूस कांहीच पाहूं शकत नाहीं. त्या अंधारात प्रकाश पडला — मग तो तुट-णाऱ्या ताऱ्याचा अल्प प्रकाश असो, विजेचा क्षणभंगुर लखलखाट असो वा उघडलेल्या खिडकींतून येणारा संथ सूर्यप्रकाश असो — की वस्तूंच्या सत्य स्वरूपाची त्याला कल्पना येते ‘हे प्रभो, मला अंधाराकडून प्रकाशाकडे ने’, या वैदिक प्रार्थनेच्या मुळाशीमुद्धा हीच सत्याच्या उपासनेची इच्छा आहे. ‘शिंपले आणि मोती’ या नावातहि जीवनात जें जें अर्थपूर्ण आहे ते तें वेचून निराळे काढण्याची लेखकाची इच्छाच प्रतिबिंबित झाली आहे. ‘पिकलीं पानें’ हें जे काणेकरानीं आपल्या पहिल्यावहिल्या लघुनिबंध-संग्रहाला नाव दिलें, तेंहि याच विशिष्ट हेतूनें. पिकलीं पानें म्हणजे जीर्णशीर्ण झालेलीं पानें, शिशिरातल्या वाऱ्याच्या दंगामस्तीत टिकाव न लागल्यामुळें गळून पडणारी दुबळीं पानें, असें सामान्यतः मानले जातें. अतिशय म्हाताऱ्या झालेल्या माणसाच्या बाबतींत हा शब्दप्रयोग वापरला जातो तो याच दृष्टीनें. पण काणेकर पिकलेल्या पानाकडे अगदी निराळ्या दृष्टीने पाहतात. पिकलेल्या पानात त्याना निराळ्या प्रकारचें सौंदर्य — परिपक्व विचाराचे सौंदर्य — दिसतें. आपल्या या पहिल्या लघुनिबंध संग्रहाला प्रास्ताविक म्हणून जें एक गद्यकाव्यासारखें निवेदन त्यानीं जोडले आहे त्यातील पुढील वर्णन महत्त्वाचें आहे — ‘सकाळ होई. ताम्बूस गालाची, भिरभिरत्या डोळ्याचीं आणि भुरभुरणाऱ्या केंसाचीं कितीतरी गुटगुटीत सतेज बालकें तेथें त्या नवीन फोफावलेल्या वृक्षापाशीं खेळायला येत, आणि सकाळच्या पिवळसर कोवळ्या उन्हांत सोन्यासारखी झळझळणारीं त्याची ती जर्द पिवळी पानें पाहून ‘पिकली पानें’ ‘पिकलीं पानें’ म्हणून एकच कोलाहल करीत. कुणी त्यातलें एकादें पान उचलून आपल्या भुरभुरणाऱ्या केशकलापात खोची, तर कुणी त्या पानाच्या माळा करून त्या आपल्या गळ्यात घाली. अशा रीतीनें आनंदानें ते चिमणे जीव त्या नवीनच फोफावलेल्या वृक्षाभोंवतीं उडत बागडत.’

७

काणेकराच्या लघुनिबंधाचा उगम सौंदर्यचिंतनात न होता तत्त्वचिंतनात झाला याला अनेक कारणें आहेत. ते लघुनिबंध लिहूं लागले तेव्हा (१९३३) 'चादराती 'त हृदयंगम रीतीनें प्रकट झालेला त्याच्यातला कवि मागें पडून त्याची जागा त्याच्यातल्या विचारवंतानें घेतली होती. १९२७ साली काणेकर पदवीधर झाले. कॉलेजात आणि कॉलेजाबाहेरच्या साहित्यसृष्टीत शॉ-इब्सेन, मोपासा-चेकॉव्ह, हार्डी-टॉल्स्टॉय इत्यादि लेखकाचा त्या वेळीं अधिक बोलबाला होता. त्याच्या ग्रंथाचा अभ्यासहि केला जात होता. हे सर्व लेखक जसे थोर कलाकार होते, तसे ते आपापल्यापरी साहित्यसृष्टींतले बंडखोरहि होते. त्याच्यापैकी अनेकाच्या कलाकृतींत मूर्तिभंजनाची प्रेरणा देण्याचें सामर्थ्य होतें. मराठी साहित्यावर त्याचा हळूहळू परिणाम होत होता. या वाङ्मयीन स्थित्यंतराच्या जोडीनें राजकीय व सामाजिक क्षेत्रातहि नव्या चळवळी, नवी तत्त्वज्ञानें व त्यामुळें निर्माण होणारा नवा प्रक्षोभ पदोपदी प्रचीत होत होता. असहकारितेपासून सुरू झालेली गाधीजीची स्वातंत्र्याची चळवळ कायदेभंगाकडे धाव घेत होती. एकीकडे गाधीवाद व गाधीजीचे राजकारण आणि समाजकारण याची वाढ होत असतानाच दुसरीकडे रशियातील क्रातीपासून स्फूर्ति घेतलेला समाजवाद जनमनात — विशेषतः कामगाराची विपुल वस्ती असलेल्या मुंबईसारख्या शहरातील मध्यम वर्गीय तरुणाच्या मनात — मूळ धरूं लागला होता. कम्युनिस्ट पुढाऱ्यातील प्रसिद्ध मीरत — खटला याच वेळी गाजला (१९२८).

विशिष्ट वयात ध्येयवादाचें आकर्षण मोठें प्रबळ असतें. यौवनातल्या प्रीती-इतकेंच किंबहुना तिच्याहूनहि अधिक तें उत्कट होऊं शकतें. साहजिकच १९३० च्या आगेमागें पचविशीच्या घरात असलेले काणेकर कामगार — चळवळीकडे व तिच्या पाठीमागे असलेल्या तत्त्वज्ञानाकडे आकृष्ट झाले. त्याच्या पहिल्या अनेक लघुनिबंधात सामाजिक किंवा आर्थिक विषमता हा विषय पुनःपुन्हा डोकावतो. त्याचें कारण काणेकरावर झालेल्या या विविध संस्कारात आहे. त्याचें व्यक्तित्व एका बाजूनें काव्यात्म होतेंच. तें या संस्कारामुळें दुसऱ्या बाजूनें चिंतनशील झालें. विविध वादाचा ( isms ), विचारप्रणालीचा आणि व्यक्तिमनातल्या व समाजजीवनातल्या चित्रविचित्र विसंगतीचा ते परामर्श घेऊं लागले.

८

काणेकराच्या मनाची वैचारिक बैठक अशा रीतीनें तयार होत असतानाच ते लघुनिबंधकार झाले. ते लघुनिबंधकार झाले म्हणण्यापेक्षा त्याना लघुनिबंधकार होणें भाग पडलें.

ते लघुनिबंध कसे लिहूं लागले हा इतिहास मोठा मनोरंजक आहे. वाङ्मयाच्या निर्मितीभोवती नेहमीच एक प्रकारचें गूढ वलय तरंगत असतें. स्फूर्ति, लहर ( mood ), प्रतिमा, देवाचें देणें, अंगात आल्यासारखें करीत मध्यरात्री उठणारा कवि, लेखकाचे तऱ्हेतऱ्हेचे छंद आणि व्यसनें, इत्यादिकांविषयी सामान्य मनुष्यानें इतक्या खऱ्या खोट्या गोष्टी ऐकलेल्या असतात की मागून सोय नाहीं. या गोष्टीत अनेक परस्परविरोधी विधाने असली, तरी सर्वांचा सारांश एकच असतो — तो म्हणजे लेखकाची लहर लागल्याशिवाय तो लिहूं शकत नाहीं — निदान चांगले लिहूं शकत नाही — हा होय.

पण काणेकराच्या लघुनिबंधाच्या बाबतीत असें काहीच घडलें नाही. पर्वतातून झरा खळखळत बाहेर आला नाही. उलट पर्वत म्हणत होता, ‘ माझ्यापाशी झराबिरा काही नाही; पाण्याचा थेंबसुद्धा नाहीं. उगीच मला त्रास देऊं नका ! ’ पण साप्ताहिक ‘ संजीवनी ’चे संपादक श्री. प्रभाकरपंत कोल्हटकर यानी काणेकराना हुकूम सोडला, ‘ तुमच्यासाठी शेवटच्या कव्हराचं आतलं एक पान मीं राखून ठेवलंय्. त्यात दर आठवड्याला एक पानभर मजकूर तुम्ही दिलाच पाहिजे. काय वाटेल ते लिहा. मात्र एका पानापेक्षा अधिक मजकूर मुळींच चालणार नाही; कारण कव्हराच्या बाहेरच्या बाजूला जाहिराती असतात. तिथं वाढलेला मजकूर देतां येणार नाही. ’

काणेकरानी ‘ मारून मुटकून वैद्यबुवा ’ प्रहसन वाचले होतें. मोलियरच्या या प्रहसनात धाकदपटशामुळें वैद्यकीशी औषधापुरतासुद्धा संबंध नसलेला मनुष्य वैद्यराज कसा बनतो, हें त्याना ठाऊक होतें. पण लेखक अशा रीतीनें बनवला जाईल अशी त्याची मुळीच कल्पना नव्हती. आणि त्यातूनहि हा प्रसंग स्वतःवर येईल हें तर त्याना स्वप्नातहि खरें वाटलें नसतें ! पण तसा प्रसंग ओढवला खरा ! कांही तरी लिहिणें जरूर होतें. ते विचारात पडले. या आपत्तींतून सुटण्याची धडपड करता करतां आपण लघुनिबंधकार कसे झालों

याचें वर्णन करताना ते म्हणतात, 'काय लिहावं म्हणून कित्येक दिवस मी डोकं खाजवीत होतो. वाचनालयात मी इंग्रजी साप्ताहिकं वाचीत असें. त्या-पैकी लंडनच्या एका साप्ताहिकात प्रख्यात विनोदी लेखक जी. के. चेस्टर्टन् दर आठवड्याला एक पान नियमानं लिहीत असे. त्या पानाला दुसरं काही नाव नव्हतं. 'चेस्टर्टन्स पेज' हेच त्याचं नाव! त्या आठवड्यात जें काही सुचेल त्यावर चेस्टर्टन् हवे ते लिही. आपणहि 'संजीवनी' च्या एका पानावर त्या त्या आठवड्यात जे काही सुचेल तें लिहून टाकावं, असं मी ठरवलं.'

काणेकराचें हें आत्मकथन वाचून त्याचे लघुनिबंधलेखन हुकमेहुकूम झाले असें वाटण्याचा संभव आहे. काणेकराना जे सुचले तें ते लिहीत गेले व हा हा म्हणता ते चांगले लघुनिबंधकार झाले, ही गोष्ट होतकरू लेखकाना मोठी आशादायक वाटेल यात शंका नाही. पण बाह्यतः ती दिसते तशी नाही. कुठल्याहि शिखराकडे जाण्याला — मग तें शिखर कलेचें असो, भक्तीचे असो अथवा कीर्तीचें असो — असे सोपे, जवळचे आणि फुलांच्या पायघड्या घातलेले मार्ग नसतात! तें शिखर गाठणारातला प्रत्येकजण आपापल्या पाऊलवाटेनें, खडे-काटे तुडवीत, खडकाळ डोंगर चढत आणि पाय रक्तबंबाळ करून घेत आलेला असतो.

'चांदरातीं'तली यौवनसुलभ रम्यतेची मोहिनी डोळ्यावरून दूर होताच काणेकराना भोंवतालच्या उग्र आणि भीषण अशा वास्तवाचें दर्शन झालें. त्या वास्तवाकडे टक लावून पाहण्याचें सामर्थ्य त्याच्या वाङ्मयीन व्यक्तित्वात होतें. त्यामुळें प्रणयाच्या मधुर आभासमयतेचा, अधांतरीं वावरणाऱ्या कल्पनारम्यतेचा, नव्या स्वप्नाळु ध्येयवादाचा, किंवा त्याच्याशी जवळचें नातें असलेल्या जुन्या-पुराण्या आध्यात्मिकतेचा मार्ग त्याना रुचणें शक्य नव्हतें. असला कोणताहि मार्ग त्याच्या मूळच्या वृत्तीशी व नंतरच्या मनोविकासाशीं जुळणारा नव्हता. ते धिटाईनें उग्र वास्तवाच्या अंतरंगात शिरले. तिथें त्याना जें दिसलें त्यामुळें त्यांचें मन अस्वस्थ आणि प्रक्षुब्ध झालें. हा प्रक्षोभच लघुनिबंधकार या नात्यानें साहित्याच्या रंगभूमीवर झालेल्या त्याच्या यशस्वी प्रवेशाला उपकारक ठरला. कलावन्ताच्या मनातील कोणत्याहि जाणिवेचा किंवा संवेदनेचा प्रकर्षानें होणारा आविष्कार — मग तो प्रक्षोभ असो, प्रफुल्लितपणा असो, प्रसन्नता असो, प्रशान्तपणा असो — हाच कलाकृतीचा पाळणा होय, हा अनुभव त्यांनाहि आला.

हा प्रक्षोभ केवळ काव्याच्या द्वारानें व्यक्त करणें काणेकराना कठीण होतें. त्यासाठीं त्याना नवें माध्यम शोधणें प्राप्त होतें. प्रभाकरपंत कोल्हटकरानीं 'संजीवनी 'करिता लिहिण्याची त्याच्यावर सक्ति केली; आणि त्याना हें नवें माध्यम मिळालें. काणेकराच्या प्रतिभेंत तें पेलण्याची शक्ति होती. ती नसती तर ही सक्ति निरर्थक ठरली असती. 'Rain' ही आपली गाजलेली कथा कशी लिहिली गेली हें सागताना सॉमरसेट मॉमनें अशीच एका संपादकाची सक्ति वर्णन केली आहे. या सक्तीचा अर्थ इतकाच कीं विहिरीत पाणी पुष्कळ असतें; पण तिला मात्र त्याचा पत्ता नसतो ! कुणीं तरी आत पोहरा सोडला म्हणजे आपोआप तो पत्ता लागतो.

९

फडक्याच्या 'गुजगोष्टीं 'पेक्षा काणेकराचे लघुनिबंध अंतर्बाह्य निराळे का झाले, चिंतनशीलता किंवा विचारप्रेरकता हा त्या लघुनिबंधाचा स्थायी भाव कसा बनला, स्वतःच्या इवल्या इवल्या सुखदुःखाच्या अनुभूतीतून आपलें मन हंसत खेळत उघड करण्याऐवजी लघुनिबंधकार काणेकर विविध आणि विशाल सामाजिक सुखदुःखाचा विचार का करूं लागले, याची आणखी अनेक कारणें सागता येतील. काणेकराचा जन्म मुंबईत झाला ( १९०५ ). ते मुंबईतच वाढले. केवळ महाराष्ट्राच्या राजकारणाच्या किंवा मराठी वाङ्मयाच्या दृष्टीनेंच नव्हे तर अखिल भारतीय जीवनाच्या दृष्टीनेंहि महत्त्वाची असलेली १९१५ ते १९२१ हीं वर्षें (लो. टिळकांची मंडालेहून सुटका, 'गीतारहस्या 'चें प्रकाशन, नामदार गोखल्यांचा मृत्यु, गोखल्याना गुरु मानणाऱ्या गाधींचें आफ्रिकेंतून हिंदुस्थानात झालेलें आगमन, लो. टिळकाची होमरूलची चळवळ, गाधीजींनीं चंपारण्यातल्या मजुरासाठी केलेला नव्या प्रकारचा लढा, रौलट ॲक्ट, जालियन-वाला बाग, लो. टिळकाचा मृत्यु, गाधीजीची असहकारितेची चळवळ, या सर्व गोष्टी जशा या अर्ध तपात घडल्या, त्याप्रमाणें गडकरी व बालकवि याच्या प्रतिभेचा विलास प्रकट झाला तो याच काळात; मासिक मनो-रंजनाच्या जोडीनें 'उद्यान ', 'नवयुग ', 'अरविंद ' वगैरे ललित वाङ्मयाला वाहिलेलीं नवनवीं मासिकें निघाली तीं याच कालखंडात; आणि बालकवि, गडकरी, ना. वा. टिळक व हरिभाऊ आपटे याचे मृत्यु झाले तेहि याच सहा

वर्षांत. ) म्हणजे काणेकरांचे विद्यार्थिदशेंतले अत्यंत संस्कारक्षम असें वय. या सर्व राजकीय आणि वाङ्मयीन घडामोडींचा त्याच्या कुमार-मनावर निश्चित परिणाम झाला असला पाहिजे.

त्याच्या भोवतालची मुंबईहि याच काळात झरझर बदलूं लागली होती. एक विशाल आणि सुंदर नगरी किंवा एक फार मोठें व्यापारी शहर हें तिचें स्वरूप मागें पडून विसाव्या शतकातल्या औद्योगिक संस्कृतीचे भारतातलें एक प्रमुख केंद्र हे नवें स्वरूप तिला हळूहळू प्राप्त होत होते. युरोपातलें पहिलें महायुद्ध याच काळात सुरू होऊन चार वर्षांनी समाप्त झालें. त्याच्या झळा भारताला फारशा लागल्या नाहीत हें खरें; पण त्या महायुद्धाच्या रूपानें मानवी जीवन झाकळून टाकूं लागलेल्या नव्या, भयानक, काळ्याकुट्ट ढगाची छाया जगातील अनेक विचारवन्ताना जाणवूं लागली. काणेकराच्या बौद्धिक आणि भावनात्मक विकासाचा आलेख काढताना या कालखंडाचा अवश्य विचार केला पाहिजे, तो याचसाठी. त्याच्या मनाची जी पुरोगामी – प्रसंगी बंडखोर – बैठक तयार झाली व विविध राजकीय आणि सामाजिक घडामोडींत सहजतेनें रस घेण्याची जी शक्ति त्याच्या ठिकाणी सतत विकसित होत गेली, त्याना या काळाचे – विशेषतः या काळातल्या मुंबईचे – संस्कार पुष्कळ अंशी कारणीभूत झाले असावेत. समाजवादी तत्त्वज्ञान, कामगार चळवळ आणि वृत्तपत्राचें संपादन ( १९३५ चित्रा, १९३९ आशा ) या सर्वांकडे पुढें काणेकर हळूहळू आकृष्ट झाले ते पंचविशीपूर्वीच्या दशकांतल्या या विविध संस्कारामुळेंच.

१०

काणेकराच्या लेखनांत कलात्मकता व सामाजिकता यांचा जो आकर्षक संगम झाला आहे त्याची पार्श्वभूमि विशद व्हावी म्हणून हें विवेचन मी केलें आहे. कार्तिकेयाप्रमाणें कलाकृतीलाहि अनेक माता असतात. कालगति ही त्यांतील एक होय. पण केवळ विशिष्ट कालखंडामुळें आणि त्यांतील सामाजिक संस्कारामुळें कुणीहि अव्वल दर्जाचा साहित्यिक होऊं शकत नाही. कलापूर्ण ललित-लेखनाला तर नुसत्या तळमळीची किंवा केवळ वैचारिकतेची शिदोरी नेहमीच अपुरी पडते. लघुनिबंधाच्या क्षेत्रांत काणेकर फक्त समाजवादी विचारसरणी किंवा आर्थिक विषमतेविषयींची चीड घेऊन उतरले असते, तर त्यांना आज जें

यश मिळालें आहे तें कधीच लाभलें नसतें. विचारांना चालना देणारे छोटे निबंध इतरानीं त्याच्यापूर्वी लिहिले होते. काणेकर लघुनिबंध लिहूं लागल्यावरहि तसे पुष्कळ निबंध लिहिले गेले. ' गच्चीवरील गप्पा ' हें ना. गो. चापेकरांचें पुस्तक व ' मधुकर ' हें विनोबाजी भाव्यांचें पुस्तक हीं दोन्ही या दृष्टीनें उल्लेखनीय आहेत. चापेकराचे विषय घरगुती आहेत; पण त्याची भूमिका उपदेशकाची आहे. विनोबाचे विषय सामाजिक आहेत; पण त्यांची भूमिकाहि उपदेशकाचीच आहे. उलट काणेकराचे अनेक विषय सामाजिक असूनहि त्याची भूमिका कलावन्ताची आहे. ही भूमिका त्यानी मुद्दाम धारण केली आहे असें मुळींच नाहीं. तसें असतें तर त्याच्या लघुनिबंधात कृत्रिमता डोकावली असती. ते निर्जीव वाटले असते. पण ते तसे नाहींत. ते जोमदार, जिवंत निबंध आहेत.

## ११

काणेकराच्या लघुनिबंधाचें वैशिष्ट्य यातच आहे. ' कल्पनावाद ( romanticism ) म्हणजे सौंदर्यात सत्य पाहणें, आणि वास्तववाद किंवा जीवनवाद ( realism ) म्हणजे सत्यात सौंदर्य पाहणें ' असें त्यानीच एके ठिकाणीं म्हटलें आहे. कोल्हटकरासाठीं ' संजीवनी ' साप्ताहिकाच्या एका पानात बरोबर बसतील असे लेख जेव्हा त्यांनीं लिहायला सुरुवात केली, तेव्हा त्यानी कल्पनावाद सोडून वास्तववादाचा आश्रय केला. सौंदर्य म्हणजेच सत्य असें मानून अनेक कलावंत गंधर्वनगरींत विहार करीत असतात. काणेकर अशा प्रकारच्या सौंदर्याचे पूजक नाहींत. सत्याचा शोध करता करता ( हा शोधच त्यांना अखंड दोन तपें लघुनिबंधाचे विषय पुरवीत आला आहे. त्यांचें सर्व तत्त्वचिंतन या शोधांतूनच निर्माण झालें आहे. ) जे जे सौंदर्यकण त्यांना आढळले ते ते त्यानीं कसोशीनें टिपले. आपल्या लघुनिबंधाचें एक विशिष्ट शिल्प त्यानीं कल्पिलें. आशय व आविष्कार याच्यात कोणत्याहि प्रकारचा विसंवाद निर्माण होऊं नये अशी दक्षता त्यानीं घेतली. १९२० नंतरच्या वाङ्मयात सौंदर्याची जाणीव – केवळ कल्पनेच्या, भावनेच्या किंवा विचाराच्या सौंदर्याची ओझरती जाणीव नव्हे ! ती जाणीव परांजपे, केळकर व अच्युतराव कोल्हटकर इत्यादि निबंधकारांच्या ठिकाणीं निःसंशय होती – म्हणजे एक कलाकृति या दृष्टीनें आपल्या निर्मितीकडे पाहण्याची दृष्टि वाढीला लागली, असें जें मीं प्रारंभीं म्हटलें आहे त्याचें कारण हेंच आहे.

काणेकरानीं सत्याचें शोधन आणि दर्शन हेंच आपल्या लघुनिबंधाचें मुख्य साध्य मानलें हें खरें. पण तें शोधन आनंददायक व्हावें, तें दर्शन रमणीय वाटावें, म्हणून हाताशी असलेल्या सर्व सौंदर्यसाधनाचा त्यानी मोठ्या कुशलतेनें उपयोग केला. प्रत्येक निबंधात त्यांना जें काही सागायचें असतें त्याच्यावर एकाद्या कवितेंतल्या मध्यवर्ति कल्पनेप्रमाणें ते आपली दृष्टि एकाग्र करतात. सावजावर अचूक नेम धरणाऱ्या शिकाऱ्याची आठवण व्हावी असा डौल काणेकराच्या सर्व चागल्या लघुनिबंधात दिसतो. ती ऐट वाचकाला मोहिनी घालते. हा डौल त्याच्या या एकाग्रतेमुळेंच निर्माण झाला आहे. भूमितीतील एकादा सिद्धान्त माडावा तशी त्याची लघुनिबंधाची रचना असते. आखीव, रेखीव आणि म्हणूनच परिणामकारक. कलावन्त या नात्यानें संयम हा एक मोठा गुण त्याच्या ठिकाणीं आहे. काव्यापासून प्रवासवर्णनापर्यंत काणेकराचें कोणतेंहि लिखाण पाहावें. या संयमामुळेंच तें बाधेसूद झालें आहे, असें दिसून येईल. ' पांढरी शिडें ' वाचताना अत्यंत आधुनिक पद्धतीच्या सुंदर उद्यानाची आठवण होते, ती त्याच्या या गुणविशेषामुळेंच. या बागेंतली हिरवळ जणू काही नुकतीच कापली आहे, लहान-मोठ्या झाडात आकृतींचा नयनमनोहर सुसंवाद साधला आहे, ठिकठिकाणीं फुललेल्या विविध पुष्पात रंगाची मनोज्ञ संगति आहे, जिकडे पाहावें तिकडे नीटनेटकेपणाचें आणि निर्मळपणाचें राज्य आहे. ' दोन मेणबत्त्या ! ', ' निःपक्षपाती मतें ', ' दोनपदरी गोफ ! ', ' देवदारु आणि चक्रवाक् ' यापैकीं कुठलाहि निबंध सहज चाळून पाहावा ! त्याच्या लघुनिबंधाच्या सुंदर शिल्पाची — आकृति आणि माडणी याची — आकर्षकता मनात भरल्या-वाचून राहणार नाही.

## १२

पण केवळ सुंदर बाह्यरूपामुळें ( form ) कुठलीहि ललित कृति श्रेष्ठ दर्जाची ठरत नाहीं. तिचें अंतरंगहि जिवंत आणि त्या रूपाशीं सुसंगत असलें पाहिजे. किंबहुना तिचें बाह्य सौंदर्य हा तिच्या आत्म्याचा विकास असला पाहिजे. काणेकरानीं लघुनिबंध लिहायला सुरुवात केली तेव्हां त्याचें मन भोंवतालच्या जीवनातील अनेक विसंगतींच्या दर्शनानें विद्ध आणि क्षुब्ध झालें होतें. सांगण्यासारखें त्याच्यापाशी पुष्कळच होतें. त्यांना जें सांगावयाचें होतें तें थोडें-

फार नवेंहि होतें. तें केवळ चिरपरिचित विचाराचें चर्वितचर्वण नव्हतें. निबंध-मालेच्या युगात ( १८७४–१९२० ) राजकीय व सामाजिक या दोन्ही बाब-तीत बंडखोर विचार प्रकट करणारे आणि विविध सुधारणाचा हिरिरीनें पुरस्कार करणारे अनेक थोर लेखक झाले होते. पण त्याच्या विचारकक्षा मध्यम वर्गापुरत्याच मर्यादित राहिल्या होत्या. सहानुभूतीची बैठक, सुधारणेविषयींचा जिव्हाळा, सूक्ष्म निरीक्षणाची शक्ति आणि ललितलेखकाला आवश्यक असलेली प्रतिभा या बाबतीत हरिभाऊ आपट्यापेक्षा अधिक श्रेष्ठ साहित्यिक त्या कालखंडात झाला नाही. पण हरिभाऊंच्या सामाजिक कादंबऱ्यांतून अनेक दुःखें समरसतेनें आणि वास्तवतेनें चित्रित झाली असली, तरी ती मुख्यतः तत्कालीन मध्यम वर्गाची – त्यातल्या त्यात अगणित अंध रूढींच्या शृंखलांनी अगतिक झालेल्या त्या वर्गातल्या स्त्रीची – दुःखें होती. ऐतिहासिक कादंबऱ्यात जसा त्याच्या प्रतिभेचा पल्लेदारपणा प्रत्ययाला येतो, तसा तो त्याच्या सामाजिक कादंबऱ्यात जाणवत नाही. याचे कारण त्याच्या सामाजिक कादंबरीला मध्यम वर्गाच्या समस्यांच्या सीमा पडल्या होत्या. त्या काळातल्या मध्यम वर्गाला सामाजिक विषमतेच्या मानाने आर्थिक विषमता उपेक्षणीय वाटणे स्वाभाविक होतें. एकाद्या ' यशवंत खऱ्या 'च्या चित्रणातच ती तीव्रतेनें प्रचीत होई. पण तो वार लावून जेवणारा आणि श्रीमंताच्या घरी झालेल्या अपमानाने चिडलेला यशवंतहि त्या काळात शिकून सवरून लवकरच ' यशवंतराव ' म्हणून मानानें मिरवूं शकत होता! ' सदाशिव पेठी ' असा हरिभाऊंच्या सामाजिक कादंबरीचा डॉ. केतकरानी जो अधिक्षेप केला, तो त्याच्या कलागुणाच्या दृष्टीनें नव्हे, तर जीवन-चित्रणाच्या मर्यादाच्या दृष्टीनें.

१९२५ नंतर मध्यम वर्गाभोंवतालच्या सुरक्षितपणाच्या भिंती हळूहळू ढांसळूं लागल्या. पण त्या काळातहि मध्यम वर्गाला आर्थिक विषमतेचीं शल्यें गेल्या दहा-बारा वर्षातल्याइतकीं तीव्रतेनें जाणवत नसल्यामुळें तिचा आविष्कार फार थोड्या लेखकांच्या लिखाणातून झाला.

अशा हाताच्या बोटांवर मोजतां येण्याजोग्या लेखकात काणेकरांचें स्थान मानाचें आहे. आर्थिक विषमतेचें नवें दुःख त्यांनीं साहित्याच्या परिसरात मोठ्या पोटतिडिकीनें आणलें. आपल्या लघुनिबंधांच्या द्वारें तें वेशीवर टांगलें.

समाजवादी विचारसरणीचीं बीजें जनमनात रुजायला कुणी तरी त्याची नागरणी करणें अत्यंत आवश्यक होतें. तें काम काणेकरानी मोठ्या कौशल्यानें आणि कसोशीनें केलें. 'पाढरीं शिर्डें'मधील 'छोटे चोर आणि मोटे चोर' हा एकच लघुनिबंध वाचला तरी काणेकराच्या वैचारिक बैठकीचा हा ओजस्वी विशेष लक्षात येईल.

## १३

'पिकली पानें' 'संजीवनी'त प्रसिद्ध होऊं लागली तेव्हा या जळजळीत व जिव्हाळ्यानें भरलेल्या विचारसरणीचें — समतेच्या सर्वस्पर्शी समर्थनाचें — आकर्षण अखिल महाराष्ट्राला वाटूं लागलें. मात्र जिथे स्वतः काणेकरच या लेखाना 'लघुलेख' म्हणत होते, तिथें लघुनिबंध (Personal Essay) या विशिष्ट वाङ्‌मयप्रकारात या लेखाची गणना होईल कीं नाही, आणि तशी ती झाल्यास कला या नात्यानें त्याचे मूल्य काय, हे प्रश्न कुणी उपस्थित केले नाहीत यात नवल कसले? काणेकर याविषयीच्या आत्मकथनात म्हणतात, 'लिंड, गार्डिनर वगैरेंचे लघुनिबंध मी वाचलेले होते. पण त्याच्यासारखे लघुनिबंध लिहावे या ईर्ष्येनें मीं हे लेख लिहिले नव्हते...'पिकली पानें' या नावानें हे लेख पुस्तकरूपानें प्रसिद्ध करताना वृत्तपत्रातल्या जाहिरातीत या पुस्तकाचें वर्णन काय द्यावे, म्हणून प्रकाशकानीं मला विचारलें. तेव्हा 'लघु-निबंध' हा शब्दहि मला सुचला नाही. "या पुस्तकाचं वर्णन लघुलेखसंग्रह असं करा", असं त्याना सांगितल्याचं मला आठवतं. पुढें परीक्षणकर्त्यांनी आणि टीकाकारानी या लेखाना लघुनिबंध म्हटलें. तेव्हा मीहि त्याना लघुनिबंध म्हणायला लागलों.'

याचा अर्थ उघड आहे. इंग्रजीतला लघुनिबंध हा वाङ्‌मयप्रकार किंवा त्याचें तंत्र डोळ्यापुढें ठेवून काणेकरानी हें लेखन केलें नाही. त्यानीं सुंदर मंदिर बांधलें. पण त्याचा नकाशा (ब्ल्यू प्रिंट) त्याच्या डोळ्यांपुढें कधीच उभा नव्हता. आधी मंत्र, मग तंत्र या पद्धतीनें त्याच्या लघुनिबंधाचा विकास होत गेला. फडक्यांची गुजगोष्ट अशी विकसित झाली नाही. 'गुजगोष्टीं'ची प्रस्तावना वाचली म्हणजे इंग्रजींतल्या या वाङ्‌मयप्रकाराकडे आकृष्ट झाल्यामुळें त्याचा अभ्यास करून आणि त्या अभ्यासांतून निघालेल्या निष्कर्षांच्या आधारें या

लेखनाचें एक तंत्र निश्चित ठरवून फडक्यांनीं लघुनिबंधलेखन केलें हें स्पष्ट होतें.

फडके व काणेकर याच्या लघुनिबंधात जें विलक्षण अंतर पडलें आहे तें यामुळेंच. फडके बहुधा तंत्राचा एक भाग म्हणून आपल्या गुजगोष्टीला तत्त्व-शोधनाची जोड देतात. लग्न-समारंभात हाताला अत्तर लावावें तसें त्याचें हें चिंतन किंवा शोधन असतें. पण त्याच्या निबंधाचा मूळ — किंबहुना मुख्य — हेतु सौंदर्यदर्शनाचाच असतो. उत्कट किंवा काव्यात्म वृत्तीच्या माणसाला सौंदर्यदर्शन अधिक साधतें. पण फडक्याच्या व्यक्तित्वात थोडें-फार काव्य असलें तरी तें व्यक्तित्व उत्कट किंवा काव्यात्म नाही. काव्याची धुंदी किंवा बेहोषी त्याच्या कुठल्याच लिखाणात आढळणार नाही — कादंबऱ्यातल्या सृष्टिवर्णनात किंवा प्रणयप्रसंगातसुद्धा! त्यामुळें सौंदर्यशोधन हें साध्य मानणाऱ्या लघुनिबंधाची परंपरा सुरू करण्याचा मान जरी त्याच्याकडे जात असला, तरी त्याच्या गुजगोष्टीतलें सौंदर्यदर्शन किंवा सौंदर्यशोधन आपल्या सूक्ष्मतेनें किंवा उत्कटतेनें वाचकाला भान विसरायला लावीत नाही.

सौंदर्यदर्शन हा काणेकराच्या लघुनिबंधाचा आत्मा नाहीं. त्याचा आत्मा आहे जीवनदर्शन — विचारमंथन आणि तत्त्वचिंतन याच्या साहाय्यानें घडविलेलें जीवनदर्शन.

## १४

काणेकरपद्धतीच्या लघुनिबंधावर घेतल्या जाणाऱ्या एका महत्त्वाच्या आक्षेपाचा येथें विचार करणें आवश्यक आहे. लघुनिबंधाचा हेतु सौंदर्यदर्शन की तत्त्वशोधन, असा या आक्षेपकाचा सवाल आहे. त्याच्या मतें तत्त्वशोधन हा गंभीर निबंधाचा आत्मा आहे, लघुनिबंधाचा नाही. केवळ निबंधाची लांबी कमी केल्यानें काहीं कुठलेंहि लिखाण लघुनिबंधात जमा होत नाही. लोखंडाचा कितीहि लहान तुकडा घेतला तरी त्यांत त्याचा कठीणपणा कायम राहणारच. खोबऱ्याचा तुकडा किंवा खरवसाची वडी याच्याशी त्याची तुलना कशी करता येईल?

हा आक्षेप मराठींतच घेतला गेला आहे असें नाहीं. लघुनिबंधाचा हेतु सौंदर्यदर्शन — आत्मनिष्ठ वृत्तीनें, अगदीं नाजुक आणि नजाकतदार रीतीनें केलेलें सौंदर्यदर्शन! याच्या पलीकडे लेखकानें पाऊल टाकलें कीं तो निबंधाच्या राज्यात

शिरला – उपवनातून वनात गेला – असें या टीकाकाराना वाटतें. ल्यूकासच्या निवडक लघुनिबंधाचें एक पुस्तक ई ए. वुडहाउस यांनीं संपादित केलें आहे. त्या पुस्तकाला जोडलेल्या विस्तृत मार्मिक प्रस्तावनेंत ल्यूकासशी बिरब्रॉम, बेलॉक् व चेस्टर्टन् याची तुलना करून लघुनिबंधकार म्हणून प्रख्यात असलेले हे लेखकहि आत्मपर निबंधाच्या ( Personal or Familiar Essay ) मर्यादा संभाळीत नाहीत व म्हणूनच या नाजुक कलेंत ते ल्यूकासची बरोबरी करूं शकत नाहींत असें ते म्हणतात.

पण सौंदर्यदर्शनाच्या बाजूनें बोलणारे असे अनेक वाङ्मयविवेचक असले तरी ' रिचर्ड किंग 'सारख्या लघुनिबंधकारानी आत्मनिष्ठ पद्धतीनें लिहिलेल्या सुंदर विचारप्रधान लघुनिबंधाकडे दुर्लक्ष करून कसें चालेल ? ' Some Confessions Of an Average Man ' हा किंगचा निबंध-संग्रह पाहावा. विविध लहान-मोठ्या विषयावर – नावडत्या माणसापासून नैतिक शिक्षणापर्यंत – तो सारख्याच तन्मयतेनें लिहितो. प्राजक्ताचें झाड फुलले म्हणजे जसें शोभिवंत दिसतें, तसा स्वच्छंदानें चालणारा त्याचा विचारविलास भासतो त्याच्या या चिंतनात परंपरागत विचाराचे प्रतिध्वनि नसतात. ते खास रिचर्ड किंगचे विचार असतात. त्यामुळें त्या विचारातूनहि किंगचें व्यक्तित्व जाणवतें, वाचकाला मोहिनी घालतें. उदा० स्त्री-पुरुषांच्या प्रेमाविषयीं लिहिताना तो म्हणतो, ' प्रीति हा स्त्रीच्या जीवनाइतका पुरुषाच्या जीवनाचा अविभाज्य भाग नाही. पुरुषाचें सारें बळ यातच आहे. त्यामुळेंच तो जगात पराक्रम गाजवूं शकतो. स्त्रीला तें बहुधा साधत नाही. कारण व्यावहारिक यश हें माणसाच्या अहंकाराच्या विजयाचे चिन्ह असतें. पण प्रीति – उत्कट प्रीति – म्हणजे ज्या स्थितीत अहंकाराचा संपूर्ण लोप होतो अशी मनःस्थिति. ज्याच्यावर आपलें प्रेम आहे त्याची अष्टौप्रहर सेवा करावी आणि त्याला जास्तीत जास्त सुख द्यावें एवढेंच प्रीति जाणते. साहजिकच वैयक्तिक आकाक्षाना प्रीतीच्या राज्यात दुय्यम स्थान प्राप्त होते. पुरुषाप्रमाणें स्वतंत्र पराक्रम करूं इच्छिणाऱ्या स्त्रियापैकीं फारच थोड्या प्रौढपणीं आपापल्या क्षेत्राना चिकटून राहिलेल्या दिसतात, याचें कारण हेंच आहे. त्याच्यापैकी काही सुखी माता होतात, काहीं सुखी पत्नी होतात, कांही सुखी प्रेयसी होतात. फार काय, कित्येक दुःखी कुमारिका म्हणून जीवनाचा प्रवास करीत राहतात !

पण पुरुषाच्या बाबतीत असें कधीच घडत नाही. सुखी पुत्र, सुखी पति, सुखी प्रेमिक, यापैकी एखादी किंवा अशीच दुसरी कुठलीहि भूमिका करून त्याचें समाधान होत नाही.'

किंगप्रमाणें एफ्. एच्. प्रिचर्ड व ई. वुइल्यम्स या दोन तज्ज्ञ संपादकांचीहि साक्ष विचारप्रधान लघुनिबंधाला अनुकूल अशी आहे. 'More Essays of To-day या आपल्या प्रातिनिधिक लघुनिबंधसंग्रहाच्या प्रस्तावनेंत प्रिचर्ड म्हणतो, 'The essay should set out to prove nothing, but may illuminate anything' (एखादा सिद्धान्त मांडणें हे निबंधाचें कार्य नाहीं; पण कुठल्याहि गोष्टीवर नवा प्रकाश पाडणे हा त्याचा हेतु होऊं शकतो.) हे आर्लो विल्यम्सचे म्हणणे पूर्णपणे बरोबर आहे. निबंधकार एका बाजूनें सौम्य असायला काहीच हरकत नाही; पण तो दुसऱ्या बाजूने बंडखोरहि असायला हवा. ('Our essayist may be gentle, but he is also a rebel.') सात्त्विक विनोद आणि दुर्मिळ निरीक्षणशक्ति याच्या साहाय्यानें तो जीवनाच्या एखाद्या भागावर असा प्रकाश टाकतो की त्यामुळेच आपणांला त्याच्या खऱ्याखुऱ्या स्वरूपाची नीट कल्पना येते. ( He continues by good humour and rare insight to light up some phase of our life so that we are able to see it in something like its true proportions.')

'A Book Of English Essays' या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत ई. वुइल्यम्स म्हणतो, 'Throughout the manifold variety of the English essays, there runs in one form or another, a sense of moral purpose: a zeal to edify and clarify our thoughts upon a thousand different themes. Sometimes that purpose is boldly revealed, sometimes it is camouflaged with humour or irony, sometimes it is so implicit that it discloses to you only after a long reflection.' (इंग्रजी लघु-निबंधाच्या विविध प्रकारात या नाहीं त्या रूपानें तत्त्वशोधनाची (moral purpose) जाणीव नेहमीं दिसून येते. कधीं ही जाणीव धिटाईनें आपलें स्वरूप प्रकट करते, कधीं विनोदाचा बुरखा घेऊन वावरते, तर कधीं ती इतक्या सूक्ष्म स्वरूपांत तिथें असते, की दीर्घ चिंतनानंतरच तिचें अस्तित्व आपल्याला जाणवतें.)

सौंदर्याचें चिंतन, दर्शन आणि शोधन हा लघुनिबंधाचा एक प्रमुख हेतु

आहे, यात शंका नाही. पण सत्याचें चिंतन, दर्शन आणि शोधन हासुद्धा त्याचा हेतु होऊं शकतो हें सिद्ध करण्यासाठी खरोखर किंग, विल्यम्स, प्रिचर्ड वगैरे साहेबमंडळींच्या साक्षी काढण्याची काहीं जरूरी नव्हती. पण केवळ यांत्रिक आणि तात्रिक बाबतीतच नव्हे तर साहित्य आणि कला यातसुद्धा वेळी अवेळीं पाश्चात्य तज्ज्ञाच्या तोंडाकडे पाहण्याची — केवळ तोंडाकडे पाहण्याचीच नव्हे तर त्याच्या ओंजळीनें पाणी पिण्याची — पद्धत आपल्यात पडून गेली असल्यामुळें, किंबहुना, ' साहेब म्हणतो ना ! मग ते बरोबर असलेंच पाहिजे ! ' या वृत्तीचा पगडा अजून आपल्यातील पंडिताच्या आणि प्राध्यापकाच्या मनावर असल्यामुळें अवतरणाचा थोडासा प्रपंच मीं वर केला आहे. हें सारें पुस्तकी पांडित्य क्षणभर बाजूला ठेवून जो फडके-काणेकराचे निबंध वाचील, त्याच्या हें सहज लक्षात येईल की इंग्रजीतील सौंदर्यशोधक लघुनिबंधाचा मार्ग फडक्यानी चोखाळला. उलट काणेकरानी ह्या लघुनिबंधाचे महत्त्वाचे विशेष — आत्मनिवेदन, दिलखुलास विनोद, घरगुती व जिव्हाळ्याची भाषा, छोट्या छोट्या कथाप्रसंगाची योजना, विविध संदर्भातून आणि चुटक्यातून व्यक्त होणारा बहुश्रुतपणा इत्यादि गुण — आत्मसात् करून मराठी मनाशी व त्या मनाच्या वाङ्मयीन आवडीनिवडीशीं मिळताजुळता होईल असा स्वतंत्र पद्धतीचा लघुनिबंध निर्माण केला. तो एका बाजूनें जसा काव्याशी आणि कथेशी संलग्न आहे (क्रमाक १२० : ' पक्षि म्हणती ज्या आपुला ', क्रमाक ९७ : ' माझा हिरवा मित्र ', क्रमाक ८६ : ' देवदारु आणि चक्रवाक् ') तसा तो दुसऱ्या बाजूनें मराठींतल्या निबंधाशीं किंबहुना मराठी वाङ्मयाच्या अस्मितेशी — तिच्या परंपरागत आत्मिक शक्तीशी — संलग्न आहे.

## १५

प्रत्येक वाङ्मयाचा विकास त्या त्या देशाच्या किंवा प्रदेशाच्या इतिहासाच्या, भूमिभागाच्या, संस्कृतीच्या आणि पूर्ववाङ्मयाच्या अनुषंगानें होत असतो. साहित्य ही वैयक्तिक निर्मिति असली तरी या सर्व गोष्टी त्या निर्मितीचें नियंत्रण आणि संवर्धन करीत असतात. म्हणूनच कालिदास-टागोर हे शेक्सपीअर-इब्सेनपेक्षा आणि बालकवि-गडकरी हे कीट्स-शेलेपेक्षा किती तरी भिन्न वाटतात.

या दृष्टीनें मराठी वाङ्मयाकडे पाहिलें तर काव्य आणि तत्त्वज्ञान याची

अभिन्नता हा त्याचा एक प्रमुख विशेष आहे असें दिसून येईल. ज्ञानदेव-तुकाराम हे संतकवि होते म्हणून केवळ त्याच्या साहित्यातच तो आढळतो असे नाहीं. भारतीय संस्कृतीच्या आणि महाराष्ट्राच्या इतिहासाच्या द्वारा मराठी रक्तात मुरलेला हा विशेष आहे. म्हणूनच पाश्चात्य कवितेनें प्रभावित झालेल्या आणि नवीन तऱ्हेची काव्यरचना करायला सरसावलेल्या केशवसुत-मर्ढेकरातहि काव्य आणि तत्त्वज्ञान याची अभिन्नता स्पष्टपणें प्रचीत होते. याचा अर्थ मराठी मन सौंदर्यपूजेत रस घेऊं शकत नाही असा नाही. पण तें सौंदर्य सत्याशी समरस झालें असेल तर त्याला अधिक आवडतें हें नाकारून चाल-णार नाहीं. या विशिष्ट प्रकारच्या साहित्य-सौंदर्याची आवड सात शतकें त्याच्या रक्तात भिनत आली आहे. बालकवीसारखा एकादा विशुद्ध सौंदर्याचा पूजक असलेला कवि वगळला, व १९२० नंतर प्रसंगी सौंदर्याचा आत्मा बाजूला ठेवून त्याच्या शरिराची पूजा करण्याचे जे थोडे-फार प्रयत्न झाले ते बाजूला ठेवले, तर मराठी वाङ्मयाच्या इतिहासातून शुद्ध सौंदर्यपूजेची उदाहरणे शोधून काढणें फार कठीण जाईल. काणेकराचा विचारप्रधान लघुनिबंध जो चटकन् लोकप्रिय झाला याचे एक कारण हें आहे. एका बाजूनें तो लालित्य व आत्मनिष्ठा यानी नटलेला एक नवा, रम्य वाङ्मयप्रकार होता. उलट, दुसऱ्या बाजूनें तो मराठीच्या विचारप्रधान परंपरेशी सुसंगत असलेला असा काव्य आणि तत्त्वज्ञान याच्या सुंदर मिश्रणाचा आविष्कार होता. मात्र चिपळूणकर-आगरकरापासून केळकर आणि अच्युतराव कोल्हटकर याच्यापर्यंतचा निबंध असा आत्मनिष्ठ किंवा चिंतनप्रधान नव्हता. व्यक्तिगत चिंतनापेक्षा प्रचलित ज्वलंत प्रश्नाला व त्या प्रश्नाच्या सूक्ष्म चिकित्सेपेक्षा त्याच्या प्रभावी प्रचाराला त्याच्या साहित्यात महत्त्व होते. आपल्या वैचारिकतेला प्रचाराचें स्वरूप येऊं नये ही दक्षता काणेकरानी लघुनिबंध लिहूं लागल्यानंतर लवकरच घेतली. त्यामुळें त्याच्या लेखनाला केवळ आकारानें लहान अशा जुन्या प्रकारच्या निबंधाचे स्वरूप प्राप्त झालें नाही. आशय व आविष्कार या दोन्ही दृष्टींनी तो नव्या प्रकारचा लघुनिबंध बनला.

## १६

काणेकर जेव्हा ‘ पिकली पाने ’ लिहूं लागले तेव्हा ते आर्थिक विषमतेच्या विचारानें भारावून गेले होते यात शंका नाही. त्यामुळें त्याच्या प्रारंभीच्या

अनेक लघुनिबंधात या एकाच विषयावर जोर पडलेला दिसतो. इतकेंच नव्हे, तर ' छोटे चोर आणि मोठे चोर...' (क्रमांक २४) सारख्या लघुनिबंधात शेवटी शेवटीं लेखकाचा खेळकरपणा नाहींसा होऊन त्याची जागा संतापानें घेतलेली दिसते. काणेकर हा एकच विषय पुनःपुन्हा हाताळीत राहिले असते, तर त्याचे लघुनिबंध एकसुरी आणि एका साच्याचे झाले असते. त्याच्या कलेचा विकास खुंटला असता. ते केवळ पूर्वपरंपरेंतले निबंधकार असते तर ही धोक्याची जागा त्याना टाळता आली नसती. पण त्याचें व्यक्तिमत्त्व मूलतः लघुनिबंधकाराचें आहे. अभिनिवेशानें कुठल्याहि गोष्टीच्या आहारीं जाणारें, कुटल्याहि तत्त्वाचें आत्यंतिक टोंक गाठणारें किंवा कुठल्याहि भावनेबरोबर आंधळेपणानें वाहून जाणारें असे तें एकागी व्यक्तित्व नाहीं. काणेकराना प्रवास करण्यात मोठा आनंद वाटतो आणि त्याची प्रवासवर्णने मोठी वेधक उतरतात. याचें कारण जगातील विविधतेचा मनःपूर्वक आणि मनसोक्त आस्वाद घेण्याची शक्ति या व्यक्तित्वात आहे. साहजिकच जीवनाच्या प्रवासात त्याना जें जें वैचित्र्य आढळलें, तें तें त्यानीं जेवढ्या सहानुभूतीनें तेवढ्याच मिस्किल-पणाने टिपून मनात साठवून ठेवलें. जीवनदर्शनाच्या या शक्तीमुळेंच त्याच्या लघुनिबंधाच्या विषयाचें क्षेत्र हळूहळू विस्तारत गेलें.

लघुनिबंधाचा जनक मानला जाणारा फ्रेंच लेखक मॉटेन म्हणत असे, ' I am myself the subject of the book.' (' मी स्वतःच माझ्या लघु-निबंधाचा विषय आहें.) पण हें म्हणत असतांनाच प्रवास, पुस्तकें, प्लूटार्च-सारखा लेखक, प्रीति, मृत्यु, कामभावना, म्हातारपण हे सर्व त्याच्या चिंतनाचे आणि निबंधातून व्यक्त झालेल्या स्वैरालापांचे विषय झाले आहेत. हें स्वाभाविकच आहे. कारण या सर्व गोष्टी प्रत्येक मनुष्याला जिव्हाळ्याच्या वाटणाऱ्या आहेत; आणि त्याविषयीं लिहितांना मॉटेननें केवळ स्वतःचें चित्र काढलें आहे असें नव्हे ! तें प्रत्येक माणसाच्या मनाचें चित्र आहे.

काणेकराच्या लघुनिबंधातहि हें सर्वसामान्य माणसाचें चित्रण आढळतें. फडके दाढी कशी करतात, आणि ती करतांना त्यांचे कोणत्या प्रकारचें चिंतन चालतें, किंवा खाडेकर दिवसातून किती वेळा चहा पितात वगैरे गोष्टींचा पत्ता त्याच्या लघुनिबंधावरून लागतो. काणेकराची असली कुठलीहि वैयक्तिक गोष्ट त्यांच्या

लघुनिबंधावरून आपल्याला कळणार नाहीं. पण स्त्री-मन आणि स्त्री-जीवन याविषयी त्याची मतें काय आहेत ('जें माहीत हवं...'), स्वतःची निरुपद्रवी फसवणूक करून घेणाऱ्या मनुष्याविषयीं त्याना सहानुभूति का वाटते ('मनाच्या टाळी'), 'परमेश्वर होण्यापेक्षा माणूस होणें बरें' असें ते का म्हणतात ('कल्पना असती तर'), एकटेपणाची भयंकर जाणीव सामान्य माणसाला कशी अस्वस्थ करून सोडते ('आकाशातले तारे आणि मी'), सुधारणाच्या जोडीनें जगातलीं दुःखेंहि वाढत असली तरी काणेकर त्या सुधारणाचें स्वागत का करतात ('मोठें शून्य'), असामान्य मनुष्यापेक्षा सामान्य मनुष्य त्याना जवळचा का वाटतो, ('सामान्याचें असामान्यत्व'), ह्या आणि अशा प्रकारच्या अनेक गोष्टी ते अगदी मनमोकळेपणानें — बैठकींतल्या मित्राच्या सलगीनें — आपल्याला सागतात. किंबहुना गेल्या दोन तपात महाराष्ट्रातल्या सुशिक्षिताच्या मनात आणि जीवनात जे जे प्रश्न उभे राहिले त्याच्यापैकी पुष्कळाचा काणेकरानी हंसत खेळत पण विचाराला धक्के देत परामर्श घेतला आहे असें म्हणता येईल. या विषयात 'हॅम्लेटची चूक' आहे, 'शंकराचार्यांच्या गळयात पडलेले आइन्स्टीन' आहेत आणि 'आरसा हंसला'पासून 'शत्रु करण्याच्या कले'पर्यंत प्रत्येकाला येणाऱ्या विविध प्रकारच्या अनुभवाचा समावेश आहे. काणेकरानी वाचलेलीं पुस्तकें, ऐकलेल्या गोष्टी, अनुभविलेल्या विसंगति, पाहिलेली माणसें, या सर्वांचें सुरेख संमेलन त्याच्या लघुनिबंधात झालें आहे. म्हणूनच प्रो. फडके यानीं काढलेले पुढील उद्गार त्याच्या लघुनिबंधाना पूर्णपणें लागू पडतात — 'लघुनिबंध म्हणजे संभाषण खरेंच! पण त्या संभाषणात जशी सहजता तशीच मार्मिकताहि असावी लागते. तें ऐकताना आपण एकाद्या जाड्या विद्वानाचें प्रवचन ऐकत आहों असें वाटून वाचक कुठेंहि बिचकता कामा नये! परंतु त्याबरोबरच वाचकाला असेंहि सतत वाटत राहिलें पाहिजे की ज्याच्या अनुभवाचा विस्तार मोठा आहे, ज्यानें मानवी व्यवहाराचे नाना रंगढंग पाहिले व ओळखले आहेत, ज्यानें सत्कृत्यें केली आहेत आणि चुकाहि केल्या आहेत, ज्यानें जगरहाटीकडे रसिकाच्या दृष्टीनें पाहिलें आहे, अशा बहुश्रुत मर्मज्ञाचें मधुर आर्जवी भाषण आपण ऐकत आहोंत.'

१७

काणेकरांच्या खासगी बैठकींतल्या संभाषणकौशल्याचें वर्णन करतांना, प्रा.

वि. ह. कुलकर्णी यानी पुढील उद्गार काढले आहेत, 'काणेकर हे लोकप्रिय व मार्मिक वक्ते आहेत. पण वक्तृत्वकलेपेक्षा संभाषणकलेंत ते अधिक निष्णात आहेत. खासगी बैठक रंगविण्यांतील त्याचें चातुर्य केवळ असाधारण आहे. संभाषणप्रसंगी अगदी साधी गोष्टहि ते साहित्यिकाच्या कौशल्यानें रंगवून सांगतात.' काणेकराच्या लघुनिबंधाच्या यशात त्याच्या या कौशल्याचा फार मोठा वाटा आहे. त्याच्या लघुनिबंधातील अमर पात्र 'गणूकाका' हें त्याच्या या गुणविशेषाचें अपत्य आहे असे म्हटलें तरी अतिशयोक्ति होणार नाही. आपले लघुनिबंध विचारप्रधान आहेत, त्यातील प्रश्नाच्या दोन्ही बाजू वाचकापुढे माडल्याशिवाय त्याच्या चिंतनाला चालना मिळणार नाही, हें काणेकराना पुरेपूर ठाऊक होतें. त्या बाजू चित्रित करण्याचा सहजसुंदर मार्ग त्यानीं शोधून काढला. तो म्हणजे त्या प्रश्नाची सनातनी बाजू 'गणूकाका'नी घ्यायची आणि पुरोगामी बाजू 'मी'नें माडायची ! एकाद्या प्रश्नाच्या केवळ तात्त्विक ( abstract ) मांडणीत आणि चर्चेत जो रुक्षपणा येतो तो या युक्तीमुळें पार नाहीसा झाला. नाट्यपूर्ण रीतीनें लघुनिबंधाचा प्रारंभ करणें व संवादातून सहजासहजी विषयसूत्र विकसित करणें या गोष्टी 'गणूकाका'ची मदत मिळताच काणेकर मोठ्या सुलभतेनें करूं लागले. त्याच्या लघुनिबंध–लेखनातील सुवर्णक्षण कोणता असे जर कोणी विचारलें तर क्षणाचाहि विलंब न लावता मी उत्तर देईन, 'ज्या क्षणीं गणूकाकाचा त्याच्या निबंधात प्रथमतः प्रवेश झाला तो.' गणूकाकाच्यामुळें काणेकराच्या लघु-निबंधांना – त्याचे निम्मे अधिक विषय गंभीर असूनहि – अगदीं निराळ्याच प्रकारची लज्जत आली.

आपल्या लघुनिबंधांत काणेकर स्वतःच्या आवडीनावडीविषयी फारसे बोलत नाहींत. या विशिष्ट दृष्टीनें पाहिलें तर त्याच्या निबंधांत आत्मनिवेदन फार कमी आहे. पण आपल्या अनेक निबंधांत ते गणूकाकांशीं – कांहीं कारणानें गणूकाकांचें येणें घडलें नाहीं तर दुसऱ्या एकाद्या मित्राशीं – बोलत असतात, वादविवाद करीत असतात, हंसत खेळत आपले विचार त्या त्या व्यक्तीच्या गळीं उतरवीत असतात. त्यामुळें काणेकरांच्या मनाचे सारे वैचारिक कप्पे आपल्यापुढें सहजासहजीं उघडे होतात. त्यांच्या मनाचा हा भाग आपल्याला इतका परिचित होतो कीं ते आपले अगदीं जवळचे मित्र आहेत, आणि म्हणूनच या सर्व गोष्टींची ते आपल्याशी चर्चा

करीत आहेत, असें वाटूं लागतें. वैचारिक आत्मनिवेदनाची पार्श्वभूमि, संभाषणां-तून फुलवीत नेलेलें विषयसूत्र, (कादंबऱ्यात संवादचातुर्य प्रकट करणाऱ्या फडक्यांच्या लघुनिबंधात काणेकराच्या मानानें संभाषणें फार कमी आहेत हें लक्षात घेण्याजोगें आहे.) आणि गणूकाकाच्या द्वारें निर्माण होणारा जिव्हाळा, माणुसकी व विनोद याच्यामुळे काणेकराचे निबंध हे खरेखुरे लघुनिबंध (Personal Essays) झाले.

## १८

'गणूकाका' ही ॲडिसनच्या 'रॉजर डी. कॉव्हर्ले'प्रमाणे किंवा वा. म. जोश्याच्या 'प्रो. धोंडोपंत बर्व्या'प्रमाणें वाचक कधीहि विसरणार नाहीत अशी व्यक्तिरेखा आहे. हे गणूकाका कसे निर्माण झाले याचा मनोरंजक इतिहास काणेकरानी आपल्या एका भाषणात दिला आहे (गणूकाका : काणेकर — व्यक्ति आणि वाङ्मय). त्या भाषणाच्या शेवटी ते म्हणतात, 'गणूकाकाची मतें अशी चमत्कारिक, जुनाट, पारंपरिक आहेत. पण या मताच्या मागे त्याचें विशाल, निर्मळ, सात्त्विक मन असल्यामुळें ते मलाच काय, पण सर्वांनाच मनापासून आवडतात.'

गणूकाकामुळें काणेकराच्या लघुनिबंधाच्या वैचारिक बैठकीला विपुल व स्वाभाविक विनोदाची फार मोठी जोड मिळाली. उपरोध, उपहास वगैरे विनोदाचीं शस्त्रें काणेकराच्या प्रतिभेला जन्मतःच लाभलीं आहेत — कर्णाच्या कवचकुंडला-सारखी! पण हीं सर्व शस्त्रें फार तीक्ष्ण असतात. निबंधकाराच्या शस्त्रागारातच तीं अधिक शोभतात. लघुनिबंधाची रंगत स्वाभाविक, मनमोकळ्या व विषयाच्या ओघांत येणाऱ्या विनोदानें अधिक साधते. 'पादरी शिडें'मधील ज्या ज्या लघुनिबंधात 'गणूकाका' येतात ते ते निबंध अशा प्रकारच्या सौम्य व सात्त्विक विनोदामुळें मोठे खुमासदार वाटतात. श्लेष, कोटि, अतिशयोक्ति वगैरे विनोदाच्या बौद्धिक प्रकाराचा आढळ काणेकराच्या लघुनिबंधात सहसा होत नाहीं, याचें कारण हेंच आहे. निर्मळ विनोदाची ही देणगी लाभल्यामुळेंच 'व्यवस्थितपणाचें वेड', 'आळस आणि उद्योग' अशा प्रकारचे मजेदार लघुनिबंध काणेकरांच्या लेखणीं-तून निर्माण झाले.

१९

या सर्व लघुनिबंधाचें सौंदर्य आणि सामर्थ्य वाढविण्याच्या कामीं काणेकरांची भाषा आणि त्याचा बहुश्रुतपणा याचेंहि फार मोठें साहाय्य झालें आहे. विचार-प्रधान लघुनिबंधाला शोभेल अशीच त्याची भाषा — साधी, सोपी, रोखठोक, अर्थवाहक, संस्कृतचा अथवा इंग्रजीचा पगडा नसलेली, अस्सल मराठी बाण्याची — आहे. १९२० नंतर निबंधमालेचें युग जसें मागें पडलें तशी त्या युगातली किंचित् अवजड, जरूरीपेक्षा अधिक अलंकारिक आणि अंतरंगाच्या आविष्कारा-पेक्षा पांडित्यपूर्ण प्रदर्शनाकडे अधिक कल असलेली भाषाहि मागें पडूं लागली. प्रसाद, माधुर्य, सुबोधता, रोखठोकपणा हे शैलीचे विशेष १९२० नंतरच्या कालखंडात वाढीला लागले. फडके, अत्रे, काणेकर, सानेगुरुजी, र. धों. कर्वे, माटे वगैरे अनेक लेखकानी हें परिवर्तन घडवून आणलें. अर्थगर्भ पण प्रसादपूर्ण शैलीनें लिहिणाऱ्या या लेखकात कर्व्यांप्रमाणेंच काणेकर अस्सल मराठीचे पुर-स्कर्ते म्हणून उठून दिसतात. त्याच्या लघुनिबंधाचे विषय जसे आधुनिक तशी त्याची भाषाहि आधुनिक आहे. तिच्यात नखरा नाहीं; पण निरोगीपणाचें सौंदर्य आहे. अलंकारानी नटून गजगतीनें देवदर्शनाला जाण्यात आनंद मान-णारी ती जुन्या काळातली प्रमदा नाही. गळ्यात सोन्याची नाजुक माळ किंवा हातात सोन्याची काकणें — प्रत्येक हातात एकेकच — घालून विद्यालयाकडे लगबगीनें चाललेली ती आजकालची किशोरी आहे.

बहुश्रुतपणा हा तर लघुनिबंधकाराचा फार मोठा गुण आहे. त्याच्या भात्यातला रामबाण आहे तो ! त्याच्या बळावरच तो लघुनिबंधाला आवश्यक असलेलें स्वच्छंद भ्रमण करूं शकतो — आपल्या लेखनात हरतऱ्हेची रंजकता निर्माण करतो. या बाबतींत काणेकराचें वैशिष्ट्य चटकन् लक्षात येतें. ग्रंथ, ग्रंथकार आणि त्या ग्रंथ-काराची सुभाषितें याच्यापुरता त्याचा बहुश्रुतपणा मर्यादित नाही. त्याचें वाचन विपुल आणि मार्मिक आहे हें तर खरेंच ! पण मानवी जीवनावर निरनिराळ्या बाजूंनी प्रकाश टाकणाऱ्या गोष्टी, चुटके आणि किस्सेहि त्याच्या संग्रही भरपूर आहेत. ‘ पाढरीं शिडें ’ मधील असल्या लहान लहान गोष्टी किंवा चुटके एकत्रित केले तर ‘ विनोद आणि महदाख्यायिका ’सारखें एक छोटें पण अतिशय मनोरंजक असें पुस्तक तयार होईल. अशा गोष्टीचा संग्रह करण्यात काणेकराची बुद्धि जशी

निपुण आहे – अगदीं एकाद्या मधमाशीप्रमाणें – तशी योग्य ठिकाणीं योग्य गोष्टीचा उपयोग करण्यात ती तितकीच कुशल आहे.

२०

असे विविध गुण असलेला लघुनिबंधकार दोन तपें झालीं तरी पूर्वीइतकाच लोकप्रिय राहावा आणि त्यानें रसिकाच्या पानात पुनःपुन्हा रुचकर पदार्थ वाढले असले तरी त्यानी अतृप्तच राहावें यात नवल कसलें ? काणेकरानीं लघुनिबंधलेखन सोडूं नये – नव्हे तें मंदावूंसुद्धा देऊं नये – अशी आजहि त्याच्या हजारों चाहत्याची इच्छा आहे. या क्षेत्रात विचारप्रधान लेखनाची स्वतःवर कळत नकळत घालून घेतलेली मर्यादा त्यानी आता दूर करावी असेंहि त्याना वाटतें. जीवनातले नानाप्रकारचे गमतीदार अनुभव, सृष्टिसौंदर्य, प्रवासात आढळणारीं दृश्यें आणि व्यक्ति, विविध गमतीदार प्रसंग, स्वतःच्या आवडी-निवडी, या सर्व गोष्टी लघुनिबंधाचे विषय होऊं शकतात. मराठी लघुनिबंधाचा आता या दृष्टीनें विकास होणे जरूर आहे. वर उल्लेखिलेल्या सर्व गोष्टीत काणेकर रमू शकतात हें त्याच्या प्रवासवर्णनात पदोपदीं प्रत्ययाला येतें. ' आमची माती, आमचें आकाश ' आणि ' निळे डोंगर, तांबडी माती ' यातील माती, डोंगर व आकाश यांची विविध स्वरूपें आणि त्यांचे काळे, निळे, तांबडे संमिश्र रंग यापुढच्या काणेकराच्या लघुनिबंधातहि पाहण्याची त्याच्या चाहत्यांची इच्छा आहे.

ते आज रसिकाना सादर करीत असलेल्या ' पांढरीं शिडें ' या संग्रहाचे मराठी वाचक आनंदानें स्वागत करतील यात मुळींच शंका नाहीं. या लघुनिबंधांची गोडी अवीट आहे, हे त्यांना अनुभवानें माहीत झालें आहे. ' पांढरीं शिडें ' या पुस्तकाचें कुठलेंहि पान उघडावें आणि दिसेल तो लघुनिबंध वाचायाला सुरुवात करावी. हंसत खेळत काणेकर आपली बुद्धि प्रकाशित आणि अंतःकरण उल्हसित करून गेले आहेत असा अनुभव पांच मिनिटांतच आल्यावांचून राहणार नाही. या लघुनिबंधात काणेकरांच्या आत्म्याचा संपूर्ण आविष्कार झाला आहे. जें लेखन वाचतांना लेखकाच्या आत्म्याचा स्पर्श वाचकाच्या आत्म्याला होतो त्याचें सौंदर्य आणि सामर्थ्य हीं लवकर कोमेजत नाहींत, हें काय नव्यानें सांगायला हवें ?

पुणें, ३–२–५७ *वि. स. खांडेकर*

*तो एक नवीनच फोंफावलेला वृक्ष होता.*

*आपल्या हिरवट, ताबूस व जर्द पिवळ्या पानाचा संभार अंगावर धरून तो सारा वेळ संथपणें डुलत उभा असे.*

*संध्याकाळीं त्याच्या पिकल्या पानाचा पाचोळा खालील भूभागावर पडे; आणि तेथून जाणारी-येणारीं काहीं शिष्ट माणसें त्याच्याकडे तिरस्कारानें पाहून म्हणत, 'हें निरर्थ वाढलेलें झाड उपटून टाकलेलें बरें !'*

*त्याचे ते कटु शब्द ऐकून तो दुःखीकष्टी होत असे. खरोखरच आपण भूमातेला भार आहोंत का ? या प्रामाणिक संशयानें तो व्यथितचित्त होई, आणि आपला झेंडा दुःखभरानें हालवी.*

*साहजिकच आणखीं काहीं पिकलीं पानें गळून पडत.*

*सकाळ होई. ताबूस गालाचीं, भिरभिरत्या डोळ्याचीं आणि भुरभुरणाऱ्या केसाचीं कितीतरी गुटगुटीत, सतेज बालकें तेथें उड्या मारीत खेळावयाला येत, आणि सकाळच्या पिवळसर कोंवळ्या उनात सोन्यासारखीं झळझळणारीं त्याचीं तीं जर्द पिंवळीं पानें पाहून, 'पिकलीं पानें' ! 'पिकलीं पानें !' म्हणूनच एकच कोलाहल करीत.*

*कुणी त्यातलें एखादें उचलून आपल्या भुरभुरणाऱ्या केशकलापात खोंची, तर कुणी त्याच्या माला करून गळ्यात घाली. आणि आनंदानें ते चिमणे जीव त्या नवीनच फोंफावलेल्या वृक्षाभोंवतीं उडत बागडत.*

*त्याचा तो आनंद पाहून तो हर्षभरित चित्तानें आपला उंच झेंडा हालवी, आणि त्याचीं पिकलीं पानें पट् पट् पट् पट् त्याच्या अंगाखांद्यावर पडत.*

● ● ●

# १

## “ बुद्धीला पटतें, पण मनाला कसेंसेंच वाटतें... ”

परवा कुणाबरोबरसा मी बटस्फोटासंबंधीं बोलत होतों. साधकबाधक बऱ्याच मुद्द्याची चर्चा झाली. माझी सर्व विचारसरणीही त्याला पसंत पडली. पण शेवटी तो गृहस्थ जरासा नाखुश स्वरातच उद्गारला, “ तुम्ही म्हणता तें सगळं बरोबर आहे. बुद्धीलाही पटतं; पण मनाला कसंसंच वाटतं, बुवा ! ”

मला वाटतें माणूस प्रामाणिक होता म्हणूनच त्यानें माझ्यासमोर असे उद्गार काढले. नाहींतर नेहमींचा मनुष्यस्वभाव काय, तर आपल्याला कांहीं नकोसें वाटलें, कीं तसें सरळ वैयक्तिक कारण न सांगतां, ती गोष्ट घडल्यास जगांत केवढा अनर्थ होईल, आणि केवळ तो अनर्थ टाळण्याच्या परोपकार-बुद्धीनेंच आपण त्या गोष्टीच्या विरुद्ध आहोंत असें भासविणें. फार लांब कशाला. माझी स्वतःचीच गोष्ट घ्या ना ! मला वांग्याची भाजी मुळींच आवडत नाहीं. एकदां घरांत वांग्यासंबंधीं गोष्टी चालल्या होत्या. कोणीसें म्हणालें, बाजारांत हल्लीं फार सुरेख, लुसलुशीत वांगीं यतात, आणि स्वस्तही फार आहेत. तेव्हां मी एकदम उलटून म्हणालों, “ स्वस्त असतील, पण वांग्याच्या अंगांत वातुळपणा फार आहे आणि काकांच्या प्रकृतीला तर वांगीं मुळींच चांगलीं नाहींत. डॉक्टर असंच म्हणत होते त्या दिवशीं; नाहीं का हो, काका ? ” काकांच्या प्रकृतीविषयीं केवढा पुळका आला मला तेव्हा !

हो, पण मी बोलत होतों कशासंबंधीं ? त्या गृहस्थाचे ते उद्गार, " बुद्धीला पटतं, पण मनाला कसंसंच वाटतं, बुवा ! " खरेच प्रामाणिक होते ते उद्गार. किती तरी वेळां आपणालाही अगदीं असेंच होतें. बुद्धीला एखादी गोष्ट पटते, पण मनाला ती सहन होत नाहीं. माझ्या एका मित्राची एक मजेदार गोष्ट मला आठवते. शास्त्रीय संशोधक, आणि मोठा बुद्धिमान् आहे तो. उत्क्रांतिवादाचा त्यानें सखोल अभ्यास केला आहे; आणि ' ईश्वर ' अशी कांहीं वस्तु अस्तित्वात असणें अशक्य आहे, अशी त्याची पुरेपूर खात्री झाली आहे. एकदां रस्त्यावरून जातांना आम्हाला वाटेंत एक देऊळ लागलें. माझ्याबरोबर चालताना त्यानें झट्दिशीं हात उचलून नमस्कार केला. मला मोठें आश्चर्य वाटलें आणि मोठ्यानें हंसून मी म्हणालों,

" हें रे काय बुवा ? ईश्वर असणं अशक्य आहे, असं तूंच मला सांगत होतास ना ? मग नमस्कार कुणाला केलास ? "

" अरे, नाहीं हें खरं; पण समजा, चुकून असलाच तर काय घ्या ? उगाच एवढ्याच कारणावरून कोपायचा, आणि करायचा काहीं तरी वाईट आमचं ! नसला तर बरंच झालं. जास्तींत जास्त काय तो नमस्कारच फुकट जाईल, पण असला तर... ! हवी कशाला भानगड उगाच ! "

त्याचा तो युक्तिवाद ऐकून माझी हंसतां हंसतां मुरकुंडीच वळली !

ही गोष्ट जरी हंसण्यासारखी असली तरी तर्कबुद्धि आणि सहजप्रवृत्ति यात हा विरोध कां ? मी पुन्हा पुन्हा विचार करूं लागलों. घटस्फोटाची आवश्यकता या गृहस्थाच्या बुद्धीला पटली, मग याच्या मनाला कसेंसेंच का वाटलें ? मला वाटतें व्यक्तिमात्राच्या निरनिराळ्या मनःप्रवृत्तींचे उगम शोधूं गेल्यास, उत्क्रांतीच्या इतिहासाच्या गहन अरण्यांतच शिरलें पाहिजे. आपले रानटी पूर्वज जेव्हां टोळया करून राहत असत, तेव्हां त्यांच्या स्त्रियांची योग्यता — जातीनेंच त्या अबला असल्यामुळें — जीवनकलहाच्या त्या धकाधकीच्या काळांत इतर स्थावर जंगम मालमत्तेपेक्षा कांहीं अधिक नसे. एखाद्या टोळीला अधिक गुराढोरांची जरूरी भासली, तर दुसऱ्या टोळीशीं युद्ध करून त्यांचीं गुरेंढोरें ते हिरावून आणीत असत. त्याचप्रमाणें स्त्रियांची कमतरता पडली म्हणजे युद्ध करूनच दुसऱ्या टोळींतल्या स्त्रिया ते जिंकून आणीत. साहजिकच स्त्री ही एक

मालकीची वस्तु झाली. महाभारताचा काल घ्या ना. स्त्रीवर्गासंबंधीं मोठमोठीं स्तुतिस्तोत्रें असतील त्यांत, पण प्रसंग पडल्यास स्त्रीची खरी किंमत किती होती, यावर युधिष्ठिराच्या द्यूतप्रसंगींच्या वागणुकीनें चांगलाच प्रकाश पडतो. एकामागून एक सर्व कांहीं हरल्यावर या धर्मात्म्यानें आपली धर्मपत्नी पणाला लाविली! जमीनजुमला, हत्तीघोडे, तशीच स्त्री!! मालमत्तेचा एक भाग! स्त्रीसंबंधीं मालकीहक्काची ही प्रवृत्ति मानवी मनाला खिळली आहे ती इतकी जुनी आहे. शतकानुशतकें मनुष्याची उत्क्रांति झाली. उघडेंनागडें राहण्याच्या रानटी अवस्थेंतून मनुष्य सध्यांच्या ज्ञानवृद्धतेच्या अवस्थेंत येऊन पोहोंचला, तरी या प्रवृत्तीचा निखारा या साऱ्या ज्ञानवृद्धतेच्या आणि तर्ककुशलतेच्या ढिगाखालीं अजूनही जिवंतच आहे. सारा समाजच जोंपर्यंत मालकी हक्कावर उभारला आहे, तोंपर्यंत ही प्रवृत्ति उघड अगर थोडीबहुत प्रच्छन्न राहणारच; आणि एखाद्या प्रामाणिक माणसाच्या बुद्धीला कितीही पटलें, तरी या प्रवृत्ती-ला विरोधक अशी एखादी गोष्ट घडतांच त्या साऱ्या प्रचंड ढिगांतून हा निखारा धगधगणारच. त्या गृहस्थाच्या बुद्धीला घटस्फोटाची आवश्यकता पटली, पण मनाला कसेंसेंच वाटलें, त्याचें तरी कारण हेंच.

याचा अर्थ मात्र असा नव्हे कीं, या प्रवृत्तींना ऐतिहासिक कारणें आहेत, म्हणून बुद्धीला कांहींही वाटलें तरी या प्रवृत्तीच चांगल्या आहेत, आणि बुद्धीच्या विरुद्ध त्यांनाच वाव द्यावा. उलटपक्षीं मानवी संस्कृतीचा आणि सुधारणेचा इतिहास, म्हणजे मनुष्याच्या बुद्धीचा उत्तरोत्तर विकास, आणि या बुद्धिमत्तेच्या प्रकाशांत सहजप्रवृत्तींचें नियंत्रण आणि शुद्धीकरण!



## २

## " बेधडक खोटें बोलणें, हेंच केव्हां केव्हां खरें बोलण्यापेक्षां फार चांगलें. "

नुकतेंच लग्न झालेल्या एका गृहस्थानें मला पटकन् विचारलें,

" माझी बायको सुंदर आहे कीं नाहीं ? "

" आहे कीं ! ", मीं घुटमळत पण गोरामोरा होऊन उत्तर दिलें. ती सुंदर नव्हती अशांतला भाग नाहीं. आणि " आहे ना, " हें उत्तर देतांना मीही खरेंच बोलत होतों; तरी पण लाज वाटून मीं गोरामोरा होण्याचें कारण एवढेंच कीं त्या गृहस्थानें ज्या उत्साहानें आणि गोड अपेक्षेनें मला विचारलें तितक्याच उत्साहानें त्याला खूश करण्यासारखें उत्तर देणें मला शक्य नव्हतें. त्याची बायको जरी मला सुंदर वाटत असली तरी त्याच्यापुढें तिच्या नाका-डोळ्यांचें रसभरित वर्णन करणें म्हणजे नुसता शिष्टाचाराचाच भंग झाला असता इतकेंच नव्हे, तर आपल्या बायकोसंबंधीं अशी फाजील सलगी दाखविल्याबद्दल उलट तोच माझ्यावर चिडला असता ! बरें, तसें न करतां, एकाक्षरी उत्तर देऊन आपणाला विशेष कांहींच वाटत नाहीं असें दाखवावें, तरीही त्याला रागच यायचा ! मोठ्या विचित्र परिस्थितींत सापडतो मनुष्य अशा वेळीं. पण खरी गम्मत झाली ती दुसऱ्याच एका वेळीं. खरोखरच कुरूप बायको असलेल्या एका गृहस्थानें " माझी बायको सुरेख आहे कीं नाहीं ? " असा प्रश्न विचारला.

" सुरेख आहे कीं ! " मीं म्हटलें. त्या गृहस्थाला माझें उत्तर ऐकून खरोखरच बरें वाटल्याचें दिसलें. पण माझ्याबरोबर माझा एक एकांतिक सत्यवादी मित्र होता. या वेळीं तो मात्र सारखा मिस्किलपणें माझ्याकडे पाहात होता. तो गृहस्थ गेल्याबरोबर हा सत्यभक्त उद्गारला, " काय लुच्चा आहेस रे तूं ! किती खोटं बोललास उगाच त्याची खुशामत करायला ! "

" खोटं बोललों हें खरं आहे, " मी म्हणालों, " पण लुच्चेपणाचा किंवा खुशामत करण्याचा मात्र कांहींच प्रश्न उद्भवत नाहीं. त्याची खुशामत करून मला तो काहीं बक्षीस थोडंच देणार होता ? पण खरं बोलून त्याला दुखवा कां उगीच ? " आणि खरोखरच मी म्हणतों, खरें बोलण्यालासुद्धां कांहीं तरी सीमा आहेच कीं नाहीं ! इतकेंच नव्हे, तर केव्हां केव्हा बेधडक खोटें बोलणें हेंच खरें बोलण्यापेक्षा फार चांगलें. आता वरचाच प्रसंग घ्या. खरें बोलून मी काय मिळवणार होतों ? त्या गृहस्थाचें मन मात्र विनाकारण दुखविलें गेलें असतें, आणि सहानुभूतीकरिता तो माझ्याकडे आला असता त्याला आनंद-विण्याऐवजीं दुःखीकष्टी करून मीं त्याला परत पाठविला असता ! माणसाच्या जीवापुढें मला तरी नाहीं खऱ्याची किंमत अधिक वाटत ! खरें काय किंवा खोटें काय, त्याची खरी योग्यता जीवनाच्या कसोटीवरच ठरवायची. आधींच बिचाऱ्या मनुष्यप्राण्याचें मन करपून पोळून टाकणारे योग आणि घटना संसारात कितीतरी येतात, त्यांत एखाद्या खोट्या शब्दानें एखाद्याचें थोडें समाधान होत असेल, आणि नुकसान मात्र कोणाचेंच होत नसेल तर निर्भेळ सत्याचा बेधडक बळी द्यायला कांहींच हरकत नाहीं.

असल्या निरागस असत्यानें केव्हां केव्हां फायदा मात्र चांगलाच होतो. एखाद्या मुलाच्या आईसमोर तुम्ही तिच्या मुलांची जर खुबीदार स्तुति कराल, तर पूर्वी तुम्हांला नुसता चहाचा कप मिळत असल्यास, त्या पुढें चहाच्या बरोबर लाडूही मिळत जाईल. मात्र लाडू मिळण्याकरिता खोटें बोलताना एक गोष्ट अवश्य ध्यानांत ठेवली पाहिजे. मुलें कशींही गलिच्छ, गबाळ दिसत असलीं तरी " किती छान दिसतात तुमचीं मुलं ! " असें जर तुम्ही म्हणालांत तर लाडू बाजूलाच राहिला, पण तुम्ही गेल्याबरोबर ती मुलांची दृष्ट काढून, " डोळे फुटले मेल्याचे ! मीठमोहरी पडो मेल्याच्या

डोळ्यांत ! " असें म्हणेल, आणि पुन्हां तुम्हांला दारावरही उभें करणार नाहीं ! म्हणूनच मीं म्हटलें कीं, खुबीदार खोटें बोललें पाहिजे. अगोदर शेजारणींच्या मुलाची यथेच्छ निंदा केली पाहिजे. " मुलं कसलीं ? नष्ट कारटीं आहेत अगदीं ! गांवाचीं आडदांड. सगळं घर घेतात डोक्यावर. नाहीं तर तुमचीं मुलं. किती शांत, गरीब. घरचं वळणच मुळीं तसं ! "

आमचे सत्यवादी मित्र मात्र शेंडी तुटो, पारंबी तुटो, केव्हाही सत्यच बोलणार. एखाद्या रोग्याला त्याच्या रोगाचें नाव सांगितल्यास हृदयाला धक्का बसून तो लगेच मरेल असें जरी डॉक्टरांनीं सांगितलेलें असलें, तरी त्या रोग्यानें प्रश्न केल्याबरोबर हे सत्यवादी महात्मे त्याला निर्भेळ सत्य सांगणार आणि यमलोकाला पाठविणार ! आणि मयताच्या आप्त स्वकीयांना तरी आनंद काय थोडा ? माणूस मेला म्हणून काय झालें ? सत्याचा तर विजय झाला ! एवंच काय, सत्याकरिता सत्य, किंवा कलेकरितां कला, हीं केवळ नितांत मूर्खपणाचीं उदात्त नामाभिधानें होत.



## ३

## " दुसऱ्याच्या डोळ्यांनीं पाहाण्याची संवय... "

एक फार सुंदर ढाल होती. तिची एक बाजू संपूर्ण सोन्याची व दुसरी सबंध बाजू चांदीची होती. त्या ढालीच्या उभय बाजूंना उभे राहून दोन गृहस्थ तावातावानें भांडत होते. चांदीच्या बाजूचा गृहस्थ ती ढाल चांदीची आहे, असें घसा फोडून सांगत होता व सोन्याच्या बाजूचा गृहस्थ, " तूं महामूर्ख आहेस, ही ढाल सोन्याची आहे! " म्हणून त्या दुसऱ्या गृहस्थाला बजावीत होता. भांडण अगदीं विकोपाला जाऊन आतां हमरीतुमरीवर येणार, इतक्यांत तेथून एक तिऱ्हाईत गृहस्थ चालला होता, त्याचें या भांडणाकडे लक्ष जाऊन त्यानें ढालेच्या दोन्ही बाजू पाहिल्या, व त्या भांडणाऱ्या गृहस्थांना तो म्हणाला, " जरा ऐकाल का! तुम्हीं एकमेकांच्या जागा बदला, आणि मग पहा तुमचं भांडण मिटतं कीं नाहीं तें! ". दोघांनींही जागा बदलल्या आणि पाहातात तों काय? ' चांदीची आहे ' ' चांदीची आहे ' म्हणून घसा फोडणारा उद्गारला, " अरे खरेंच, सोन्याची आहे कीं! " तीच स्थिति सोन्याची आहे म्हणणाराची झाली. आणि आपल्या भांडणांत कांहींच तथ्य नव्हतें, अशी दोघांचीही खात्री पटली.

या गोष्टीची आठवण व्हावयाचें कारण एवढेंच, कीं नुकताच अगदीं अशाच तऱ्हेचा एक कडाक्याचा वादविवाद माझा आणि माझ्या एका

मित्राचा झाला. एका प्रसिद्ध लेखकाचा लघुकथासंग्रह आम्हीं वाचायला घेतला होता, आणि आम्हीं दोघेही त्याविषयीं बोलत होतों.

" भिकार आहे पुस्तक अगदीं ! " माझा मित्र उद्गारला.

" काय ? — भिकार आहे ?...इतक्या सुंदर लघुकथा मराठींत अजून कुणींच लिहिलेल्या नाहींत, असं मला वाटतं ! " मी म्हणालों.

" खूपच रसिक आहांत तर मग तुम्ही ! " तो हेटाळणीच्या स्वरात म्हणाला. झाली भाडणाला सुरुवात ! बराच वेळ शब्दाशब्दी झाल्यावर मी म्हणालों, " कुठच्या रे गोष्टीला तूं भिकार म्हणतोस ? "

तो म्हणाला, " अमुक... "

ती गोष्ट मी वाचलेली नव्हती. त्याचप्रमाणें ज्या गोष्टीचें नांव मीं सांगितलें, तीही त्यानें वाचलेली नव्हती. शेवटीं त्यानें सागितलेली गोष्ट मीं वाचून पाहिली, आणि ती खरोखरच टाकाऊ होती. लेखकाचा तो अगदीं नवशिका प्रयत्न होता. आणि मीं सुचविलेली गोष्ट वाचून पाहिल्यावर ती उत्कृष्ट असल्याचें माझ्या मित्राचेंही मत पडलें.

आपलीं किती तरी भांडणें आशाच प्रकारचीं असतात. दुसऱ्याची भूमिकाच समजून न घेता आपण बोलतों, आणि केव्हा केव्हा याचा परिणाम परस्पराच्या अंतःकरणांत निष्कारण कडूपणा उत्पन्न करण्यांत होतो. मला वाटतें दुसऱ्याच्या डोळ्यांनीं पाहण्याची थोडीशी तरी संवय आपण प्रत्येकानें लावून घेतली पाहिजे.

मात्र केव्हा केव्हां विरुद्ध भूमिकावरून एकाच गोष्टीचा विचार करतांना भाडणें न होता आश्चर्यकारक मतैक्यसुद्धां होतें. एकदां एका आजीबाईचें आणि माझें कमालीचें एकमत झालें !

" हल्लींच्या बायका अगदींच निःसत्त्व ! " आजीबाई संतापानें म्हणाल्या.

" नाहीं तर काय ?... " मी म्हणालों.

आजीबाई अगदीं खूश झाल्या माझ्यावर; पण जर का कुणीं आमचें असें कां मत आहे म्हणून कारणें विचारलीं असतीं, तर मात्र मोठाच घोटाळा झाला असता ! आजीबाई आधुनिक बायकांना वाईट म्हणत होत्या, कारण

आजीबाईंना हव्या होत्या तितक्या त्या मागासलेल्या नव्हत्या म्हणून ! आणि मी त्यांना वाईट म्हणावयाचें कारण माझ्या कल्पनेइतक्या त्या पुढारलेल्या नव्हत्या म्हणून ! तरीपण केव्हां केव्हा उत्तरध्रुवाशीं दक्षिणध्रुवाची अचानकपणें गाठ पडते ती अशी !

वरील सर्व विवेचनावरून जर कुणी असा तर्क करील, कीं मी सुवर्णमध्यवादी संशयात्मा आहें म्हणून, तर मात्र मला त्याचा लगेच इन्कार करावा लागेल. माझें म्हणणें एवढेंच, कीं नेहमीं दुसऱ्याची भूमिका समजावून घेण्याचा प्रयत्न करावा. त्याचा अर्थ असा नव्हे, कीं नेहमीं दोन्ही बाजूना थोडें थोडें सत्य असतेंच व आपण वेळीं अवेळीं दोहोंच्या मधलीच बाजू मांडीत राहावें ! वाघाच्या आणि बकऱ्याच्या झटापटींत बकऱ्यानें 'प्राण वाचवा', म्हणून आक्रोश केला असता, आमचे सुवर्णमध्यवादी म्हणणार कीं, "थांबा ! बकऱ्याची बाजू समजली, आतां वाघाची बाजू काय आहे ती आपण शांतपणें समजावून घेतली पाहिजे ! आणि मगच काय करावयाचें तें ठरविलें पाहिजे."

एका सुवर्णमध्यवादी याचकाचा एक सुरेख युक्तिवाद मला आठवतो, तो सांगितल्याशिवाय माझ्यानें राहवत नाहीं.

यजमानाकडे कांहीं मागण्याकरितां हा गृहस्थ गेला असता त्याला हात हालवीत परत यावें लागलें, तेव्हां त्यानें पुढीलप्रमाणें स्वतःचें समाधान करून घेतलें :

"कांहीं मिळेल अशी आशा वाटत होती, ती व्यर्थ झाल्यामुळें दुःख झालें; पण यजमान कमरेवर लाथ मारून घालवून देईल अशी मला सारखी भीति वाटत होती, ती निराधार ठरल्यामुळें आनंदही झाला !"

मला वाटतें सुवर्णमध्यवादाचा हा परमोत्कर्षबिंदु होय !



# ४

## " स्वतःच्या दुःखाचा मोबदला देऊन दुसऱ्याची सहानुभूति विकत घेण्याचा व्यापार..."

मला जर कोणाचा मनस्वी राग येत असेल तर तो वेळीं अवेळीं सदा-सर्वकाळ स्वतःच्या दुःखाचें प्रदर्शन माडणाऱ्याचा. मला वाटतें, स्वतः दुःखी आहोंत या गोष्टीचा या लोकांना मोठा अभिमान वाटतो, आणि लोकांना एकदा आपले दुःख ऐकविलें, कीं लोक आपली फार थोर माणसांत गणना करतील अशी यांची कल्पना असते. एका डॉक्टरला मोठमोठ्या समारंभांतून किंवा मेजवानीच्या प्रसंगीं पाहुणे मंडळींत गप्पाष्टकें सुरू झालीं म्हणजे स्वतःची एक गोष्ट मोठ्या अभिमानानें कथन करताना मीं दोन-तीनदां ऐकिलें आहे. आपलें स्वतःचें अपेंडिसायटीस्‌चें ऑपरेशन् झालें होतें, तेव्हां आपल्या पोटाची पुरे आठ इंच फाड करावी लागली, आणि हें सर्व ऑपरेशन् तब्बल दोन तास चाललें होतें, हीच ती सर्व जगाला पुरून उरणारी गोष्ट !

सर्व जग स्वतःमध्यें सामावल्याचा या लोकाना भ्रम झालेला असतो, आणि स्वतःचें दुःखविमोचन म्हणजे साऱ्या जगाचें कल्याण अशी यांची कल्पना असते. माझ्या ओळखीचा एक गृहस्थ आहे, त्याचा स्वतःच्या

दुःखाचें रसभरित वर्णन करण्यांत अगदीं हातखंडा आहे. तुम्ही कांहींही बोलत असा, हा कांहींना कांहीं तरी स्वतःच्या दुःखाची गोष्ट मध्येंच घुसडून द्यावयाचाच !

एकदां आम्हीं कांहीं मौजेच्या गोष्टी बोलत बसलों होतों. हाही गृहस्थ तेथें होताच. गोष्टी अगदीं रंगांत आल्या होत्या. तेव्हा हा मध्येंच म्हणाला, " परवा काय गम्मत झाली बघा..." कांहीं तरी मजेदार गोष्ट ऐकायला मिळणार म्हणून आम्ही मोठ्या उत्सुकतेनें त्याच्या तोंडाकडे पाहूं लागलों.

" गम्मत काय झाली, माझ्या कपाळाची डाव्या बाजूची शीर अशी कांहीं ठणकायला लागली......"

आता हा आपल्या अर्धशिशीचा साद्यंत इतिहास निवेदन करणार, या विचारानें आमचे चेहरे काळवंडून गेले. आमचा सारा आनंद मावळून त्या दिवसाची संध्याकाळ फुकट गेली.

प्लेगचा फैलाव करणाऱ्या उंदराचा ज्याप्रमाणें मिळेल तेथें पकडून आपण नायनाट करतों, त्याप्रमाणें सर्व जगभर दुःख पसरविणाऱ्या या लोकाचा कांहीं तरी निकाल लावला पाहिजे, असें माझें प्रामाणिक मत आहे.

अशाच तऱ्हेच्या लोकाचा दुसरा एक वर्ग आहे. त्यांना आपण ' सदा-सुतकी ' म्हणूं. जगात कांहींही होवो, त्याचें या लोकांना सुतक असतें ! यंदा काय तर अमुक पुढारी पकडले गेले, तेव्हां दिवाळींत लहान मुलांनीं फटाके उडवून आनंद करूं नये; शेंकडों लोक या महिन्यात तुरुंगांत गेले आहेत, तरी लग्नसमारंभाना वाजंत्रीं आणूं नयेत; जपानात धरणीकंप होऊन आपले लाखों जपानी बांधव भयंकर रीतीनें प्राणाला मुकले; म्हणून त्यांच्या आत्म्यांना शांति मिळण्यासाठीं आपण सर्व हिंदवासीयांनीं चोवीस तास कडकडीत उपवास केला पाहिजे.

अशा तऱ्हेनें केव्हांही कोणाच्या तोंडावर हास्याची उकळी फुटूं नये म्हणून हे लोक फार सावधगिरी बाळगीत असतात. माझ्या मतें समाज-स्वास्थ्याच्या दृष्टीनें वरील दोन्ही तऱ्हेच्या लोकांसाठीं एक मोठा थोरला कोंडवाडा उघडावा, आणि त्यांत या सर्वांना सोडून द्यावें. म्हणजे एक-

मेकांना एकमेकांचीं दुःखें सागत, आणि जन्मभर कसलें ना कसलें तरी सुतक पाळीत हे लोक मोठ्या आनंदांत त्या कोंडवाड्यांत राहतील, आणि लोकही आपापलीं कामें आनंदानें करावयाला मोकळे होतील !

याच्या उलट तऱ्हेनें वागणारांना मात्र मी खचित वंदनीय महाभागच म्हणेन. एका इटालियन विदूषकाची गोष्ट कुठेंतरी वाचलेली मला आठवते. त्याची अत्यंत लाडकी, एकुलती एक मुलगी त्या दिवशीं मरण पावली होती आणि अंतःकरणांत दुःखाची खाई पेटली असताना रंगभूमीवर नाचून, बागडून, वेडींवांकडीं तोंडें करून, आणि नाना तऱ्हेच्या गमती करून, तो हजारों लोकांच्या हंसतां हंसता मुरकुंड्या वळवीत होता.

ही एक एकांतिक गोष्ट झाली, आणि स्वतःच्या दुःखाचे बांध प्रियजना-समोर मोकळे सोडले म्हणजे खूप हलकें वाटतें हेंही खरें आहे. पण म्हणून उठल्यासुटल्या स्वतःच्या दुःखाचा मोबदला देऊन दुसऱ्याची सहानुभूति विकत घेण्याचा व्यापार करणें केव्हाही क्षम्य ठरणार नाहीं !



५

## " एकाला जें अमृत, तें दुसऱ्याला विष "

स्मशानांतसुद्धां केव्हां केव्हां गमतीच्या गोष्टी ऐकावयाला मिळतात, असें जर मीं म्हटलें तर माझ्यावर कोणीही राक्षसी वृत्तीचा आरोप करील. पण खरोखरच माझ्या एका मित्रानें ऐकलेली पुढील गोष्ट किती गमतीची आहे, हें वाचल्याबरोबर तो आरोप मागेंच घ्यावा लागेल. एकदां सहज स्मशानाच्या बाजूला तो फिरावयाला गेला होता, आणि दरवाज्यापाशीं असलेल्या जळाऊ लांकडाच्या दुकानाशीं तो सहज उभा राहिला असतांना आंत चाललेला पुढील संवाद त्याच्या कानांवर पडला. दुकानदार अगदीं मनःपूर्वक आपल्या पाहुण्याशीं बोलत होता :

" काय करावं हो ! धंद्याला असे हलाखीचे दिवस अगदीं कधींच आले नव्हते, बुवा. नाहींतर गेल्या एन्फ्ल्युएन्झाच्या साथीचे दिवस; महाराज, रोजचा गल्ला सांगितला तर तुमचा विश्वास बसणार नाहीं ! "

मुंबईची त्या वेळची हवा अत्यंत छानदार होती. रोगराई कांहीं नव्हती आणि एकंदर शहराचें आरोग्य उत्तम असल्यामुळें लोकांना आनंद वाटण्यासारखी ती गोष्ट होती; पण त्या वेळींही त्या स्थळीं असा एक मनुष्य होता कीं, जो दुःखांत चूर झाला होता ! आणि एन्फ्ल्युएन्झाच्या साथींत सारी जनता हवालदिल झाली असतांना जो आनंदाच्या सागरांत पोहत होता !

कोणी म्हणेल कीं, शेजारच्या घराला आग लागली असताना त्यावर स्वतःची पोळी भाजून घेण्याचाच हा प्रकार ! पण माझ्या मतें वरीलप्रमाणें त्या दुकानदारावर दुष्ट हेतूचा आरोप करणें न्याय्य होणार नाहीं. त्याची अशी इच्छा नव्हती, कीं खूपसे लोक मरावे व त्यावर आपली चलती व्हावी ! पण पोटाचा धंदा लाकडें विकण्याचा असल्यामुळें तो धंदा खालावल्याबरोबर दुःख होणें; व त्या धंद्याला ऊर्जितावस्था आली असता आनंद होणें साहजिकच होतें. अर्थात् असें होण्याचीं कारणें काय होतीं, याची त्याला स्पष्ट जाणीव खास नव्हती. पण प्रस्तुत समाजाची रचनाच मुळीं एकप्रकारच्या विषमतेच्या पायावर झालेली असल्यामुळें वरील प्रकार होणें अगदीं अपरिहार्य आहे. आणि त्यावरून एखाद्या व्यक्तीला दुष्ट अगर सुष्ट म्हणणें केव्हांही योग्य होणार नाहीं.

सध्यांच्या समाजव्यवस्थेंत एका वर्गाचे हितसंबंध दुसऱ्या वर्गाशीं असे काहीं निगडित झाले आहेत, कीं एकाला जें अमृत तें दुसऱ्याला विष ! वस्तु खूप महाग विकणें हें विकणाराचें ध्येय, तर त्या वस्तूला शक्य तितकी कमी किंमत देणें, ही विकत घेणाराची महत्त्वाकांक्षा ! बर्नार्ड शॉ आपल्या एका नाटकाच्या प्रस्तावनेंत म्हणतात, कीं एखाद्या शहराला जितक्या डॉक्टराची जरूरी आहे तितकेच डॉक्टर तेथें राहूं द्यावेत, आणि ते सुद्धा सरकारी पगारा-वर ! नाहीं तर समाजाला तें धोक्याचें आहे. लोकाच्या शरीराची चिरफाड करणें हें जर उपजीविकेचें साधन असेल, तर पोटाला चिमटा बसावयाचा प्रसंग आला असताना कांहीं तरी थाप मारून एखाद्याचा न कापतां बरा होण्यासारखा अवयव कापून टाकण्याचा मोह एखाद्या शस्त्रकलाविशारदाला कां होणार नाहीं ? म्हणूनच समाजाला अत्यंत जिव्हाळ्याचा असा हा धंदा खासगी उत्पन्नाची बाब करून गबर होण्यासाठीं वाटेल तितक्या व्यक्तींना मोकळा ठेवणें धोक्याचें आहे. नाहीं तर वर उल्लेखिलेल्या लांकूडविक्यासारखा प्रकार व्हावयाचा ! पण समाजाचे सर्वच व्यवहार जोंपर्यंत चढाओढीच्या तत्त्वावर अधिष्ठित झालेले आहेत, आणि खासगी मालमत्ता हेंच सर्व व्यवहारा-चें ध्येय आहे, तोंपर्यंत डॉक्टरीच्याच एका धंद्याला हें तत्त्व लागू करणें केवळ मूर्खपणाचें होईल. सर्व उत्पादनाच्या आणि समाजहिताच्या साधनांवर जोंपर्यंत सर्व समाजाची सत्ता नाहीं आणि चढाओढीचें जीवन हेंच समाजाला

शांतिप्रद आणि हितावह आहे असें जोंपर्यंत स्वतःला मानवतेचे मित्र म्हणविणारे खरोखर बुद्धिवान् बदमाष असलेले समाजाचे नेते म्हणत आहेत, तोंपर्यंत असले हे प्रकार चालावयाचेच; मग ते कितीही विचित्र दिसोत, किंवा कोणाला ते कितीही कडू वाटोत!

आद्य नाट्यछटाकारांच्या ' पंत मेले — ' आणि ' राव चढले ' या नाट्यछटा मला आठवतात; एकासमोर एक अशा त्या छापल्या आहेत. पहिल्या छटेंत पंत मेल्यानंतरचें त्याच्या घरचें हृदयद्रावक नाट्यचित्र रेखाटलें आहे. बाप मेल्यामुळें पोरका झालेला मुलगा माधुकरी मागावयाला जातांना आपल्या रडणाऱ्या बहिणीला, ' रडूं नको, मी वरणभात आणून तुला घालीन, आईला तूं बाबासंबंधीं विचारून रडवूं नकोस, ' अशा तऱ्हेनें समजावीत आहे.

दुसऱ्या छटेंत पंत मेल्यामुळें रिकामी झालेली जागा रावांना मिळून पांच रुपये प्रमोशन मिळाल्यामुळें त्यांच्या घरीं झालेला आनंदीआनंद वर्णिला आहे. हपिसांतून येतांना पेढे घेऊनच राव घरीं आले आहेत. आपल्या सोनीला, बापूला ' देवाच्या पाया पडा ', म्हणून सांगून हवे तितके पेढे उदारपणें देत आहेत; मित्राला सांगताहेत कीं, ' इतके दिवस रात्रंदिवस वाट पाहिल्याचें परमेश्वरानें शेवटीं सार्थक केलें! सहा वर्षांनीं पंधराचे वीस रुपये झाले. आणि ते सुद्धां पंत मेले आणि त्यांची जागा मिळाली म्हणून! '

आता बिचाऱ्या रावांना आणि त्या गरीब बापड्या लांकूडविक्याला दोष द्यावयाचा, कीं असल्या प्रसंगांना वाव देणारी दुष्ट समाजरचना बदलावयाची!



६

## " आत्मप्रतीति...आंतले आवाज, आणि अंतःकरणप्रवृत्ति......"

माझा एक मित्र आहे त्याचा धंदा डॉक्टरीचा; तरीपण आमच्या संगतीमुळें त्याला लघुकथा, नाटकें, काव्यवाङ्मय वगैरे वाचण्याचा बराच नाद आहे. एकदां तो एक कवितांचें पुस्तक घेऊन माझ्याकडे आला आणि अगदीं त्रासून म्हणाला, " हें काय आहे बुवा, पत्ता लागत नाहीं आपल्याला! हें गूढ काव्य म्हणजे काय गौडबंगाल आहे? 'अभावाचा भाव' काय? 'अमूर्त मूर्त मूर्तिमंत' काय? तुम्हाला तरी यांत कांहीं कळत असेल तें सांगा बुवा आम्हाला."

" तुमच्याइतकेच या बाबतींत आम्ही हतबुद्ध आहोंत, बाबा!" मीं त्याला उत्तर दिलें. बिचारा निराश होऊन चरफडत परत गेला.

मी या गोष्टीचा विचार करीत असतांना एक मोठी मौज झाली. माझ्या ओळखीचा एक प्रख्यात परप्रांतीय कवि आहे. अत्यंत सुंदर कविता लिहितो तो; आणि आतांपर्यंत त्यानें बरींच नितांत रमणीय गूढ काव्यें लिहिलीं आहेत. हल्लीं मात्र त्याला या गोष्टीचा वीट येऊन तो पायांखालीं चिरडल्या जाणाऱ्या हीन, दीन, दलितवर्गाच्या सुखदुःखांचीं सुंदर काव्यें गात असतो. त्याला

कांहीं कारणामुळें चारसहा महिने जवळ जवळ निर्जन अशा प्रदेशात अज्ञातवास काढावा लागला. तेव्हा त्याला मीं सहज विचारलें, " काय रे, तुला चांगलाच एकान्त मिळाल्यामुळें या चारसहा महिन्यात तूं खूप गूढ कविता लिहिल्या असशील ? "

" एकही गूढ कविता मी लिहिली नाहीं. " तो म्हणाला.

" म्हणजे ? "

" अरे, म्हणजे काय ? त्या ओसाड गावात व्हिस्कीचा पेग् कुठचा मिळणार मला ? " तो हंसत म्हणाला.

" अस्सं ! " मी उद्गारलों.

त्याच्या स्वतःच्या गूढ काव्य-निर्मितीची ही मीमांसा मला पटली. म्हणून मात्र माझें असें म्हणणें नाहीं, कीं प्रत्येक गूढात्म काव्याचा किंवा प्रतीतिप्रचुर लिखाणाचा उगम ' एकच प्याल्यां 'त आहे म्हणून ! उलट पक्षीं अशा तऱ्हेचें लिखाण लिहिणाऱ्या लेखकांत किती तरी अत्यंत प्रामाणिक व उच्च दर्जाचे कलावंत लेखक आहेत. व्हिस्कीच्या मदतीनें मनाला आत्मप्रतीतीची उन्मादावस्था आणणें सोपें जात असेल, पण मद्याच्या मदतीशिवाय ती अवस्था प्राप्त करून घेणें कठीण आहे, असें नाहीं. हा प्रश्न स्वयंसूचना ( *Autosuggestion* ) करण्याची शक्ति कोणांत किती आहे त्यावर अवलंबून राहील. मला वाटतें, या संवयीची काळजीपूर्वक जोपासना केल्यास हें अगदीं सहज साध्य होत असेल. अगदीं अशिक्षित वर्गातसुद्धा आपण पाहतों, कीं माड माडून ते जेव्हां देवाला बोलावतात, तेव्हा नेहमीं अंगात येणारा त्यांच्यातला धंदेवाईक हळू हळू मान हालवून घुमूं लागतो आणि कांहीं वेळानें तो इतका बेफाम घुमतो, कीं आजूबाजूला जमलेल्या भाविकाची त्याच्या अंगांत देव संचारल्याची पूर्ण खात्री होऊन ते त्याला भक्तिभावपूर्वक निरनिराळे प्रश्न विचारतात.

गूढगुंजनवादी म्हणतात, कीं आम्हाला एकदम दिव्य प्रतीति होते आणि सान्ताचे दरवाजे खाडकन् उघडून अनंताचें दर्शन होतें. असेल; कारण आपणाला अनुभव आहेच, कीं केव्हां केव्हा आजारी माणसाच्या डोळ्या-

पुढेंसुद्धा मेंदू फाजील तापल्यामुळें नाना तऱ्हेचे घोर भयानक किंवा दिव्य-रमणीय देखावे दिसतात. हीसुद्धा त्यांची प्रचीतीच म्हटली पाहिजे.

आत्मप्रतीतीला कारणसुद्धां क्षुल्लक पुरतें. प्रियेच्या ओंठाला या प्रतीति-वाद्यांचा ओंठ लागतो न लागतो, तोंच नीलाकाशात तारका जागच्या जागीं थबकतात; वारे स्तंभित होऊन मेल्यासारखे निश्चेष्ट पडतात; वर्षानुवर्षे वांकून गेलेल्या झाडाना पालवी फुटून सुगंधी कळ्याचा बहर येतो; आणि केवळ या दोन जन्तूंमधील उपरिनिर्दिष्ट प्रसंगासाठीं स्पेशल ड्यूटीवर असलेला परमेश्वर विश्वव्यापाराचे आपले सारे उद्योग सोडून देऊन त्याच्याकडे धावत येतो, व सान्ताचे दरवाजे खोलून याना अनन्ताचें दर्शन देतो.

खरा मुद्दा असा आहे, कीं शरीरशास्त्राच्या नियमांना अनुसरून दोन विरुद्धलिंगी प्राणी निसर्गाचा एक विशिष्ट हेतु साधण्याकरिता – मानवजातीचें सातत्य राखण्याकरिता – एकमेकांकडे आकर्षिले जातात. हा स्त्रीपुरुषांमधील एकंदर भावनाकल्पनाचा मूलभूत पाया. अर्थात् इतर प्राण्यांहून मनुष्यप्राणी बुद्धिविशिष्ट असल्यामुळें या संबंधाला अनेक उदात्त आणि सूक्ष्म भावनाचीं नाजुक वेष्टनें जडलीं आहेत, हें खरें आहे आणि त्याविरुद्ध कोणी आक्षेपही घेणार नाहीं. पण म्हणून जो तो उठला सुटला लुंग्यासुंग्या ‘ परमेश्वरी संकेता ’ नें आमची प्रीति जडली, आणि ती जडली तेवढ्यानेंच आमच्या आयुष्याला, आणि आमच्या आयुष्याला म्हणून साऱ्या जगाला पूर्णता आली, असल्या थापा – मग त्या गद्यात असोत अगर पद्यात असोत – जर मारूं लागला तर त्याला वेळींच शुद्धीवर आणणें जरूर आहे.

स्पष्ट बोलावयाचें म्हणजे या लोकांना दारुण आत्मनिष्ठतेचा दुर्धर रोग लागलेला आहे आणि त्या रोगाचीं रमणीय ललितचित्रें काढण्यापेक्षां या लोकांनीं स्वतःची प्रकृति एखाद्या शरीरविकृतिशास्त्र-विशारदाकडून ( *Pathologist* ) आमूलाग्र तपासून घ्यावी.

अशाच तऱ्हेचे दुसरे कांहीं लोक आहेत. त्यांना अंतःकरणाच्या ‘ आंतले आवाज ’ ऐकूं येतात ! मला लहानपणीं माझा ‘ आंतला आवाज ’ सांगत असे कीं, “ घरांतील सर्व मंडळी बाहेर गेली म्हणजे खुर्चीवर चढून फळी-वरचा डबा काढ आणि आंतला लाडू गुपचूप खाऊन टाक ! ”

सध्यां माझ्या एका शेजाऱ्याचा ‘ आंतला आवाज ’ त्याला सागतो आहे कीं, “ घरवाल्याला चारपाच महिने भाडें देऊं नको, आणि खूपसें भाडें तुंबलें म्हणजे एक दिवस कोणाला न कळविता यःपलायन् कर ! ” अशा तऱ्हेने अनेकांचे ‘ आंतले आवाज ’ अनेक गोष्टी सांगतात. अर्थात् एखाद्या मोठ्या माणसाला त्याचा ‘ आंतला आवाज ’ “ तूं जगाला असं कर, तसं करूं नको ! ” असेंही सांगावयाला सांगतो. तरी पण प्रत्येकाला त्याच्या आतल्या आवाजाबरहुकूम वागण्याला जर वाव मिळाला, तर जगात बजबज-पुरी माजेल. म्हणून मला वाटतें, या सर्व ‘ आतल्या आवाजा ’ना ताळ्यावर आणण्यासाठीं एखाद्या सणसणीत ‘ बाहेरच्या आवाजा ’ची जरूरी आहे !

याचें उत्तम उदाहरण म्हणजे कालिदासाचा दुष्यंत. एका निरागस, जानपद कन्यकेचा कौमार्यभंग करावयाचा, आणि या गुन्हेगार कृत्याचा बचाव काय तर, “ सत् हि संदेहपदेषु वस्तुषु प्रमाणमंतःकरणप्रवृत्तयः ! ” वा ! अगोदर स्वतःच स्वतःला सज्जन ठरवावयाचें, आणि मग सज्जनाच्या अंतःकरणाला वाटलें तें चागलेंच असलें पाहिजे, हा जबरदस्त पुरावा ! अशा माणसाला उत्कृष्ट उत्तर म्हणजे, एखाद्यानें सागावयाचें कीं “ मी सुद्धा स्वतःला ‘ सत् ’ समजतों, आणि माझ्या अंतःकरणाची प्रवृत्ति अशी आहे कीं, तुला शहराच्या चौकांत उभा करून तुझ्या उघड्या पाठीवर चाबकाचे फटके उडवावे ! ”

‘ आतल्या आवाजा ’च्या आणि ‘ अंतःकरणप्रवृत्ती ’च्या या सर्व गोष्टी, म्हणजे सडक्या आत्मनिष्ठतेचा आणि आचरट अहंतेचा गगनचुंबी कळस होय ! मग त्याला स्वार्थत्यागाच्या देखाव्याचा किंवा जगत्कल्याणी संतपणाचा कितीही मुलामा दिलेला असो !



७

## " घड्याळाचे गुलाम......"

कोणा एका थोर गृहस्थाची आख्यायिका सांगतात, कीं त्याच्या जाण्या-येण्याच्या वेळेवरून लोक घड्याळें लावून घेत असत. मी तरी या गृहस्थाला थोर म्हणण्याऐवजीं घड्याळाचा गुलाम म्हणेन! माणसानें स्वतःच्या सुख-सोयीसाठीं घड्याळाचा शोध लावला, आणि आम्ही केव्हां काय करावें या-संबंधांत घड्याळानें आमच्यावर सोटेशाही चालवावी, हें किती लांछनास्पद!

मीं तर या गृहस्थाला स्पष्ट म्हटलें असतें,

" अरे गृहस्था! अनियमित वागून होतं तरी काय, हें पाहण्याच्या साध्या कुतूहलानं तरी एक दिवस अनियमित वागायचं होतंस!" रोज त्याच वेळीं तेंच करण्याचा काय हा यांत्रिक मठ्ठपणा! मला वाटतें, 'नेमेंचि येतो मग पावसाळा। हें सृष्टिचें कौतुक जाण बाळा।' हें प्रख्यात काव्य रचणारा महा-कवि या लोकांचा गुरु असावा! नेमलेल्या वेळीं बिनचूक पावसाळा येतो, यात कौतुक कसलें? नेमलेल्या वेळीं न आला तरच कौतुक! सूर्य रोज उग-वतो त्याचें कुणालाच कौतुक वाटत नाहीं. पण तोच धूमकेतु केव्हा तरी अचानकपणें आकाशांत सुळकांडी मारून जातो, त्याचें किती कौतुक वाटतें! त्याचप्रमाणें सूर्य एखादे दिवशीं न उगवेल तर खरें कौतुक!

अनियमितपणानें आयुष्याला येणारें वैचित्र्य, किंवा अचानकपणाची खुमारी या वक्तशीर लोकांना जन्मांत चाखावयाला मिळावयाची नाहीं. या अचानकपणावरून मला एक मोठी गमतीची गोष्ट आठवते : एक गृहस्थ

माझी नेहमीं स्तुति करीत असे; आणि स्तुति कुणाला आवडत नाहीं ? साहजिकच तो मनुष्य मोठा भला आहे, अशी माझी कल्पना होती, आणि माझ्याविषयींही त्याचें फार चांगलें मत आहे, असें मला वाटत होतें. एकदां त्यानें मला तीन वाजता चहाला बोलाविलें होतें, पण कांहीं कारणामुळें मी अडीच वाजतांच अचानकपणें त्याच्या दाराशीं पोहोंचलों. मी आल्याची आंत चाहूल लागली नव्हती. त्यामुळें जोडा काढीत असता माझ्यासंबंधीं पुढील उद्गार तो आपल्या दुसऱ्या एका मित्राशीं काढीत असलेले माझ्या कानांवर पडले — " ती पीडा येईल आतां तीन वाजता ! खरं म्हटलं तर मी त्याला बोलावणार नव्हतों आज, पण म्हटलं वकील आहे, उपयोग होतो केव्हां केव्हां फुकटात नोटिसा द्यायला ! "

मी पाय न वाजवता मागच्याच पावलीं घरीं परत गेलों. दुसऱ्या दिवशीं हा गृहस्थ मला रस्त्यांत भेटला. तेव्हां या कानापासून त्या कानापर्यंत हंसतमुख करून तो अगदीं कळवळ्यानें म्हणाला, " काल आलात नाहीं तुम्ही ? विरस झाला आमचा अगदीं ! "

" अस्सं " मी म्हणालों

वरील गोष्टीवरून मात्र जर कुणी अनियमित वागण्याचा नियम करील तर तेंही नियमितपणाच्या सर्व दोषामुळें तितकेंच कंटाळवाणें होईल. असाच एक गृहस्थ आहे. त्याला तुम्हीं जर पाच वाजतां चहा प्यावयाला बोलावलेंत, तर तो नेमका सहा वाजतां यावयाचा ! त्याचा हा अनियमितपणा इतका नियमित झाला आहे, कीं त्याला पाच वाजतां चहाला बोलवावयाचें असल्यास आम्ही त्याला बरोबर चार वाजतां ये म्हणतों, एवढेंच. असल्या अनियंमितपणात कांहींच अर्थ नाहीं.

वक्तशीरपणावरचे वक्ते नेहमीं कंठरवानें सांगतात, कीं नेपोलियन्च्या रणांगणावरील यशाची गुरुकिल्ली हीच, कीं तो नेहमीं ठरलेल्या वेळेच्या आधींच दहा मिनटें रणांगणावर हजर असायचा. पहिली गोष्ट ही कीं, दहा मिनिटें आधीं हजर राहणें, हा मुळीं वक्तशीरपणाच नव्हे. दुसरी गोष्ट अशी कीं, तो जर नियमितपणें दहा मिनिटें आधीं येत असे, तर त्याच्या शत्रूंनीं फक्त एकच गोष्ट करावयाची. नेपोलियन्च्या येण्याचा वेळ कळला कीं त्याच्या आधीं पंधरा

मिनिटें रणागणावर ठाण मांडायचें! पण माझ्या मतें ही आख्यायिकाच मुळीं अजिबात खोटी असावी. नेपोलियन् इतका मूर्ख असता, तर तो कधींच यशस्वी झाला नसता. मला वाटतें, केव्हा केव्हा ठरलेल्या वेळेच्या आधींच दहापंधरा मिनिटें, तर कधीं कधीं दोनतीन तास उशिराच तो रणागणावर जात असावा! व त्यामुळें त्याचे शत्रू गोंधळून जाऊन पराजित होत असावेत. नाहीं तर साडेतीनची वेळ असली, कीं हा तीन वाजून वीस मिनिटांनीं रणागणावर येणार, हें माहीत असूनसुद्धां ते जर वेळेवर येत नव्हते, तर ते शत्रूच बावळट असले पाहिजेत; आणि असल्या बावळटांवरच जर नेपोलियन्नें विजय मिळविले असतील, तर त्यांत मला तरी त्याचा कांहीं मोटेपणा वाटत नाहीं.

नेपोलियन्‌ची गोष्ट कशाला? मीं स्वतः असल्या डावपेंचानीं माझ्या शत्रूंचे हल्ले परतविले आहेत! एकदां माझा शाळेंतला दोस्त कितीतरी वर्षांनीं रस्त्यात भेटला. बोलता बोलता आपण सध्या एका विमा कंपनीचे एजंट आहोंत, हें तो बोलून गेला. आणि कांहीं वेळानें त्यानें सहज प्रश्न केला कीं, “ तूं घरीं केव्हांसा असतोस रे? ” या साध्या प्रश्नाच्या मागून डोकावत असलेला त्याचा पापी हेतू माझ्या तेव्हाच ध्यानात आला! शाळेंत दोस्ती केल्याच्या अपराधाबद्दल हा माझा असा सूड घेईल, असें मला वाटलें नव्हतें! मीं त्याला हंसत हंसत उत्तर दिलें, “ सकाळीं आणि संध्याकाळीं बहुतेक असतों मी घरीं. ” त्या दिवसापासून आपल्या सर्व कामाकरितां सकाळ-संध्याकाळ बाहेर फिरावयाचें, व फक्त दुपारीं आणि मध्यरात्रीनंतर घरीं राहावयाचें, असा परिपाठ मीं सुरू केला. त्या अवधींत बरेच वेळां तो घरीं येऊन गेल्याचें मला कळलें. इतक्यांत एका भयंकर विचारानें माझ्या छातींत धस्सदिशीं गोळा आला. काय हा आपण भलताच नियमित अनियामितपणा चालवला आहे! एकदम आपले जुने डावपेंच बदलून हा एखाद्या दिवशीं दुपारींच घरीं आला तर? पुन्हा दुसऱ्या दिवसापासून मीं नवा कार्यक्रम सुरू केला. सकाळ-संध्याकाळ घरीं राहावयाचें व दुपारीं बाहेर फिरावयाचें. नेपोलियन्‌पेक्षांही माझे हे डावपेंच कल्पनातीत यशस्वी झाले आणि आजतागायत माझा विमा उतरलेला नाहीं!

नाहींतर आपण आपले जातों आहोंत रोज वेळच्या वेळीं, आणि लोक लावताहेत आपलीं घड्याळें आमच्या जाण्यायेण्यावर! ● ● ●

८

## " माझा स्वभाव असा आहे...... ! "

" माझा आपला सरळ स्वभाव आहे ! पाहिजे तर चार पैसे मागून घेईन, पण तुमचा एक ताब्याचा तुकडा जरी कुठं पडलेला असला, तरी त्याला हात लावणार नाहीं ! हो, आपला व्यवहार सरळ ! " या वाक्यानें आपलें ब्रीद जाहीर करीत आमच्या नव्या स्वयंपाकिणीनें घरांत प्रवेश केला. सर्व मंडळी खूश झाली तिच्या मोकळ्या स्वभावावर; पण मीं मात्र छातीवर हात ठेवून सांगितलें कीं, " ही चोऱ्या केल्याशिवाय राहत नाहीं ! " आणि लवकरच बडा भविष्यवादी म्हणून माझी सर्व घरांत ख्याती झाली ! पण भविष्यज्ञानाची या गोष्टीला कांहींच जरूर नव्हती. खरोखर सरळ असलेलें माणूस आपल्या सरळपणाची दवंडी पिटीत फिरत नाहीं. त्याचा सरळपणा वागणुकींत दिसतो; स्वतःच्या सरळपणाचे जाहीरनामे काढण्यात दिसत नाहीं !

पण मनुष्यस्वभाव मात्र हा असा आहे खरा ! आमचे गणूकाका आज वीस वर्षें मला सांगत आहेत,

" माझा स्वभाव भयंकर रागीट आहे ! एकदा राग आला, मग काय करीन नी काय नाहीं, त्याचा नेम नाहीं ! " हें वाक्य मी सतत वीस वर्षें ऐकतों आहें. पण या वीस वर्षांत मी एकदाही त्यांना खरोखर रागावलेलें किंवा रागावून विशेष कांहीं करतांना पाहिल्याचें आठवत नाहीं ! त्यांचा

एक मित्र आहे. तो नेहमीं कांहीं ना काहीं त्यांच्याकडून पैसे काढीत असतो आणि परत कधींच देत नाहीं. एकदा काकाना पैशांची फार जरूर होती. आणि त्या मित्रानें त्या दिवशीं पैसे आणून द्यावयाचें कबूल केलें होतें. त्याची यायची वेळ टळत चालली तसे काका मला सांगूं लागले, "त्याला माहीत नाही माझा स्वभाव किती भयंकर रागीट आहे तो! आता येऊं द्या त्याला पैशाशिवाय, मग पहिल्यांदा मुळीं दोन कानशिलातच वाजवतों. मग पुढच्या गोष्टी!"

इतक्यात तो मित्र येत असलेला माझ्या दृष्टीस पडला. आता वीस वर्षांनीं आपणाला एक भयंकर, रोमहर्षक दृश्य पाहावयास मिळणार, म्हणून मी श्वास कोंडून धरून वाट पाहात उभा राहिलों. तो मित्र जो सरळ गणूकाकाजवळ आला, तो एकदम उद्गारला, "काल तीन वेळा ती चक्कर येऊन पडली रे! ॲनिमिया झालाय् म्हणे! आठ इंजेक्शनं दिलीं पाहिजेत, डॉक्टर म्हणतात; नाहीं तर घडगत नाहीं आणि माझ्या खिशात तर विष खायला पैसा नाहीं!" तो गृहस्थ अगदीं रडकुडीस येऊन बोलत होता.

"अरे, असा वैतागतोस काय? काहीं तरी उपाय केलाच पाहिजे, वेड्या!" गणूकाका विरघळून म्हणाले.

"पाच रुपये दे रे मला, मग देतों तुझे," असें म्हणून गणूकाकानीं माझ्याकडून पांच रुपये घेतले, आणि त्या गृहस्थाला देऊन त्याला वाटेला लावलें. मी थंडच पडलों! तो गृहस्थ गेल्यावर मी म्हणालों, "काका, तुम्ही त्याच्या कानशिलांत वाजवणार होता ना? मग झालं काय?"

"अरे बाबा, वेळवखत बघून रागावलं पाहिजे. दारावर आलेल्या माणसाला काय मारून घालवून देतात?" असें म्हणून काकानीं मलाच मूर्ख ठरवला!

अशी जर वस्तुस्थिति आहे, तर यत्किंचितही सरळ नसलेला माणूस "माझा स्वभाव आपला सरळ आहे!" आणि मुळींच रागीट नसलेला मनुष्य, "माझा स्वभाव असा भयंकर रागीट आहे..." असें लोकांच्या कानींकपाळीं ओरडत कां फिरतो? मला वाटतें, आपणामध्यें एक मनाचा विशिष्ट दुबळेपणा आहे, आणि आपण तसें नाहीं असें जर जगाला भासविलें नाहीं, तर आयुष्यांतील

धकाधकीच्या प्रसंगाच्या माऱ्यानें आपलें व्यक्तित्व कुठच्या कुठें उडविलें जाईल, या भीतीनें प्रत्येक मनुष्य आपल्या भोंवती काही तरी नसत्या गुणाच्या चिनी भिंती उभारीत असावा. आपणांत नाहीं तें आहे, असें भासविण्याचा हा मनुष्यस्वभाव, म्हणजे आत्मसंरक्षणाचें एक मनोमय चिलखत ! किती तरी उदारहृदयी माणसें, " मी एक कवडीही कुठच्या धर्मादायाला देणार नाहीं ! " असें निक्षून सागत असतात आणि गुप्त रीतीनें किती तरी परोपकार करीत असतात. आपण उदार आहोंत असें बाहेर कळल्यास याचकांच्या झुंडीवर झुंडी लोटून आपल्या औदार्याचा अन्याय्य फायदा घेतला जाईल, या एकाच भीतीनें हे लोक आपण मुळींच उदार नाहीं असें भासवीत असावे.

आपण जसे नाहीत तसे आहोंत असें दाखविण्याचें कदाचित् निराळेंही कारण असेल. आपणांत जें कांहीं नाहीं तें असावें, किंवा आपण आहोंत त्यापेक्षा कितीतरी पटीनें मोठें किंवा निराळें असावें, अशी जबरदस्त आवड प्रत्येक माणसाला असते. अंतर्मनात दबून राहिलेल्या इच्छा आणि आकांक्षा मनुष्य निरनिराळ्या उपायांनीं तृप्त करून घेत असतो. रागीट नसलेला थंड स्वभावाचा मनुष्य, कडक स्वभावाचे लोक जगावर सत्ता चालविताना पाहातो; आणि आपणही रागीट आहोंत अशी कल्पना करून घेऊन, " माझा स्वभाव असा भयंकर रागीट आहे ! " असें सर्वांना सागत सुटतो ! तेवढेंच त्याचें समाधान ! लहान मुलांच्या इच्छाही या दृष्टीनें पाहाण्यासारख्या असतात. कुणाला तरवार घेऊन लढाईचे खेळ खेळावेसे वाटतात तर कुणाला आगगाडीचा ड्रायव्हर होण्याची इच्छा असते ! कुणाला दरोडेखोराच्या टोळीचे नायक व्हावेंसें वाटतें तर कुणी लग्नसमारंभातला बॅंडवाला होऊं इच्छितो ! प्रत्येकाला आपण कांहीं तरी प्रचंड करावेंसें वाटतें, आणि आपआपल्या प्रचंडत्वाच्या कल्पनेप्रमाणें प्रत्येकजण तसतशी इच्छा करीत असतो. सकाळपासून संध्याकाळपर्यंत खर्डेघाशी करणारे कारकून खूपसे कारकून बसले आहेत, आणि खरड खरड खरडताहेत असलें दृश्य ज्यांत आहे, असा सिनेमा पाहावयाला जाणार नाहीं. त्याला आवडणारें चित्र म्हणजे सुगंधानें दरवळलेल्या उपवनांत सुंदर पोशाख केलेला तरणाबांड राजपुत्र, आपण पळवून आणलेल्या सुकुमार राजकुमारीला आपल्या शक्तिशालि

बाहुपाशात कवटाळीत आहे ! असें हें दृश्य पाहून तारवटलेला कारकून गटाराची घाण येत असलेल्या आपल्या तळमजल्यावरच्या खोलींत परत येतो आणि डाळभात थंड होईल म्हणून वाट पाहात असलेल्या आपल्या हाडकुळ्या प्रियेला कडकडून मिठी मारतो ! जितकें हास्योत्पादक तितकेंच कारुण्यपूर्ण दृश्य आहे हें.

मला वाटतें, परमेश्वराच्या कल्पनेचें मूळही मनुष्यजातीच्या या स्वाभाविक इच्छेंतच असावें. सर्व जगावर सत्ता चालवावी; सूर्य, चंद्र, तारे मन मानेल तसे फिरवावे; ऋतु बदलावे आणि जगाचा गोल तळहातावर नाचवावा; अगणित प्राणी जन्माला घालावे, आणि सुचेल तेव्हां मृत्युसदनीं पाठवावे, पण आपण मात्र अमर राहावें !—मानवाच्या या उत्कट इच्छेचें परिणत स्वरूप म्हणजे चराचरव्यापी, सर्वसाक्षी, सर्वशक्तिमान् अशा परमेश्वराची कल्पना ! आपण नाहीं तरी दुसरा कोणी तरी आकाशांत असा आहे, तो दयाळु असल्यामुळें आपलें बरें करील, ही निराशलेल्या हतबुद्ध मानवाची आशा ! दुबळ्या मानवानें आपली कल्पना ताणून स्वतःचें केलेलें समाधान !

● ● ●

१

## " क्रिया आणि प्रतिक्रिया...... "

कुठल्याशा एका चित्रपटात एक मजेदार प्रसंग पाहिल्याचें मला आठवतें. एका राजपुत्राला घेऊन त्याची दाई रस्त्यांतून चालली होती. रस्त्याच्या कडेला एक काकडीविक्या काकड्यांच्या फाका मोहकपणें आपल्या टोपलीवर माडून बसला होता. गरीबगुरीबाचीं मुलें त्याच्याभोंवतीं जमून यथेच्छ काकड्या खात होतीं. त्याना पाहून तो राजपुत्र, " मला दे ना तें काय तें खायला घेऊन ! " म्हणून दाईशीं हट्ट घेऊन बसला. दाईनें अगदीं कडक चेहरा करून त्याला सागितलें, " इश्श ! रोगाच्या जंतूंनीं भरलेल्या रस्त्यावरच्या घाणेरड्या वस्तु त्या ! आपण खाऊं नये तसल्या गलिच्छ वस्तु ! " इतक्यांत त्या दाईची कोणी मैत्रीण तिला रस्त्यांत भेटली, आणि ती तिच्याशीं बोलण्यांत गुंग असतां त्या छोट्या राजपुत्रानें दाईला हळूच झुकांडी दिली आणि त्या काकडीविक्याकडे जाऊन अगदीं गयावया करून त्याला तो सांगू लागला, " अगदीं लवकर मला ती जन्तूंनीं भरलेली घाणेरडी वस्तू खायला दे ! नाहीं तर ती दाई पाहील. दे ना गड्या, ती मला गलिच्छ वस्तु ! "

बालस्वभावाची एक मजेदार छटा या प्रसंगांत दाखविली आहे. पण माझें म्हणणें असें आहे कीं, हा मुळीं मनुष्यस्वभावाचाच एक विशेष आहे. लहान मुलांत तो अधिक स्पष्टपणें आणि उठावदार दिसतो, इतकेंच. पुष्कळ वडील

माणसांना असें वाटतें कीं, लाहन मुलाना ' स्वत्व ' असें कांहीं नसतेंच. आपण देऊं तें त्यानें खावें आणि सागूं तें करावें. आणि मुलानें तसें केलें नाही, मग त्याला हट्टी किंवा आततायी म्हणावयाचें व यथेच्छ झोडपावयाचें ! आपण सर्व हें केवळ मुलाच्या कल्याणाकरिता करतों आहोंत असा कितीही जरी आव या लोकांनीं आणला तरी याच्या बुडाशीं सत्ताधाऱ्याची मदोन्मत्तता आणि दुखावलेली अहंमन्यता याच अरेरावी भावना असतात.

माझ्या मतें तर मोठ्या माणसापेक्षाही लहान मुलात ' स्वत्वा ' ची भावना अधिक निर्मळ व जाज्वल्य असते. जगाच्या कटुमधुर अनुभवांनीं तावून निघाल्यामुळें किती तरी वेळा ' स्वत्वा ' वर पाणी सोडून तडजोड करण्याची वृत्ति मोठ्या माणसाना जडलेली असते. लहान मुलाच्या हें गांवींही नसतें; आणि म्हणूनच तुम्हीं जेव्हा आपले जुलमी हुकूम त्यांच्यावर सोडता, तेव्हा बेलाशक त्यांना आपल्या चिमुकल्या पायाखाली तुडवून, तीं अगदीं मुद्दाम त्याच्या विरुद्ध वर्तन करीत असतात. तुम्ही याला वाह्यात हट्टीपणा म्हणा पाहिजे तर, पण मी मात्र याला सन्माननीय स्वत्वप्रतिपादनच म्हणेन !

लहान मुलांचीच गोष्ट कशाला ? आपण सर्वच अशा तऱ्हेनें वागत असतों. क्रिया आणि प्रतिक्रिया या सम आणि विरुद्ध असतात, हा निसर्गाचा नियम मनुष्यस्वभावालाही तितकाच लागू आहे. एखादा मनुष्य उगाच ऐटीनें वाकडी टोपी घालून रस्त्यातून चालत असला, तर द्यावी एक थप्पड आणि उडवावी त्याची टोपी, असें साहजिकच आपणाला वाटतें ! कां वाटतें असें ? मला वाटतें येथेंही आपल्या ' स्वत्वा 'च्या भावनेवरच आघात होतो. " हा कोण मोठा ऐटीनें चालणारा ! — आम्ही कांहीं माणसें नव्हे ? " हीच ती भावना.

दुसऱ्याचें स्वतंत्र व्यक्तित्वच जेव्हां आपण नाकारूं लागतों, तेव्हा साहजिकच त्याचा अहंभाव — अर्थात् चांगल्या अर्थानें — उसळून बाहेर येतो, व आपण सांगतों तें चागलें असो कीं वाईट असो, तो आपणाला विरोधच करूं लागतो. याचें उत्तम उदाहरण मला एकदा आगगाडीच्या डब्यांत पाहावयास मिळालें. एक चांगला धटिंगण गृहस्थ जरा ऐसपैस शरीर पसरून बाकावर बसला होता. मी डब्यांत चढलों, आणि जागा कोठेंच दिसेना, तेव्हा

त्या गृहस्थाजवळ जाऊन अगदीं शांत स्वरात म्हणालों, " जरा जागा द्याल का मला बसायला ? "

" हो, हो – कां नाहीं ! " असें म्हणून लगेच त्यानें आपलें शरीर आवरून मला जागा करून दिली. कांहीं वेळानें दुसरीकडे खूप जागा झाली म्हणून मी तिकडे जाऊन बसलों. आणि तो गृहस्थ पुन्हा पहिल्यासारखा जरा स्वस्थ-पणें पसरला. पुढच्या स्टेशनावर दुसरा एक गृहस्थ डब्यांत चढला, व कुठें जागा दिसेना म्हणून त्या गृहस्थाजवळ जाऊन म्हणाला, " जागा द्या पाहूं. हें काय घर आहे का हातपाय सोडून स्वस्थ पडायला ? व्हा बाजूला ! "

" होत नाहीं बाजूला ! पाहिजे तर उभे राहा, नाहींतर चालते व्हा उत-रून ! " त्या गृहस्थानें उसळून उत्तर दिलें. त्या दुसऱ्या गृहस्थाला निमूटपणें मान खालीं घालून उभें राहावें लागलें. क्रिया आणि प्रतिक्रिया सम आणि विरुद्ध असतात, त्या अशा !

निसर्गाचा हा नियम इतका निष्ठुर आणि अविचलित आहे, कीं एखादी चांगली गोष्ट सुद्धां फार करावयाची सोय नाहीं ! तिची प्रतिक्रिया ही ठेवले-लीच ! कुठेंसें एकानें म्हटलें आहे कीं, " जगात असें आपण काय करूं शकतों कीं ज्याचा आपणाला हिशोब द्यावा लागत नाहीं ? " अगदीं साधें वाक्य आहे, पण त्यात अर्थ मात्र काठोकाट भरला आहे. वाईट करा अगर चांगलें करा, त्याचा झाडा हा द्यावा लागतोच. भूक लागली आणि यथेच्छ खाल्लें, तर अजीर्ण; बरें, अजीर्ण होईल म्हणून भीत भीत थोडें खाल्लें, तर पोटाला भूक आणि जिवाला त्रास ! काहीं, काहीं म्हणून करायची सोय नाहीं ! घरातल्या घरात कोंदट हवेंत न बसता बाहेर वाऱ्यावर फिरावें, तर थंडी होते; आणि घरात बसून राहावें तर कोंदट हवेमुळें रक्त दूषित होतें ! शेवटीं मला वाटतें, माझा लेख पाहून गणकाका म्हणाले तेंच खरें कीं,

" तुझ्या क्रिया प्रतिक्रिया घाल चुलींत; आपणाला वाटेल तेव्हा वाटेल तें करावें ! "

● ● ●

## १०

## " अज्ञानाचा आनंद...... "

ज्ञानाची महति गाणाऱ्यांना मला एकच गोष्ट सांगावयाची आहे कीं, " बाबांनो, केव्हां केव्हां ज्ञानापेक्षां अज्ञानातच खरी गंमत असते ! "

मला या गोष्टीचा पुष्कळ वेळां अनुभव आला आहे. एकदा मीं तीन रुपयांना एक टोपी विकत घेतली, आणि खूप स्वस्तांत चांगली टोपी मिळाली म्हणून मी अगदीं आनंदांत होतों. इतक्यांत हातांत एक पुडकें घेऊन आमचा एक मित्र तेथें आला. तेव्हां मोठ्या ऐटीनें माझी टोपी दाखवीत मी त्याला म्हणालों, " तीन रुपयांना कशी फक्कड टोपी घेतली आहे, महाराज ! पाहा तर खरी ! "

" खरोखरच का तीन रुपये दिलेस तूं हिला ? " तो म्हणाला.

" म्हणजे ? तीन रुपयांना मिळायला बसली आहे वाटत असली टोपी ? "

" अरे बाबा, ही बघ आता मी दोन रुपयांना घेतली अगदीं हुबेहूब तसलीच टोपी ! " हातातलें पुडकें सोडून त्यातली टोपी दाखवीत तो म्हणाला, " हें बघ बिल, पाहिजे तर ! "

माझा चेहरा पाहाण्यासारखा झाला. मी रागानें त्याच्या अंगावर ओरडलों, " मिळाली असेल तुला दोन रुपयांना, पण मला सांगून काय मिळवलंस ? माझ्या आनंदावर विरजण घालून तुला कांहीं मिळालं का ? "

स्वतःच्या झालेल्या फसवणुकीच्या बाबतींत शुद्ध अज्ञानाच्या गोड आनंदांत मी होतों, पण त्यानें विनाकारण मला ज्ञानाची जोड करून देऊन दुःखीकष्टी केलें. पुन्हा जेव्हा मी त्या टोपीकडे पाहात असें तेव्हा तेव्हां मला दुःखाचा कढ येऊन फुकट गेलेल्या रुपयाची आठवण होत असे. खरोखर माझे आजपर्यंत असे किती तरी रुपये किती तरी वेळा गेले असतील; पण दुःख होतें तें रुपये गेल्यामुळें नव्हे तर ते गेल्याचें ज्ञान झाल्यावर ! ते गेलेले पत्करले, पण ते गेल्याचें ज्ञान नको. मला वाटतें अथेल्लोनें अशाच प्रकारचे उद्गार काढले आहेत : " चोरी झाली तर हरकत नाहीं. पण ज्याची चोरी झाली असेल त्याला तें कळूं तरी नये ! " खरें आहे. करावयाचें काय आहे असलें ज्ञान ? त्यापक्षा अज्ञानच बरें.

कटु अनुभवाचें किंवा दुःखदायक गोष्टींचें मनुष्याला संपूर्ण ज्ञान असावें, असें एका प्रख्यात कादंबरीकाराचें मत आहे. या कादबरीकारानें अनेक सुदर कादंबऱ्या लिहिल्या आहेत, आणि प्रत्येक कादंबरींत त्यानें मानवी जीवनाची अत्यंत दुःखद आणि शोककारी बाजू रंगवली आहे. त्याचें लिखाण वाचल्यावर मनुष्य निराश, असहाय्य होतो. या कादबरीकाराला कुणींसें एकदा विचारलें, " मनुष्याच्या आयुष्यातले हे काळेकुट्ट प्रसंगच तूं सदासर्वकाळ का चित्रित करतोस ? " तेव्हा तो म्हणाला, " माणसाना या भयंकर प्रसंगाचें पूर्ण ज्ञान झालेलें असलें, म्हणजे तसे प्रसंग आयुष्यात आले असता त्याना तोंड द्यावयाचा खंबीरपणा त्यांना येतो. त्यांचीं मनें तयार झालेलीं असतात. "

या बड्या लेखकाला एक गोष्ट मला सागावीशी वाटते : एक अति शहाणा माझ्या माहितीचा आहे. तो पुढें कधींकाळीं आपण उंचावरून खालीं पडलों तर डोकें फुटून प्राण जाईल म्हणून दररोज तास दोन तास स्वतःचें डोकें भिंतीवर आपटून घेत असतो ! बहुतेक तो या कादंबरीकाराचा प्रामाणिक अनुयायी असावा !

अज्ञान कधीं कधीं किती पथ्यकर पडतें, यासंबंधीं एक मजेदार गोष्ट आहे : दोन मित्र होते. त्यापैकीं एक खूप लठ्ठ, खडबडीत आणि ओबडधोबड होता. त्याचा मित्र एक दिवस त्याला म्हणाला, " हिप्पॉपॉटेमस् आहेस तूं, गड्या ! "

" खरंच ? " त्यानें विचारलें. त्याला वाटलें ' हिप्पॉपॉटेमस् ' या इंग्रजी शब्दाचा अर्थ कांहीं तरी ' बडा विद्वान् ' वगैरे असावा.

त्या दिवसापासून तो लठ्ठ गृहस्थ आपल्या मित्रावर बेहद्द खूश होता. पुढें सात-आठ वर्षांनीं तो एक प्राणिसंग्रहालय पाहावयास गेला असताना संग्रहालयाच्या एका भागांत त्याला एक अजस्र, ओबडधोबड प्राणी दिसला. हा प्राणी असावा तरी कोण म्हणून तो जों बाहेरची पाटी पाहातो, तों तीवर ' हिप्पॉपॉटेमस् ' अशीं अक्षरें लिहिलेली त्याला दिसलीं !

" अरेच्या ! " तो संतापानें लाल होऊन उद्गारला आणि तेथून जो तडक निघाला तो आपल्या मित्राच्या घरीं गेला.

" बदमाश ! " आपल्या मित्राला पाहून तो ओरडला, " आज मीं प्राणिसंग्रहालयात ' हिप्पॉपॉटेमस् ' म्हणजे काय आहे तें पाहिलं ! आजपासून तुझी माझी मैत्री खलास ! "

काय ज्ञानाचा उपयोग ?

बरें ' ज्ञान ' ' ज्ञान ' म्हणतात तें तरी कुठें त्रिकालाबाधित आहे ? कालचें ज्ञान तें आजचें अज्ञान ठरतें. न्यूटनचा गुरुत्वाकर्षणाचा जगद्विख्यात सिद्धान्तच घ्या ना. कालपरवापर्यंत त्याच्यापलीकडे कांहीं सत्य असेल असें आम्हाला वाटतसुद्धा नव्हतें. आणि आता मी ऐकतों कीं आइन्स्टीननें तो सिद्धान्त फोल ठरविला आहे म्हणून ! पूर्वीचे शास्त्रज्ञ म्हणत, पृथ्वी स्थिर आहे, आणि सूर्य तिच्याभोंवतीं फिरतो आहे. आमचे आजचे शास्त्रज्ञ सांगतात, कीं सूर्य स्थिर आहे, आणि पृथ्वीच फिरते आहे. आणखी माझी खात्री आहे कीं, माझे नातू नाहीं तर पणतू मला सागतील कीं, " आजोबा, पृथ्वीही फिरत नाहीं, आणि सूर्यही फिरत नाहीं. आपण माणसेंच आडवीं-तिडवीं फिरतों आहोंत ! "

● ● ●

# ११

## " बुवा आणि बुवा... .. "

माझा भुतांखेतांवर मुळींच विश्वास नाहीं, पण म्हणून जर का तुम्ही मला रात्रीच्या वेळीं एकटाच स्मशानात जा असें सांगाल, तर—तुम्ही मला कांहींही म्हणा—मी मुळींच जाणार नाहीं! याचा अर्थ काय? माझा या भ्रममूलक समजुतीवर नकळत विश्वास आहे? मुळींच नाहीं स्पष्ट सांगावयाचें म्हणजे याचा अर्थ एवढाच कीं, माझ्या बुद्धीचा कितीही विकास झालेला असला, तरी माझ्या मनाचा दुबळेपणा मात्र अजून गेलेला नाहीं. शाळेच्या किंवा कॉलेजच्या परीक्षेच्या वेळच्या गोष्टी मला आठवतात. सांगितल्या तर कुणी विश्वास ठेवणार नाहीं; पण खरोखरच आपलें मन त्या वेळीं इतकें असहाय्य झालेलें असतें कीं बुडत्याला जसा काडीचा आधार तसा कशावरही आपण विश्वास ठेवून मनाचें समाधान करीत असतों. एकदा मी परीक्षेला जावयाला निघालों होतों; आणि रस्त्यात एक घटिंगण भिकारी मला भेटला. " चार आणे द्या; पोटाला भूक लागली आहे, शेट. तुमचं काम फत्ते होईल बघा, चार आणे द्याल तर! " असें म्हणून तो सयावया करूं लागला. मीं त्याला लगेच चार आणे काढून दिले आणि पुढें चालूं लागलों. नेहमींची वेळ असती तर " तुला काम करून खायला काय झालं आहे रे! चांगला मस्त माजला आहेस तर खरा! " असें म्हणत चार शिव्या हांसडून मी पुढें गेलों

असतो. पण वेळ होती परीक्षेची आणि त्याच्या तोंडांतून शब्द आले होते "तुमचं काम फत्ते होईल" म्हणून! अशा वेळीं त्याचे शाप ऐकून घ्यायचा धीर कुणाला?

माझा एक मित्र तर परीक्षेच्या वेळीं कमालीचा धर्मभोळा आणि दैववादी होत असे. तुम्हीं जर त्याला सांगितलें असतें, कीं परीक्षेच्या आधीं एक तास तूं माझ्यासमोर चार कोलांट्या उड्या घे, म्हणजे खात्रीनें पास होशील; तर त्यानें सर्व लाजलज्जा सोडून चारच काय, पण दहा कोलांट्या उड्या तुमच्यासमोर घेतल्या असत्या! एकदा परीक्षेला जाताना त्याच्या हातातलें एक पुस्तक खालीं पडलें, आणि नेमका त्या विषयात नापास झाला! झालें! पुढच्या वेळेला परीक्षेला जाताना त्यानें आपलीं पुस्तकें इतकीं काहीं घट्ट आवळून धरलीं होतीं, कीं पाहणाराला वाटलें असतें, कीं याच्या पुस्तकाना पंख आहेत, आणि यानें जर का त्याना जरा ढिलीं सोडलीं तर तीं भुर्रकन् आकाशात उडून जातील!

बिकट प्रसंगीं किंवा संकटकाळीं मनुष्याची बुद्धि कशी मूर्च्छित पडते, याचे हे सुरेख दाखले होत. एखाद्या बुवाच्या किंवा गुरूच्या नादीं जेव्हा मोटमोठे लोक लागतात, तेव्हा अज्ञ जनतेला मोठा अचंबा वाटतो आणि त्या बुवात खरोखरींच काहीं तरी अलौकिक असलें पाहिजे, असें त्याना वाटतें. पण खरी अलौकिकता त्या बुवाच्या मोठेपणात नसून सांसारिक दुःखामुळें म्हणा किंवा महाभयंकर पापें केल्यामुळें झालेल्या मनःक्षोभामुळें म्हणा, त्या बुवाच्या नादीं लागलेल्या एवंगुणविशिष्ट बड्या लोकाच्या पागलपणांत असते!

सर्व गुरूंच्या यशाची गुरुकिल्ली म्हणजे मानवी मनाचा दुबळेपणा होय. पण माणसांचीच गोष्ट कशाला? संकटात सांपडलेलीं राष्ट्रेंसुद्धा बुवाबाजीला बळी पडतात. अर्थात् राष्ट्रातील कोट्यवधि लोकाना नादीं लावणाऱ्या बुवाची बुवा-बाजी जरा मोठ्या प्रमाणावर आणि उच्च भूमिकेवर असते, एवढेंच. क्रांतीपूर्वी रशियामध्यें फादर गेपन् नावाच्या एका धर्मगुरूला रशियन् कामगाराचा प्रचंड वर्ग स्वतःचा पुढारी समजत असे. एकदा फादर गेपन्च्या पुढारी-पणाखालीं लाखों रशियन् कामगार झारच्या राजवाड्यापुढें मिरवणूक घेऊन गेले; आणि ते तेथें उभे असतांना झारच्या सैनिकांनीं त्यांच्यावर गोळीबार

करून हजारों मुडदे पाडले, आणि रक्ताच्या नद्या वाहवल्या. पुढें असें बाहेर आलें कीं, फादर गेपन् हा झारचा हस्तक होता, आणि कामगारांची ती अमानुष कत्तल उडविण्याकरिता फादर गेपन्नें जाणूनबुजून त्याना झारपुढें नेलें होतें! हे सर्वच राष्ट्रीय बुवा अज्ञ जनांना नादीं लावणाऱ्या इतर बुवासारखे बदमाश असतात, असें माझें म्हणणें नाहीं. कदाचित् त्यांपैकीं काहीं खरोखरच प्रामाणिक असतील. पण बदमाश बुवा आणि प्रामाणिक बुवा यातला फरक म्हणजे, बेवडा झोंकणारा दारुड्या आणि शापेन पिणारा दारूबाज यातला जो फरक तोच! तुमच्या कृत्याचे परिणाम जर अनिष्ट होणार असतील, तर मग तुम्ही प्रामाणिक असा अगर अप्रामाणिक असा, त्याचें लोकाना काय?

एका गृहस्थाचें एक माकड होतें. अत्यंत प्रामाणिक आणि विश्वासू होतें तें. एकदा तो गृहस्थ झोंपला असताना त्याच्या गळ्यावर एक डास बसून त्याला चावत होता. त्या विश्वासू माकडानें तो डास आपल्या धन्याला चावतो आहे हें पाहून धावत जाऊन घरांतून एक सुरा आणला, आणि सात्त्विक संतापानें त्या डांसावर वार केला. डास मेला—पण डासाबरोबर त्या धन्याचा गळाही कापला गेला. अत्यंत प्रामाणिक होतें तें माकड; पण त्याच्या प्रामाणिकपणामुळें फक्त त्या धन्याचा प्राण गेला, एवढेंच! एवंच काय, बुवाबाजी ती बुवाबाजी! मग ती बदमाश बुवाची असो. कीं प्रामाणिक बुवाची असो. आणि बुवाबाजी म्हणजे बुद्धीचा अस्त आणि भ्रमाचा उदय!



# १२

## “ वडीलशाही ......”

त्या दिवशीं माझ्या शेजारीं राहणाऱ्या एका गृहस्थाचा मुलगा सरळ माझ्या खोलींत शिरला. आणि संतापानें थरथरत मला सांगूं लागला, “ मी काय करणार आहें ठाऊक आहे तुम्हाला, काका ! ”

त्या सहासात वर्षांच्या चिमुरड्याचा तो आवेश बघून मीं थक्कच होऊन विचारलें,

“ काय ! ”

“ मी बाबाच्या एवढा मोठा झालों म्हणजे एक लांब काठी विकत घेऊन झोडून काढणार आहे बाबांना ! ”

“ अरे बाप रे ! ” मी उद्गारलों. त्याच्या त्या संतापाला कारणही तसेंच झालें होतें. खरोखरच न्याय्य आणि सात्त्विक संताप होता त्याचा. बापानें त्याला एक काचेचा प्याला स्वयंपाकघरांतून आणावयाला सांगितलें, आणि तो आणतांना पायाला ठेंच लागून तोल गेल्यामुळें त्याच्या हातून तो पडला आणि फुटला. पेला फुटला हें खरें असलें तरी त्या मुलाचा त्यांत कांहींच अपराध नव्हता. कोणाही लहान किंवा मोठ्या माणसाच्या हातून अशा परिस्थितींत पेला फुटलाच असता. पण त्या बालकाच्या त्या ‘ अपराधा ’-बद्दल त्याच्या वडिलांनीं त्याला झोडपून काढलें होतें, आणि म्हणूनच त्या

मुलानें आपल्या आयुष्याची महत्त्वाकांक्षा म्हणजे मोठा झाल्यावर आपल्या बापाला झोडपून काढावयाचें अशी ठरविली. प्रत्येक लहान मुलाच्या शब्दाना मी असलें भलतेंच महत्त्व देऊं इच्छित नाहीं. पण वरील गोष्ट एका विशिष्ट मनोवृत्तीची द्योतक म्हणून सांगितली, एवढेंच.

आपल्या मुलाच्या मनावर असल्या अन्याय्य वर्तनानें आपण काय परिणाम करीत आहोंत याची बऱ्याच 'मोठ्या' माणसांना कल्पना नसते. कोंवळ्या मनोभूमिकेवर नकळत पेरलेल्या या विषबीजाचा शेवट शेवटीं व्हायचा तोच होतो. मोठेपणीसुद्धा आपल्या वडिलाविषयीं प्रच्छन्न अगर उघड अनादर आणि तिरस्कार त्याच्या मनात रुजून राहतो.

मुलाच्या कल्याणाकरिता आपण असें करतों असें काहीं लोक सांगतात. पण खोल विचार करता मला वाटतें, या जुलमी मनोवृत्तीच्या मुळाशीं मालकी हक्काची भावनाच असावी. आपल्या इतर स्थावर आणि जंगम मालमत्तेसारखींच आपलीं मुलें हाही एक मालमत्तेचाच प्रकार आहे, असेंच पुष्कळाना वाटतें, आणि आपल्या मालकीच्या ज्या वस्तूपासून आपणाला सुख किंवा फायदा होत नाही, त्या वस्तूचा साहजिकच आपणाला राग येतो. पुष्कळाना बोलताना मीं ऐकलें आहे, "अहो, किती पैसा खर्च केला मीं याच्या शिक्षणासाठीं ! म्हटलं याचा एकदा पगार सुरू झाला कीं आपण स्वस्थ बसले 'हरि हरि' करीत !" मुलांना शिक्षण देण्याच्या मागें असलेला 'पवित्र' हेतु केव्हा केव्हा असा छानदारपणें उघडकीला येतो. विमा कंपनीचे हप्ते भर-ण्याच्या मागें जो 'पवित्र आणि उदात्त' हेतु असतो, तोच हा पवित्र हेतु ! माझें असें मुळींच म्हणणें नाहीं, कीं मुलानीं आपल्या वडिलाविषयीं कृतज्ञता दर्शवूं नये ! उलट मी असें म्हणतों, कीं त्यानीं आपणासाठीं काहींही केलेलें नसलें तरीही त्याचा भार आपण आपल्या शिरावर घ्यावा. पण सध्या मी बोलतों आहें तो काहीं वडिलांच्या मनोवृत्तीविषयीं. आपला व्यापारी उद्देश न सांगतां मोठेपणाच्या आणि उदारहृदयत्वाच्या खोट्या गप्पा मारण्याची काहींच जरूरी नाहीं.

थोर किंवा मोठ्या माणसाचीं मुलें बहुधा निर्बुद्ध आणि मुखदुर्बळ कां होतात या कोड्याचाही मला हल्लीं हळुहळू उलगडा होऊं लागला आहे. या

मोठ्या माणसाचें सर्वच मोठें असतें. तेव्हां अर्थात् याच्या वडीलशाहीचा जुलूमही तितकाच मोठा असतो. बाहेरून मोठेपणा मिळाल्यामुळें घरातली सर्व मंडळी याना वचकून असतात, आणि मुलें तर काय ? बोलून चालून मुलेंच तीं ! आपण मोठा, तेव्हा आपल्या मुलानें आपण बोलूं तें ऐकलेंच पाहिजे आणि सागूं तें केलेंच पाहिजे, अशी या ' मोठ्या 'ची भावना असते. आणि या तत्त्वावर ते आपल्या मुलाना लहानाचे मोटे करतात. प्रत्येक क्षुल्लक गोष्टसुद्धा मुलानें आपणाला विचारूनच केली पाहिजे अशी सक्त ताकीद असल्यामुळें, स्वतंत्र विचार आणि स्वतंत्र कार्य करण्याची धमक, या दोन गोष्टींना कायमचीं पारखीं झालेलीं याचीं मुलें साहजिकच बावळट होतात. आणि आपण एवढा मोठा असताना आपला मुलगा बावळट निघाला म्हणून वाक्शरानीं त्याला बेजार करून त्याच्या उरल्यासुरल्या व्यक्तित्वाचासुद्धा या मोठ्यांकडून धुव्वा उडविला जातो ! असल्या वडीलशाहीच्या अमलाखालीं मुलें निर्बुद्ध न निघालीं तरच नवल !

आणि खरें पाहूं गेल्यास वडिलाच्या परवानगीनें जगात कुणीं काय चागलें केलें आहे ? — शहाजीला बाजूला सारूनच शिवाजीनें स्वराज्याची संस्थापना केली. बापाचें घर सोडूनच शेले महाकवि झाला. आणि रुक्मिणीनें जर भावाचें ऐकलें असतें तर भगवान् श्रीकृष्णाची बायको होण्याऐवजीं ती शिशुपालाच्या झनानखान्यात पडली असती !



# १३

## " आळस आणि उद्योग... "

एका प्रख्यात आळशाची अशी गोष्ट सांगतात, की तो एकदा बोरें खात बसला होता, आणि बोरें तोंडात टाकताना एक बोर त्याच्या मिशींत अडकलें. तेव्हां समोरून जाणाऱ्या एका गृहस्थाला त्यानें हाक मारली आणि " माझ्या मिशींतलें हें बोर जरा तोंडात ढकला हो ! " म्हणून विनंती केली !

मला वाटतें जगातल्या सर्व आळशानी या गृहस्थाला आपला गुरु करावा आणि ' आळशाचा राजा ' अशी पदवी त्याला बहाल करावी ! मी तरी त्याला आदर्श आळशी समजतों. आणि मला त्याचें साभिमान कौतुक वाटतें.

माझें तर ठाम मत आहे, कीं जगाचा खरा उद्धार आळशाच्याच हातून होतो. आणि त्याचीं कारणें अगदीं सरळ आहेत. उद्योगी लोक आपल्या उद्योगात इतके चूर असतात की, जगाचा विचार करावयाला त्याना वेळच मिळत नाहीं. जगाचाच काय, पण कांहीं उद्योगी पुरुषांना स्वतःच्या घरासंबंधीं विचार करायला फुरसद नसते. माझ्या माहितीचा एक गृहस्थ सकाळीं पहाटेला कामाला जातो, आणि बऱ्याच रात्रीं घरीं येतो. त्यामुळें गंमत अशी झाली आहे, कीं त्याचीं स्वतःचीं मुलें त्याला जवळजवळ ओळखतसुद्धा नाहींत ! आणि त्यालासुद्धा आपल्या सर्व मुलाची माहिती आहे कीं नाहीं, कुणास ठाऊक !

पूर्वी मला कुणी आळशी म्हटलें कीं मनस्वी राग येत असे, आणि मी आळशी कसा नाहीं हें सिद्ध करण्यासाठीं मी माझी शिकस्त करीत असें. पण आता मात्र जर मला कोणी आळशी म्हटलें तर मी अभिमानानें सांगतों, " होय, मी आळशी आहें. आणि मला त्याचा अभिमान वाटतो ! "

कारण एखाद्याला लोक जेव्हा आळशी म्हणतात, तेव्हा त्याचा अर्थ एवढाच असतो, कीं ज्याच्या शरीराची हालचाल चालू नसते तो आळशी, आणि ज्याचे हातपाय खूप धडपडत असतात तो उद्योगी ! एका सुप्रसिद्ध नाटककाराची काही लोकांनी मला अशी आख्यायिका सांगितली, कीं तो चार-चार आठ-आठ दिवस नुसता बिछान्यात लोळत असे. आणि मग एखादे दिवशीं उठून एक-दोन प्रवेश खरडीत असे. ही गोष्ट सांगणाऱ्या लोकांनीं शहाणपणाचा आव आणून वर आणखी अशी मखलाशी केली कीं, " एवढा मोठा प्रतिभासंपन्न लेखक, पण उभ्या गावाचा आळशी, बुवा ! "

मी मनात म्हटलें, तो काहीं आळशी नाही; पण तुम्हीं मात्र उभ्या गावचे मूर्खशिरोमणी आहा ! तो बिछान्यात पडून राहात असे म्हणून आळशी ! पण त्याला आळशी म्हणणाऱ्या उद्योग्याना एवढें कळत नव्हतें, कीं खऱ्या प्रतिभासंपन्न लेखकाला खरोखरच आठ-आठ दिवस विचार करीत तडफडावें लागतें, तेव्हांच त्याच्या हातून एखादा सुंदर आणि अद्वितीय प्रवेश लिहिला जातो. तो जेव्हां एक-दोन तासात कांहीं तरी कागदावर लिहून काढीत असे, तेव्हां हे लोक त्याला उद्योगी समजत. उघडच आहे, कारण लिहिण्यामध्यें शारीरिक हालचाल होत असे. म्हणून तो उद्योग ! आणि मेंदूची हालचाल म्हणजे आळस

उद्योगाच्या या कल्पनेची थट्टा करण्याकरिता लिहिलेली सुप्रसिद्ध गोष्ट जरी सर्वपरिचित असली तरी छानदार आहे :

एका जांवयाला त्याच्या सासऱ्यानें सांगितलें,

" जांवईबुवा, असं आळशासारखं बसून राहूं नये. माणसानं नेहमीं उद्योग करीत राहावं. "

" बरं आहे. " जांवईबुवा म्हणाले.

दुसऱ्या दिवशीं जावईबुवांनीं एक कुदळ घेतली, आणि सासऱ्याच्या

घराची एक एक भिंत हळुहळू पाडावयाला सुरुवात केली. सासऱ्यानें हें पाहिल्यावर जेव्हा विचारलें, " जांवईबुवा, हें चालवलें आहे काय तुम्हीं ! "

" उद्योग ! " जावईबुवा शांतपणें म्हणाले.

उद्योगी पुरुषसिंहाच्या घरीं लक्ष्मी चालत येते असें पंडित लोक म्हणतात. पहिली गोष्ट अशी कीं, लक्ष्मीसारख्या चंचल आणि ऐहिक गोष्टीसाठीं उद्योग करण्यात पुरुषसिंहानीं आपला वेळ घालवावा हें पंडितांच्या दृष्टीनेंसुद्धा मला कसेंसेंच वाटतें. अगदींच अनुदात्त आणि प्राकृत ध्येय हें !—

आणि दुसरी गोष्ट म्हणजे सध्याची समाजव्यवस्था जेव्हां मी डोळे उघडून पाहतों, तेव्हा ' उद्योगिनं पुरुषसिंहमुपैति लक्ष्मी ' हें तत्त्व अजिबात खोटें आहे, अशी माझी बालंबाल खात्री पटते. माझ्या दृष्टीला उद्योगी पुरुषसिंहाचीं पोटें पाठीला लागलेलीं दिसतात, आणि पैसेवाले, निरुद्योगी पुरुषहत्ती मात्र आपले लंबोदर गोंजारीत गादीवर पडलेले दिसतात ! भरल्या पोटावर ढेंकर देत एखादा पंडित मरमर काम करूनहि उपवासानें वळवळणाऱ्या मजुराला, जर वरील तत्त्व समजावून देऊं लागला, तर मला वाटतें, मजुरी करणारा तो पुरुषसिंह या पंडिताचें गंडस्थळ फोडल्याशिवाय राहणार नाहीं !



## १४

### " स्त्रिया आणि पुरुष... "

बायकोला मारण्याचा हक्क आहे किंवा नाहीं, हा प्रश्न परवा एका खटल्यात उपस्थित झाला होता. आणि न्यायाधीशानें आपल्या निकालात असे उद्गार काढले कीं केव्हां केव्हां बायकोला मारल्याशिवाय गत्यंतरच नसतें. तेव्हा वेळीं प्रसगीं नवऱ्यानें आपल्या बायकोला चार फटके लगावले तर काही हरकत नाहीं ! हा निकाल लागल्यावर वेळीं अवेळीं स्त्रियाचा कैवार घेणाऱ्या काहीं पुरुषांनीं त्या न्यायाधीशावर मोठा गहजब चालविला आहे. या स्त्रियाच्या कैवाऱ्याचा मला मनस्वी संताप येतो. स्वतःच्या पुरुषजातीचा अभिमान बाजूला ठेवून या नसत्या उठाठेवी करावयाला याना सागतो कोण ? आणि स्त्रियाना तर मी बजावून सागतों कीं, " बायांनो, स्वतःच्या जातीशीं बेइमान होणाऱ्या या प्राण्यावर मुळींच विश्वास ठेवूं नका ! स्वतःला काय पाहिजे असेल तें स्वतःच मिळवा. तुम्हांला ' देवता ' ' देवता ' म्हणून डोक्यावर घेऊन नाच-णारे हे लोक जर का तुम्ही माणसांसारख्या वागूं लागलां, तर देवतांसारख्या तुम्ही वागत नाहीं म्हणून लगेच तुम्हांला पायांखालीं चिरडण्यास कमी करणार नाहींत ! "

बायकोला मारण्यासंबंधींच्या प्रश्नावर मीं खूप नवऱ्याच्या मुलाखती घेतल्या; आणि शेंकडा नव्याण्णव नवरे त्या न्यायाधीशाच्याच बाजूचे आहेत,

असें मला आढळून आलें. अशिक्षित बायकाचे नवरे म्हणतात, कीं आपल्या बायकाना ‘ चवदाव्या रत्ना ’चा उपयोग केल्याशिवाय कांहीं गोष्टी मुळीं कळतच नाहींत ! सुशिक्षित बायकांच्या नवऱ्याची अशी तक्रार आहे, कीं अशिक्षित बायकाचे सर्व गुणावगुण आपल्या बायकात असतातच, पण आणखी सुशिक्षितपणाचा बोजा त्याच्या डोक्यावर असल्यामुळें त्याच्या माना जरा अधिक ताठरलेल्या असतात, म्हणून चारदोन फटक्याचा उपयोग केल्याशिवाय त्या नरम येत नाहींत. अर्थात् हीं नवऱ्याचीं मतें आहेत; माझी नव्हेत.

माझें असें प्रांजळ मत आहे, की ज्याप्रमाणें पुनर्विवाहाच्या बाबतींत पुरुषानींच एक बायको मेल्यावर दुसरी करूं नये, असें न म्हणता पुरुषा-प्रमाणेंच स्त्रियानासुद्धा एका पतीच्या निधनानंतर दुसरा पति करावयाचा हक्क असावा, असें कांहीं सुधारक लोक म्हणतात; त्याप्रमाणेंच बायकोला मारण्याचा पुरुषाचा हक्क काढून घेण्यापेक्षा स्त्रियानाच नवऱ्याला केव्हा केव्हां बडवून काढण्याचा हक्क द्यावा म्हणजे झालें ! पुरुषाचे हक्क कमी करण्यापेक्षा स्त्रियाचेच हक्क वाढवावे, हें केव्हाही उत्तम.

खरें बोलावयाचें म्हणजे स्त्रियांत आणि पुरुषात मी भेदाभेद करू इच्छित नाहीं. यावर काही नर शास्त्रज्ञाचा आधार घेऊन सांगतात, कीं स्त्रियाच्या मेंदूचें वजन पुरुषाच्या मेंदूपेक्षां कमी असतें. मग पुरुषांची बरोबरी स्त्रिया कशी करणार ? त्यावर मी म्हणेन, कीं पुरुषाना जर बुद्धिमत्तेची देणगी अधिक असेल, तर स्त्रियाच्या उपजत प्रेरणा अधिक तल्लख असतात. एकूण एकी-कडची उणीव दुसरीकडे भरून निघते.

बुद्धीच्या साहाय्यानें उकलता येत नाहीं म्हणूनच “ स्त्रीस्वभाव म्हणजे एक कोडें आहे, ” असें काहीं पुरुष म्हणत असावे. पुरुष कशाला ? बऱ्याच स्त्रियासुद्धा नेहमीं म्हणतात, कीं पुरुषाना बायकाचा स्वभाव कळतच नाहीं मुळीं ! खरें आहे. कसा कळणार ? पुरुषांचा जीवितक्रम बुद्धीच्या सरळ रेषांत चालत असतो, तर स्त्रियांचें जीवन भावनाच्या वर्तुळांत फिरत असतें. त्याचा थांग लागणें खरोखरीच कठीण ! स्त्रीस्वभावाचें वैशिष्ट्य दाखविणारीं कांहीं मजेदार उदाहरणें मला आठवतात. त्यातला परस्परविरोध विचार करण्या-

सारखा आहे. दिसावयाला सुंदर असलेल्या एका स्त्रीलेखिकेनें कोठें तरी लिहिलें आहे, कीं सौंदर्य ही सत्याची भाषा आहे. तिचें म्हणणें असें दिसतें कीं जें जें सुंदर असेल तें तें सत्य असलेंच पाहिजे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे एखादी स्त्री जर सुंदर दिसत असेल तर ती सत्यपूर्ण, म्हणजे अंतःकरणानेंही चांगलीच असली पाहिजे. असें जर असेल, तर स्वतःच्या सौंदर्याचे फांस टाकून केवळ आपल्या चैनीकरितां शेंकडों पुरुषांचा बळी घेणारी जगद्विख्यात स्वरूपसम्राज्ञी क्लिओपात्रा ही सत्याची पुतळी ठरेल! मात्र यावरून कुरूप बायकाच अंतःकरणानें चांगल्या असतात अशा मताचा मी आहें, असा कोणीं चुकूनसुद्धा तर्क करूं नये. पुष्कळच वाईट दिसणाऱ्या बायकांच्या तोंडून मीं ऐकलें आहे, कीं, "हो, हो, तुम्हा पुरुषांना नेहमीं बाह्यसौंदर्यच आवडतें. अंतःकरणाची तुम्हांला मुळींच किंमत नाहीं!" आम्हांला सौंदर्य आवडतें, हें मी सपशेल कबूल करतों. पण मी असें विचारतों, कीं चेहरा कुरूप असला कीं अंतःकरण चांगलेंच असतें याला पुरावा काय? अंतःकरणाचा पत्ता लागल्यावर मग पाहूं पुढें काय करावयाचें तें! तोंपर्यंत तर बाह्यसौंदर्यांत आनंद मानावयाला कांहीं हरकत नाहीं ना? जसा सुंदर चेहरा ही सत्यपूर्णतेची हमी नव्हे, त्याचप्रमाणें कुरूप मुखडा म्हणजेही उदात्त हृदयाची साक्ष नाहीं. सुंदर स्त्रीच्या मतें सौंदर्य म्हणजे सत्याची भाषा; आणि कुरूप कामिनीचा अट्टाहास, कीं माझें अंतःकरण सोज्वळ आहे! स्त्रियांचेंच जर आपसांत एकमत नाहीं, तर मग "आमचा स्वभाव तुम्हांला कळतच नाहीं!" असें स्त्रियांनीं तरी पुरुषांना म्हणण्यांत काय अर्थ?



## १५

## " स्त्रियांचे कैवारी ... "

पृथ्वीच्या पाठीवर अनेक आश्चर्ये आहेत. त्यापैकींच काहीं काहीं प्राण्याच्या शरीराचे काहीं विचित्र भाग पाहून पूर्वी मला फार आश्चर्य वाटे. उदाहरणार्थ, बैलाच्या मानेवरचे कोळें, किंवा बोकडाच्या मानेखालीं असलेला अजागलस्तन. पण हल्लीं मला त्याचें आश्चर्य वाटेनासें झालें आहे. कारण हल्लीं मीं काहीं माणसें पाहिलीं, तींसुद्धा स्वतःच्या डोक्यावर किंवा मानेवर निरनिराळ्या प्रकारचे निरुपयोगी बोजे घेऊन फिरत असतात. कुणी सनातनधर्माच्या रक्षणाचा बोजा पाठुंगळीला बांधलेला असतो, तर कुणी स्त्रीजातीच्या कैवाराचें ओझें डोक्यावर घेऊन फिरत असतो !

मागें मीं लिहिलेंच आहे, कीं या स्त्रियांच्या कैवाऱ्यांचा मला मनस्वी संताप येतो म्हणून. त्यांपैकीं कांहीं प्रामाणिक मूर्ख असतात, तर काहीं धूर्त ढोंगी असतात. त्यांच्या या कैवाराच्या मागें हेतु काय असतात याचा विचार करण्यासारखा आहे. पुनर्विवाहाचा किंवा घटस्फोटाचा प्रश्न घ्या. घटस्फोटाला आपला विरोध दर्शवितांना हे ढोंगी कैवारी असें दाखवितील, कीं हिंदु स्त्रिया म्हणजे पवित्र देवता त्या. त्या जर एक नवरा सोडून दुसऱ्याशीं लग्न करूं लागल्या तर हिंदु स्त्रीच्या डोक्याभोंवतालचें तेजोवलय नाहींसें होईल ! आपला नवरा कसाही असला, तरी त्याच्या पायाशींच स्वर्ग आहे,

असें समजून जळवेसारखें त्याला चिकटून राहण्यातच मोठेपणा आहे, असा उदात्त उपदेश ते स्त्रियाना करतील. पण या ढोंग्याच्या खऱ्या भावना निराळ्याच असतात. स्त्री ही पुरुषाच्या मालकीची एक वस्तु आहे, आणि पुरुषाला ती नको झाली, तर फार तर तिला तो अडगळींत टाकून ठेवील ! पण तिनें स्वतःला स्वतंत्र व्यक्तित्व आहे असें दाखवून आपल्या मालकाला सोडून जावयाचें म्हणजे काय ? हीच नीच आणि आप्पलपोटी भावना या लोकाच्या विरोधाच्या मुळाशीं असते, आणि ती भावना अगदीं साहजिकच आहे. आर्थिक स्वातंत्र्य नसलेल्या स्त्रीला कळत अगर नकळत पुरुषाची मालकी कबूल करावीच लागते. पण तसें स्पष्ट न सागता हिंदु स्त्रीच्या पावित्र्याच्या आणि उदात्तपणाच्या गोष्टी हे लोक सागतात, त्याचा संताप येतो. खरें पाहूं गेल्यास कोस्त्यवधि हिंदुधर्मीयांपैकीं शेंकडा चार किंवा पाच टक्के असलेल्या पाढरपेशा वर्गांत फक्त घटस्फोट नाहीं. बाकी उरलेल्या पंच्याण्णव टक्के खालच्या वर्गांत, स्त्रीवर्ग स्वतःच्या श्रमावर पैसे मिळविण्यास समर्थ असल्यामुळें, राजरोस काडीमोडीचा प्रकार चालू आहे. हिंदु धर्माच्या उदात्तत्वाचा आणि पावित्र्याचा या महात्म्याचा अभिमान या पंच्याण्णव टक्के लोकाच्या बाबतींत जातो कोठें ? आणि घटस्फोटामुळें जर सामाजिक अवनति होणार असेल, तर ज्या धर्मांतल्या शेंकडा पंच्याण्णव लोकात हा प्रकार चालू आहे, तो धर्म उदात्त आणि पवित्र कसा ! पण स्त्रियाचें हे उदात्त कैवारी या सर्व गोष्टी आपल्या सोयीप्रमाणें विसरून जातात. म्हणूनच त्याना मी धूर्त ढोंगी म्हणतों. आम्हीसुद्धा स्त्रियाच्या बाबतींत सुधारणेच्या कांहीं विरुद्ध नाहीं, असेंही हे लोक केव्हा केव्हा ठासून सांगतात. आणि त्याचा हा सुधारणेचा अभिमान केव्हा केव्हा इतक्या थराला जातो, कीं सर्व जनप्रवाद आणि लोकनिंदा सहन करून स्त्रियांचे हे खंदे शिलेदार स्त्रियानींसुद्धा उन्हातान्हातून चालताना जोडे वापरावे व पावसा-पाण्यांत छत्र्या घ्याव्या, अशीं क्रातिकारक मतें छातीठोकपणें प्रतिपादन करितात !

या ढोंग्यापेक्षा प्रामाणिकपणें मूर्ख म्हणून वर उल्लेखिलेल्या स्त्रियाच्या कैवाऱ्याची स्थिति निराळी असते. त्याना खरोखर स्त्रियाचें काय होईल आणि कसें होईल, याची अहोरात्र काळजी लागलेली असते. घटस्फोटाचा कायदा पास झाला, तर सर्व लग्न झालेल्या स्त्रिया, आपआपल्या नवऱ्याना सोडून

पळून जातील, आणि या घटस्फुटीत स्त्रियांचे घोळकेच्या घोळके रस्त्यातून इतस्ततः भटकतांना दिसतील, असें यांना प्रामाणिकपणें वाटतें ! त्याचप्रमाणें कुलीन स्त्रियांनीं रंगभूमीवर कामें करावीं, हीं मतें जर समाजांत प्रसृत झालीं, तर प्रत्येक कुलीन स्त्रीला गचांडी धरून रंगभूमीवर खेंचण्यांत येईल, या भीतीनें या लोकांच्या पोटांत गोळा येतो. आणि आपल्या दीन, कुलीन बायकोचा "हे चाडाळ मला रंगभूमीवर ओढून नेत आहेत, मला वाचवा हो !" असा आर्त करुण स्वर यांच्या कानांत घुमूं लागतो ! या लोकांच्या शोचनीय स्थितीची मला खरोखरच दया येते !

या सालस प्राण्यांना एवढेंच कळत नाहीं, कीं ज्या कुलीन स्त्रीला रंगभूमीवर काम करावयाची खरोखरच इच्छा आहे, तिला जर बिघडावयाचेंच असेल तर ती रंगभूमीवर न येतासुद्धा बिघडेलच. यावर हे लोक असें म्हणतात, कीं रंगभूमीवर पुरुषाशीं स्त्रियांचा निकट संबंध येत असल्यामुळें तेथें त्यांचें चारित्र्य गमावण्याचा अधिक संभव आहे. मी म्हणतों, या लोकांनीं याहीपुढें जाऊन असें म्हणावें, की जेथें जेथें म्हणून स्त्रियांचा पुरुषाशी संबंध येतो, असे सर्व धंदे स्त्रियाना बंद करावेत. इतकेंच नव्हे, तर शक्य असल्यास पृथ्वीसारखाच दुसरा गोल शोधून काढून त्यावर दुनियेंतल्या झाडून सर्व स्त्रियाची एक वसाहत करावी व पृथ्वीच्या पाठीवर फक्त पुरुषानींच राहावें !



## १६

### " निःपक्षपाती मतें...... "

काहीं दिवसांपूर्वी घरांचीं भाडीं कमी करावीं, अशी एक चळवळ मुंबईत सुरू झाली होती, त्या वेळीं त्या चळवळीचे एक पुढारी माझ्याकडे येऊन म्हणाले, " तुमच अगदीं निःपक्षपाती मत द्या बुवा या विषयावर. "

मीं म्हटलें, " मी निःपक्षपाती मत मुळींच देणार नाहीं. मी धडधडीत पक्षपाती मत देणार; आणि ज्या अर्थी मी भाड्याच्या घरात राहतों, त्या अर्थी भाडीं नुसतीं कमी करावीं इतकेंच नव्हे तर शक्य असल्यास भाडी घेऊंच नयेत, असें माझें ठाम मत आहे ! "

हो, उगाच निःपक्षपातीपणाचें ढोंग कशाला ? खरें पाहूं गेल्यास कुणी कधींच निःपक्षपाती मत देत नाही. प्रत्येक प्रश्नावर आपलें मत बनवितांना आपली कळत अगर नकळत स्वहितावर दृष्टि असतेच. आणि केव्हा केव्हां यात स्वार्थाचा किंवा ढोंगीपणाचा खरोखरच प्रश्न नसतो. आपण अगदीं प्रामाणिकपणें निःपक्षपाती होण्याचा प्रयत्न करीत असतों, आणि आपण स्वार्थी विचार करीत नाहीं, याची आपणाला पूर्ण खात्री वाटत असते. तरी पण आपला स्वपक्षपात केव्हा केव्हां वर डोकावतोच. म्हणूनच मी म्हणतों, कीं केव्हां केव्हां नकळत आपली स्वहितावर दृष्टि असते.

मला स्वतःची एक गोष्ट आठवते. आमचे गणूकाका फार आजारी होते.

आणि त्याच्या शुश्रूषेचा बराचसा भाग माझ्यावर पडला होता. मी अगदीं थकून गेलों होतों. शेवटीं ते एकदां बरे झाले, आणि हवा पालटण्यासाठीं त्यांनीं लोणावळ्याला किंवा दुसऱ्या कुठल्या तरी हवेच्या ठिकाणीं जावें, असें डॉक्टरांनीं सांगितलें. तेव्हां लोणावळ्याला जावयाचा त्यांना मी फार आग्रह करूं लागलों. आणखी चार-आठ दिवसांनीं जाईन, असें ते म्हणत होते. पण मी त्यांना लगेच निघायला सांगत होतों. त्यांनीं तेथें लवकर जाऊन खूप दिवस राहावें, म्हणजे त्यांना बरें वाटेल, असें खरोखरच मला वाटत होतें. आणि म्हणूनच त्यांना मी आग्रह करीत होतों. पण ते निघून गेल्यावर मला किंचित् असा भास होऊं लागला, कीं त्यांना एवढा आग्रह करण्यांत केवळ त्यांचेंच हित माझ्या डोळ्यांसमोर होतें असें नाहीं. ते एकदा लवकर गेले म्हणजे मलाही थोडा विसावा मिळेल, ही थोडी तरी स्वहिताची भावना त्या आग्रहाच्या मुळाशीं असावी. मला वाटतें, ती होतीच. पण त्यांत लाज वाटण्यासारखें कांहींच नाहीं. स्वतःच्या शरीरांतून स्वतः फुटून बाहेर पडणें कुणालाही शक्य नाहीं. आणि त्यामुळें आपल्या प्रत्येक विचारावर आणि आचारावर आत्मीयत्वाची थोडीबहुत छटा पडावयाचीच. स्वतःला सोडून आपण विचार तरी कसा करणार ?

पण अशी ही परिस्थिति असतानासुद्धा आम्ही स्वहिताचा किंवा स्वतःच्या वर्गाच्या हिताचा मुळींच विचार न करता अगदीं निःपक्षपाती मतें देतों, असें सर्व जगाला ओरडून सांगणारे महात्मे जगांत किती तरी आहेत. अशा एका महात्म्यावर अत्यंत मार्मिक टीका असलेलें एक सुंदर व्यंगचित्र माझ्या एकदां पाहण्यांत आलें होतें. त्यांतला विषय मोठा मजेदार होता. एक काळाकभिन्न पाण्याचा डोह चितारला होता, आणि त्याला ‘ दुर्दशा ’ असें नाव दिलें होतें. त्या डोहांत एक शिडी असून तिच्या बऱ्याचशा खालच्या पायऱ्या डोहाच्या पाण्यांत बुडालेल्या होत्या शिडीच्या अगदीं तळाला एक मजूर उभा असून त्याच्या शरीराचा सर्व भाग पाण्यांत बुडालेला आणि फक्त डोकें तेवढें पाण्याच्या बाहेर होतें. त्या मजुराच्या वर एक मध्यमवर्गीय मनुष्य उभा असून, त्याच्याही वर शिडीच्या वरच्या टोंकाला धरून एक गलेलठ्ठ श्रीमंत मनुष्य उभा होता. आणि या सर्वांकडे पाहात एक निःपक्षपाती

महात्मा व्याख्यान देत होता, कीं “ बाबांनो, सर्व जग दुर्दशेच्या तडाख्यांत सांपडलें आहे. तेव्हां सर्वांनीं – श्रीमंतांनीं, गरीबांनीं – सारखाच स्वार्थत्याग करायला तयार झालें पाहिजे. अगदीं कांहीं एक पक्षपात न करतां मी सांगतों, कीं तुम्ही प्रत्येकानें फक्त एकच पायरी खालीं उतरा ! ”

किती निःपक्षपाती निकाल ! श्रीमंतानेंही एकच पायरी खालीं यावयाचें. मध्यमवर्गीयानेंही एकच पायरी. आणि गरीबानेंही एकच ! या निकालाचा परिणाम मात्र एवढाच होणार होता, कीं श्रीमंत मनुष्य एक पायरी खालीं आला, तरी वरच्या वर सुरक्षित राहात होता. मध्यमवर्गीयाचे एक पायरी खालीं आल्यामुळें पाय पाण्यांत बुडत होते. आणि गरीब मात्र एक पायरी खालीं आल्याबरोबर डोकेंही पाण्याखालीं बुडून जीवानिशीं मरत होता ! तरी पण असल्या निःपक्षपाती महात्म्याचे पोवाडे गाणारे हरीचे लाल जगात काय थोडे आहेत !



# १७

## " बदल आणि वाढ......"

गलिव्हरच्या प्रवासाचें पुस्तक पुन्हा एकदा मी हल्लीं वाचीत असता एक विचित्र कल्पना माझ्या डोक्यात आली. लिलिपुट्चे रहिवासी माणसाच्या आंगठ्याएवढे असून त्याच्यापैकीं दोघे दोघे गलिव्हरच्या तळहातावर उभे राहून नाचूंबागडूं शकत असत. तुमच्या-आमच्यासारखा एक साधा मनुष्यप्राणी गलिव्हर म्हणजे त्याच्या दृष्टीनें एक अजस्र पर्वतप्राय धूड होतें! तोच गलिव्हर जेव्हा ब्रॉब्डिंग्नॅगमध्यें गेला तेव्हा तिकडच्या एकएका डोंगराएवढ्या मोठ्या रहिवाशाच्या तळहातावर बाहुलीसारखा खेळवला जाऊं लागला! लिलिपुट्च्या रहिवाशाच्या दृष्टीनें जो पर्वतप्राय प्राणी, तोच ब्रॉब्डिंग्नॅगच्या नागरिकांसमोर एखाद्या बाहुलीसारखा दिसूं लागला! एकाच मनुष्यप्राण्याविषयीं अशा कमालीच्या परस्परविरुद्ध कल्पना का? माझ्या डोक्यांत विचित्र विचार आला तो हाच.

आपले सर्व विचार, आपल्या सर्व कल्पना एका प्रकारें सापेक्ष असतात; ही सापेक्षता स्थलविशेषामुळें असो, कीं कालविशेषामुळेंच असो. आगगाडींतल्या मनुष्याला झाडें धांवतांना दिसतात, आणि जमिनीवरच्या मनुष्याला आगगाडी धांवते आहे, असें वाटतें! हा फरक स्थलविशेषामुळें झाला. कालविशेषाचीही तीच गम्मत! आमचे वेदकालीन ऋषिवर्य गोमांस मिटक्या मारीत खात असत, आणि कांहीं कालानंतर हेच आर्य लोक अहिंसा हाच परमोच्च धर्म असा कंठशोष करूं लागले! मग सत्य, सत्य, त्रिकालाबाधित सत्य तें राहिलें कुठें?

माझ्या मतें त्रिकालाबाधित सत्य हें एक प्रचंड ढोंग आहे. सर्व विश्वातील अणूरेणू, त्याचप्रमाणें काळ हा गतिमान् आहे. आणि गतिमान् असणें, सारखें बदलत असणें म्हणजेच जिवंतपणा. फक्त मेलेलीं मढीं त्रिकालाबाधित एकाच स्थितींत राहतात !

मला जेव्हा कोणी म्हणतात, कीं " किती चंचल आहेस तूं ! काल तसं म्हणत होतास, आणि आज असं म्हणतो आहेस ! " तेव्हां मी त्यांना उत्तर देतों कीं " दोस्त हो, कालच मीं गुळगुळीत दाढी केली होती, त्याच ठिकाणीं आज पाहा किती राठ खुंट वाढले आहेत ! निसर्ग जर इतका चंचल आहे, तर म्या पामराची काय कथा ! शरीराची जशी वाढ होते, तशीच मनाचीही होते. त्याला माझा नाइलाज आहे. "

मनःस्थैर्याचें नेहमीचें उदाहरण म्हणजे श्रीरामचंद्राचें. तो म्हणे एकपत्नी होता. त्याच्या त्या व्रताविरुद्ध माझें कांहींच म्हणणें नाहीं. पण लोक जेव्हां सांगतात, कीं एका सीतेखेरीज तो दुसऱ्या कुठच्याही स्त्रीच्या मुखाकडे पाहात नसे, इतर स्त्रियांच्या फक्त पायाच्या नखाकडे त्याची दृष्टि असे, तेव्हा मला त्याची अत्यंत चीड येते. काय हा सबंध स्त्रीजातीचा अपमान ! सीता असेल सुंदर, म्हणून बाकीच्या स्त्रियांचे चेहरे बघण्याच्याही लायकीचे नाहींत वाटतं ? एक तर रामाचा स्वतःवर विश्वास नसावा, किंवा त्याची सौंदर्यदृष्टि अत्यंत कोती असावी. अनंत प्रकारचें स्त्रीसौंदर्य जगात विखुरलें आहे. कुणाची सरळ नासिका, तर कुणाचे कुरळे केंस, कुणाची आरक्त कांति, तर कुणाचे रेखीव ओंठ, अशा तऱ्हेच्या विविध सुंदरतेच्या निरीक्षणानें स्वतःची सौंदर्यदृष्टी विशाल करावयाची, कीं येऊन जाऊन नुसतीं पायाचीं मळकट नखें पाहात राहावयाचें ?—

अर्थात् मनुष्य सारखा बदलत राहावा, असें जेव्हां मी म्हणतों तेव्हां बदलत राहावा म्हणजे वाटेल तसा बदलत राहावा, असा त्याचा अर्थ नव्हे. मनुष्यांत होणारा प्रत्येक बदल हा वाढीचा किंवा प्रगतीचा निदर्शक असला पाहिजे. नाहीं तर आमचे गणूकाका माझीं हीं मतें ऐकायचे, आणि काल उसने दिलेले दहा रुपये मी मागायला गेलों म्हणजे म्हणायचे, कीं " कालचा गणूकाका आज बदलला. तुझे पैसे मिळायचे नाहींत ! "

● ● ●

## १८

### " प्रेम आणि विवाह.... "

प्रेमोत्तर विवाह कीं विवाहोत्तर प्रेम, असला एक वाद मागें माझ्या कानांवर आला होता. हा वाद उकरून काढणाऱ्याच्या मूर्खपणाचा मला टावच लागत नाहीं ! प्रेम आणि विवाह ! संबंध काय अर्थाअर्थी या दोघांचा ! प्रेम असेल तर विवाह केलाच पाहिजे आणि विवाह केला तर प्रेम केलेंच पाहिजे असा कांहीं सिद्धान्त नाहीं. प्रेम ही एक विशिष्ट मनःस्थिति आहे, आणि विवाह हा एक सामाजिक व्यवहार आहे.

मी तर दुसऱ्या टोंकाला जाऊन असें म्हणतों, कीं एखाद्या व्यक्तीवर जर आपलें निरतिशय प्रेम असेल तर त्या व्यक्तीशीं कधींही विवाह करूं नये; आणि विवाह करावयाचाच असेल तर अगोदर खात्री करून घ्यावी, कीं त्या व्यक्तीवरचें आपलें प्रेम ओसरून गेलें आहे ! माझा हा विचित्र सिद्धान्त ऐकून पुष्कळांना हंसू लोटेल, पण त्यांत हंसण्यासारखें कांहींच नाहीं. खोटें वाटत असेल, तर आणा एखाद्या प्रेमी माणसाला माझ्याजवळ, आणि विचारा त्याला, कीं " तुझं अमुक अमुक स्त्रीवर प्रेम आहे ना ? मग तिच्याशीं विवाह करून तुझ्यासाठीं तिनं भात उकडावा, धुणींभांडीं करावीं आणि पोतेरं काढावं हें तुला आवडेल का ? खरं सांग. कारण विवाह हा एक व्यवहार आहे आणि त्यांत या आणखी असल्या अनेक गोष्टी येणारच. बोल, करतोस का तिच्याशीं विवाह ? "

माझी खात्री आहे, कीं तो प्रेमवेडा माणूस क्षणभर तरी बावरेल आणि ‘ नाहीं ’ असेंच उत्तर देईल. आणि त्यानें तसें उत्तर दिलें नाहीं तर तो प्रेमवेडाच नव्हे !

याच्या उलट एखाद्या विवाहित माणसाला विचारा, कीं “ ए बाबा, तूं आपल्या बायकोवर प्रेम करतोस ना ? मग तिला पोरांच्या खस्ता काढायला, आणि खरकटीं ताटं उचलायला काय लावतोस ? ” तो म्हणेल, कीं “ तुमच प्रेम वगैरे सर्व ठीक आहे, पण पोटात अन्न गेल्याशिवाय तें काहीं आपणाला सुचत नाही, बुवा ! ”

खरी गोष्ट अशी आहे, कीं ‘ प्रेम, प्रेम ’ ज्याला म्हणतात ती एक शरीर-विकृति ( Pathology ) आहे. एक प्रकारच्या वेडाची लहर आहे. अर्थात् फार सुंदर वेड आहे तें. तरी पण वेडच. आणि तें वेड असल्यामुळें व्यवहा-रात त्याला जागा नाहीं. म्हणूनच मी म्हणतों, कीं एखाद्या व्यक्तीवर आपलें फार प्रेम असलें तर तिच्याशीं विवाह करूं नये. तें प्रेम ओसरण्याची वाट पाहावी आणि तें ओसरून प्रेमाची जागा मैत्रीनें पटकावली, मगच विवाह करावा. कारण विवाहासारख्या व्यवहाराला मैत्रीचाच चिरकालीन पाया हवा. प्रेमाची उन्मादावस्था ओसरून विशुद्ध मैत्रीचा जर उदय होणार नसेल, तर विवाह ही एक असह्य बेडी होईल.

कारण मैत्री ही नेहमीं सकारण असते. उगाच मनात काहीं तरी एखादा विकार उद्भवून आपण कुणाशीं मैत्री करीत नाहीं. दोन माणसाच्या मनामध्यें एक कांहीं तरी विशिष्ट दुवा निर्माण होतो — मग तो समान ध्येयाचा असो किंवा दोघानाही आवडणाऱ्या एखाद्या उदात्त कार्याचा असो — आणि हा दुवा विचारावर — विकारावर नव्हे — अधिष्ठित झालेला असल्यामुळें अभंग आणि चिरकालीन असतो.

नुसता प्रेमोत्तर विवाह केला, आणि प्रेमाची उन्मादावस्था ओसरून तिच्या जागीं अखंड मैत्री निर्माण झाली नाहीं, तर तो विवाह म्हणजे एक तिरस्करणीय अशी अवस्था होईल. आणि सध्यांच्या समाजरचनेंत जेथें विवाहानें स्त्री ही एक पुरुषाच्या मालकीची वस्तु होते, तेथें तर असला विवाह म्हणजे, ज्योड् या प्रख्यात तत्त्ववेत्त्याच्या प्रखर भाषेंत बोलावयाचें

तर वेश्यावृत्तीची एक सुधारलेली आवृत्ति होईल. कारण ज्योड् म्हणतो, कीं मैत्रीच्या अभावीं केवळ विवाहामुळें ज्या स्त्रीला एखाद्या पुरुषाजवळ राहावें लागतें, त्या स्त्रीची अवस्था वेश्येहूनही वाईट आहे. असले विवाह आणि वेश्यावृत्ति यांतला फरक ज्योड्नें अत्यंत जळजळीत शब्दात सागितला आहे. तो म्हणतो, कीं वेश्यावृत्तींत एक स्त्री अनेक पुरुषाना आपलें शरीर कांहीं ठराविक वेळापुरतें विकते, पण वरील प्रकारच्या विवाहसंबंधांत एक स्त्री एकाच पुरुषाला आपला देह कायमचा विकून टाकते ! जो विवाहसंबंध मैत्रीच्या अभेद्य पायावर उभारलेला नाहीं, त्या विवाहसंबंधाची किंमत – मग तो प्रेमोत्तर असो कीं द्वेषोत्तर असो – याहून कांहीं अधिक नाहीं.

म्हणून मी पुन्हा म्हणतों, कीं प्रमोत्तर विवाह कीं विवाहोत्तर प्रेम हा वादच निरर्थक आहे. प्रेम आहे तोंपर्यंत विवाह करूं नका, आणि विवाह केल्यावर प्रेम करूं नका ! पण माझा हा उपदेश कितपत पाळला जाईल याची मला शंकाच आहे. माझें हें प्रचंड तत्त्वज्ञान वाचून प्रेमी जोडपीं लग्न केल्याशिवाय थोडींच राहणार आहेत ? फार काय, माझी मलाच खात्री देतां येत नाहीं ! तरी पण आपणाला दिसतें तें सत्य सागायला काय हरकत आहे ?



## ११

### " व्यवस्थितपणाचें वेड ...... "

वस्तु जागच्या जागीं ठेवण्याचें आणि व्यवस्थितपणाचें कांहीं लोकांना वेडच लागलेलें असतें, असें मला वाटतें ! त्याच्या आयुष्यातील बहुतेक वेळ वस्तूंचा उपयोग किंवा उपभोग घेण्याऐवजीं त्यांची व्यवस्था लावण्यांतच जातो. मला तर वाटतें, कीं एखाद्या दिवशीं सूर्य जर किंचित् एका बाजूला कललेला या लोकांना दिसला तर आकाशांत उडी मारून त्याला जागच्या जागीं ठेवण्याचा प्रयत्न करावयालासुद्धां हे लोक कमी करणार नाहींत !

मला स्वतःला या लोकाचा इतका राग येण्याचें कारण एवढेंच, कीं अशा तऱ्हेचा एक कमालीचा व्यवस्थित मनुष्य हल्लीं मला माझ्या हाताखालीं काम करावयाला मिळाला आहे. आणि त्याच्या या भलत्याच व्यवस्थितपणामुळें कामें जरी बिनबोभाट होत असलीं, तरी माझ्या जिवाची जी यामुळें त्रेधा उडते ती सागून संपावयाची नाहीं. एकच गोष्ट सांगतों, आणि ती ऐकल्या-बरोबर माझी किती शोचनीय अवस्था झाली आहे याची तुम्हांला कल्पना येईल. अवघे एक-दोन रुपये माझ्या खिशात उरले होते, आणि कांहीं कारणानें मीं ते टेबलावर काढून ठेवले होते. ते तसेच टेबलावर टाकून जरा कुठें मी बाहेर गेलों, आणि कांहीं वेळानें परत येऊन पाहतों तों रुपये कडीकुलुपांत बंद. त्याची चावी त्या व्यवस्थित माणसाच्या खिशांत आणि ऑफिसची वेळ होऊन गेलेली म्हणून तो व्यवस्थित माणूस वेळच्या वेळीं

घरीं निघून गेलेला ! आणि रागावणार कुणावर ? पैसे कुणी तरी चोरील म्हणून माझ्यावर उपकार करण्याकरिताच त्यानें बंद करून ठेवलेले. चहा घ्यावयालासुद्धा खिशांत पैसा नसल्यामुळें चहाच्या आशेनें मी एका मित्राच्या घरीं गेलों तों तो घरांत नव्हता, आणि त्याच्या बायकोकडे सरळ चहा मागण्याचें मला धैर्य नव्हतें. तेव्हां हळुहळू पाणी पिण्याच्या गोष्टी काढावयाला सुरुवात केली. पण ती बाई सरळ आणि भाबडी असल्यामुळें तिनें थंड पाण्याचा तांब्या आणून माझ्या पुढ्यात ठेवला. मी तरी चहाची तहान पाण्यावर भागवूं शकत नाहीं. तेव्हां घसा धरल्यामुळें डॉक्टरनीं थंड पाणी पिऊं नको असें मला सांगितलें आहे, वगैरे वगैरे गोष्टी मीं तिला ऐकविल्या. तेव्हा कुठें त्या बाईच्या डोक्यात माझा खरा मुद्दा शिरला; आणि तिनें मला एकदांचा चहा करून दिला.

हा मनुष्य येण्यापूर्वी मी कसा अगदीं सुखी होतों. सर्व तऱ्हेचे कागद, पुस्तकें, दौती, मधून मधून शेंगदाण्याच्या पुड्या या सर्व वस्तु कशा मजेदार अव्यवस्थितपणें टेबलावर पसरलेल्या असत. आणि सर्व वस्तु डोळ्यासमोर असल्यामुळें कधींही असला त्रास होत नसे. वाटेल तेव्हां वाटेल तें करावें. आणि आता ? आता कुठचे शेंगदाणे माझ्या टेबलावर ! जरा कुठें माझी नजर दुसरीकडे गेली, कीं यानें टेबल साफ केलेंच ! बरें या मनुष्याला काढून टाकावें तर हा अत्यंत कष्टाळु आणि प्रामाणिक आहे. माझी मलाच लाज वाटून त्याला काढून टाकण्याऐवजीं मीच थोडा थोडा व्यवस्थित होतों आहें !

आनंद इतकाच आहे, कीं ऑफिसांतून सुटल्यावर निदान घरीं तरी या माणसाचा मला त्रास नाहीं. आणि ऑफिसांतल्या व्यवस्थितपणाचा सर्व वचपा मी घरीं भरून काढतों. माझ्या घरांत तुम्ही प्रवेश कराल तर अत्यंत नयनाल्हादक दृश्य तुमच्या दृष्टीला पडेल ! काढून टाकलेले मोजे, इकडेतिकडे उडालेले ब्रश, जोडे, खुर्च्यांवरून आराम करीत पडलेले मळके कोट, त्याचप्रमाणें बिछान्यावर इतस्ततः पसरलेले धोब्याकडून आलेले सूट, इत्यादि इत्यादि वस्तु जगांत कुठेंही न मिळणारें स्वातंत्र्य माझ्या खोलींत उपभोगीत असतात. त्याचप्रमाणें मोठमोठ्या ग्रंथकारांचीं पुस्तकें, टूथ-ब्रशें आणि बिस्किटांचे डब्बे माझ्या खोलींत अगदीं गुण्यागोविंदानें एके ठिकाणीं नांदत

असतात. माझ्या आनंदी संसाराचें वर्णन माझ्या एका विवाहित मित्रापुढें जेव्हां मी करूं लागलों, तेव्हा त्याला माझा फारच हेवा वाटूं लागला, आणि संतापून तो म्हणाला, " लेका, लग्न केलं नाहींस तोंपर्यंत तुझ्या या गमजा. बायको कर, मग पाहतों कसा अव्यवस्थित राहतोस तो ! " त्याचे वरील शब्द ऐकून भीष्मासारख्या पुरुषश्रेष्ठानें आमरण लग्न न करण्याचा निश्चय का केला, यासंबंधीं माझ्या डोक्यात लख्ख प्रकाश पडला !

या व्यवस्थित लोकांच्या ध्यानात कांहीं कांहीं साध्या गोष्टीसुद्धां येत नाहींत. उदाहरणार्थ, पैसे जागच्या जागीं तिजोरींत ठेवणें. याना एवढं कळत नाहीं, कीं चोर आलाच तर सर्व जागा सोडून तो नेमका तिजोरी फोडणार. मुंबईतल्या एका प्रसिद्ध मोत्याच्या व्यापाऱ्याची गोष्ट मला माहीत आहे. अत्यंत मौल्यवान् मोत्यांच्या माळा, मौल्यवान् वस्तु ठेवण्याच्या तिजोरींत न ठेवता तो म्हणे टेबला-वरच्या टीपकागदाखालीं किंवा एखाद्या कॅलेंडरच्या मागें ठेवीत असे. हेतु हा, कीं चोर या जागा कधींच शोधीत नाहीं.

माझा अव्यवस्थितपणा एका टोंकाला तर माझ्या दुसऱ्या एका मित्राचा व्यवस्थितपणा अगदीं दुसऱ्या टोंकाला आहे ! सर्व वस्तु जशा काय फोटो काढण्याकरितां मांडून ठेविल्या आहेत ! पुस्तकाच्या शेल्फवर पुस्तकें रांगेनें मांडून ठेवलेलीं, प्रत्येक पुस्तकाला ठराविक रंगाच्या पुठ्याचें कव्हर, घासून-पुसून चकचकीत केलेला पाण्याचा तांब्या एका कोपऱ्यांत. त्यावर त्याहूनही चकचकणारा प्याला. मला तर त्यांतून पाणी प्यावयाला भीतीच वाटते. न जाणो आमच्या बोटाचा डाग लागला तर ! त्याचप्रमाणें कपड्याची व्यवस्था. मोडली घडी कीं करा होती तशी. मात्र त्याच्या या सर्व व्यवस्थितपणाचा परिणाम असा झाला आहे, कीं तो मनानें अत्यंत निर्बुद्ध आणि बाहेरून अगदीं बावळट झाला आहे. पुस्तकांची रांग मोडावयाची नाहीं आणि पानें मळवावयाचीं नाहींत, म्हणून तो फारसें वाचीत नाहीं; त्यामुळें तो मनानें निर्बुद्ध राहिला आहे. आणि स्वच्छ कपड्याच्या मोडलेल्या घड्या पुन्हा होत्या तशा व्यवस्थित करण्यांत बहुतेक वेळ गेल्यामुळें त्याच्या अंगावर बहुधा मळकेच कपडे असतात. त्यामुळें तो बावळट दिसतो. व्यवस्थितपणाचें वेड झालें म्हणून काय, कुठच्याही गोष्टीचें वेड हें वाईटच !

• • •

## २०

### " स्वतःला विसरण्याची संवय...... "

मला स्वतःला भावना आहेत, आणि दुसऱ्याच्या भावना दुखवूं नयेत हेंही मला कळतें. पण अलीकडे मला असे काहीं लोक भेटले कीं, स्वतःच्या मताचा थोडा फेरविचार करणें मला प्राप्त झालें आहे. सर्व जगात जर काहीं अत्यंत पवित्र व वंद्य असेल, तर त्या आपल्या स्वतःच्याच भावना, असें या लोकाना वाटतें. या लोकापैकीं एक तर आत्मभावनासंरक्षणाच्या रोगानें इतका पछाडला गेला आहे, कीं एखादे दिवशीं तो भर चौकात उभा राहून " लोक हो, ऐका ऐका, माझा तमाम जगाला असा संदेश आहे, कीं माझ्या भावना दुखवूं नका ! " असें जाहीर करील, अशी मला भीति वाटते ! त्यांत आणखी हा मनुष्य स्वतःला उदारमतवादी समजतो. त्यामुळें स्वतःच्या भावनाचा तो जेव्हा आपल्या उदारमतवादाशीं मेळ घालूं लागतो, तेव्हां तो देखावा पाहण्यासारखा असतो. त्याच्या मुलीनें काहीं वर्षांपूर्वी मिश्र-विवाह केला; तेव्हा तो तिच्यावर खूप रागावला होता आणि लोकानीं जेव्हा त्याला विचारलें, कीं तूं स्वतःला एवढा उदारमतवादी म्हणवीत असतांना आपल्या मुलीवर रागावलास कां ! तेव्हा त्यानें स्वतःच्या दृष्टीनें अत्यंत समर्पक उत्तर दिलें. तो म्हणाला, " अरे बाबानो, मी मिश्र-विवाहाच्या विरुद्ध नाहीं, पण माझें म्हणणें एवढेंच, कीं माझ्या भावना

तिनें दुखवावयाच्या नव्हत्या !" काय युक्तिवाद आहे ! तिनें मिश्र-विवाह केला, म्हणून याच्या भावना दुखावल्या, आणि याच्या भावना दुखवावयाच्या नाहींत म्हणजे तिनें मिश्र-विवाह करावयाला नको होता ! आणि असें असूनही हा उदारमतवादी महात्मा स्वतःला मिश्र-विवाहाच्या बाजूचा म्हणवीत होता ! मला केव्हां केव्हा या लोकाचा असा संताप येतो, कीं केवळ सूड म्हणून या लोकाच्या जितक्या म्हणून भावना दुखवितां येतील, तितक्या मनसोक्त दुखवून टाकाव्या, आणि पाहावें काय होतें तें !

खरी गम्मत अशी आहे, कीं हे लोक स्वतःला कधींच विसरू शकत नाहींत ! जगाच्या अफाट विस्तारात एक मनुष्य म्हणजे केवढा क्षुद्र जंतु, आणि या जंतूच्या भावना त्या काय, याचें या लोकाना प्रमाणच राहात नाहीं. सर्व जगाला विसरून आणि आपल्याच भावनाचा तीन्ही त्रिकाळ विचार करून हे लोक आपलें मन इतकें हळुवार करतात, कीं कुणी मोठ्यानें शिंकला तरी यांच्या भावना दुखावतात ! क्षणभर स्वतःला विसरून जर हे लोक जगात जिकडेतिकडे पसरलेल्या असंख्य दुःखी जीवांचा विचार मनात आणतील, तर याना लागलेला आत्मभावनेचा दुर्धर रोग थोडासा मागें हटून याना बरें वाटेल. पण हें सागावयाचें कुणीं ? हें सागितलें तरीसुद्धा याच्या भावना दुखावणार !

स्वतःला कधींही न विसरणारी दुसरी एक जात आहे. या जातीतल्या लोकाना भावना दुखावण्याचा विशेषसा प्रश्न नसतो. पण कोणत्याही प्रश्नावर विचार करतांना स्वतःच्या भावना हेंच अंतिम सत्य, असें हे लोक धरून चालतात. आणि खरें अंतिम सत्य असें असतें, कीं यांच्या भावनांच्या पापुद्र्याखालीं यांचा कसला ना कसला तरी आप्पलपोटेपणा दडलेला असतो ! आम्ही एकदां असेच प्रवासाला निघालों होतों, आणि आमच्यापैकीं बहुतेक मांसाहारी असल्यामुळें तशा तऱ्हेची खाद्यसामुग्री बरोबर घेण्याचा आम्ही बेत करीत होतों. तेव्हां मांस मुळींच आवडत नसलेला आमच्यापैकीं एकजण मांसाहारापासून मनुष्याच्या देहाला काय काय अपाय होतात, यावर आम्हाला एक लांबच लांब प्रवचन देऊं लागला. मोठ्या आवेशानें बोलत होता तो, आणि कदाचित् तो बोलत होता त्यांत कांहीं सत्यही असेल. कदाचित् खरो-

खरच त्याला आमच्या जिवाची काळजी वाटत असेल. पण माझ्यानें राहवेना. त्याचें प्रवचन मध्येंच थांबवून मीं त्याला स्पष्ट सांगितलें, कीं " आम्ही मांस खाऊन जागच्या जागीं मरून पडलों तरी हरकत नाहीं, पण आम्ही मांस खाणार ! तूं पाहिजे तर खाऊं नकोस, आणि तू एकटाच जगलास तर आमच्या नातेवाइकांना तार कर, आम्हीं मेलों म्हणून ! "

आत्मत्वाच्या रंगानें या लोकांची नजर इतकी भारून गेलेली असते, कीं जगांत निर्लेप, व्यक्तिव्यतिरिक्त असें कांहीं आहे, असें त्यांना वाटतच नाहीं. नेहमींच यांचे आप्पलपोटे हेतु असतात, असें मी म्हणत नाहीं. पण स्वतःला किंवा स्वतःच्या वैयक्तिक भावनांना हे लोक कधीं विसरूंच शकत नाहींत. आणि त्यामुळें अगदीं प्रामाणिकपणें बोलतांनासुद्धा हें लोक स्वतःला अगदीं हास्यास्पद करून घेतात. आमचे गणूकाका केव्हां केव्हां अशीच कमाल करतात. 'अध्यक्षांनीं सभा बरखास्त केली' याचा अर्थ अध्यक्षांनीं सभा जबरदस्तीनें मोडली असा आहे, असें तें मला एकदा सांगूं लागले. मीं म्हटलें, " अहो, बरखास्त केली म्हणजे सभा विसर्जन केली. त्यांत जबर-दस्तीचा कांहींच प्रश्न नाहीं ! " तेव्हां माझ्यावर उसळून ते म्हणाले, " अरे, तूं काय सांगतोस ! 'बरखास्त' हा शब्दच माझ्या कानाला इतका जबरदस्त वाटतो, कीं त्याचा असा साधासुधा मिळमिळीत अर्थ असणें शक्यच नाहीं ! "

त्या दिवसापासून माझी खात्री पटली, कीं प्रत्येक मनुष्यानें स्वतःला आणि स्वत:च्या भावनांना विसरण्याची थोडी तरी संवय केलीच पाहिजे !



## २१

### " क्रांति आणि उत्क्रांति...... "

परवां मुंबईत आणि आसपासच्या प्रदेशांत धरणीकंपाचे दोन-तीन बारीकसे धक्के बसले. घरें हादरलीं. भांड्यांकुंड्यांची आदळआपट झाली; आणि घाबरून माणसें सेरावैरा पळूं लागलीं. पण मला गंमत वाटली ती एका निराळ्याच प्रकारची. मी एका बड्या माणसाच्या घरीं गेलों होतों. तेथील मोलकरीण आल्यागेल्याला एक गोष्ट मोठ्या अभिमानानें सांगत होती. धरणीकंपानें बंगला जेव्हां हालूं लागला, तेव्हां घराची मालकीण धावत बाहेर आली आणि आपल्या मोलकरणीच्या गळ्याला मिठी मारून तिला मोठ्या प्रेमानें बिलगली, हीच ती अभिमानास्पद गोष्ट ! आपणाला नेहमीं दोन हात दूर उभें करून हुकूम फर्मावणारी बाई असहाय्य होऊन बरोबरीच्या नात्यानें आपल्या गळ्याला मिठी मारते, ही गोष्ट त्या मोलकरणीला सर्वांना सागण्यासारखी वाटली, यांत आश्चर्य नाहीं.

वर्गभेदानें सर्व मानवी समाज दुभंगला गेला आहे आणि आर्थिक विषमतेमुळें सत्ताधारी वर्ग सत्ता नसलेल्या वर्गाला पिळून काढून, त्या पिळणुकीच्या जोरावर आपलें अस्तित्व राखीत आहे; अशी परिस्थिति असल्यामुळें वरच्या वर्गांतल्या माणसाना खालच्या वर्गांतलीं माणसें हीं आपणासारखींच सुख, दुःख, कल्पना, भावना असलेलीं माणसें आहेत याचा विसर पडतो. पण निसर्ग जेव्हां एखादे वेळीं उग्र स्वरूप धारण करतो आणि सर्वच माणसांना

एका सामान्य संकटानें ग्रासून टाकतो, तेव्हा हे मानवनिर्मित कृत्रिम भेद त्या क्षणापुरते तरी गळून पडतात, आणि सार्वत्रिक मानव्याची निद्रिस्त ज्योत खडबडून जागी होऊन सर्व मनुष्यप्राण्यांना एकत्र आणते. धरणीकंपाच्या धक्क्यानें धनीण आणि मोलकरीण एकमेकींच्या गळ्यात पडल्या, त्याचें कारण हेंच.

तर मग कुणी म्हणेल, कीं निसर्गांत धरणीकंपासारखे प्रचंड उत्पात होणें, हें एकंदरींत माणसाच्या फायद्याचेंच आहे. मी तरी या प्रश्नाला 'होय' असेंच उत्तर देईन. उत्पातानीं केव्हां केव्हा खरोखरच फायदा होतो, इतकेंच नव्हे तर मधून मधून उत्पात होणें, हें अपरिहार्य आणि एकंदरींत उत्क्रांतीच्या नियमाना धरूनच आहे. उत्पात म्हणजे काहींतरी क्रांतिकारक गोष्ट होणें आणि क्रांतिकारक गोष्ट उत्क्रांतीच्या नियमाना धरून आहे, असें जेव्हा मी म्हणतों, तेव्हा पुष्कळाना आश्चर्य वाटेल कारण वाद करताना सर्वसाधारणपणें क्रांति विरुद्ध उत्क्रांति अशी भूमिका घेऊन लोक वाद करतात. क्रांति आणि उत्क्रांति या परस्पर विरुद्ध गोष्टी आहेत हें मला मुळी कबूलच नाहीं. उत्क्रांतीच्या नियमाचा क्रांति हा एक भाग आहे. उत्क्रांति ही जर एकसारखी वाढत जाणारी साखळी आहे असें धरून चाललें, तर क्रांति हा एक त्यातला दुवा आहे.

समाजस्थिति बदलण्याकरिता म्हणा, किंवा दुसरें काहीं करण्याकरिता म्हणा, क्रांतिकारक उपायाचा अवलंब करावा लागेल, असें जेव्हा कुणी म्हणतात, तेव्हा काहीं स्वयंमन्य शहाणे मोठ्या विद्वत्तेचा आव आणून सागतात, कीं हळूहळू उत्क्रांतीच्या तत्त्वानेंच सर्व गोष्टी घडवून आणाव्या; उगाच घाई करून क्रांतिकारक उपाय कशाला योजा? कारण निसर्गांतसुद्धा पाहा कशी प्रत्येक गोष्ट हळूहळू उत्क्रांत होत परिणतावस्थेला पोहोंचते! जणूं काय क्रांति म्हणजे काहीं तरी अनैसर्गिक आहे, क्रांतीचा उत्क्रांतींत समावेशच होत नाहीं! पण या क्रमवादी (*gradualist*) शहाण्याना मी निसर्गाचेंच उदाहरण देतों. रेशमाचा किडा लहानशा सुरवंटाच्या स्वरूपात असतो. अगदीं उत्क्रांतीच्या नियमाला धरून हळूहळू क्रमानें तो लहानाचा मोठा होत असतो. पण त्याच्या वाढींत एक क्षण असा येतो, कीं त्या वेळी सुरवंटाचें फुलपाखरू होतें! क्रमवाद्याना मी असें विचारतों, कीं सुरवंटाचें फुलपांखरू हा

फरक क्रांतिकारक नाहीं तर काय ? तुमची हळूहळू उत्क्रांति कुठें गेली ? त्या सुरवंटाची परिमाणात्मक (*quantitative*) वाढ होत होती, तिच्यांत एकदम गुणधर्मात्मक (*qualitative*) फरक झाला, ही क्रांति नाहीं तर काय ? अगदीं नेहमींचेंच उदाहरण पाहिजे असेल, तर मानवी गर्भाचें घेऊं. मातेच्या उदरात नऊ महिने अगदीं क्रमानें गर्भ वाढत असतो. हळूहळू सारखी वाढच व्हायची या क्रमवाद्यांच्या निर्बुद्ध तत्त्वानें जर निसर्ग चालत असेल, तर नवानंतर दहा आणि दहानंतर अकरा या हिशोबानें पोट फुटून माता मरेपर्यंत गर्भ वाढतच जाईल ! पण तसें काहीं एक न होतां नऊ महिने आणि दहा दिवसांनंतर एक नैसर्गिक क्रांति होऊन गोजिरवाणें मानवी बालक जन्माला येतें. खरें बोलावयाचें म्हणजे क्रांति हा उत्क्रांतीचाच एक अवश्यमेव भाग आहे. आणि हें सत्य निसर्गसिद्ध असताना क्रांतिकाराना मूर्ख ठरवून, स्वतःला क्रमवादी म्हणविणारे काहीं ढोंगी लोक जेव्हा जगत्कल्याणाच्या गोष्टी बोलतात, तेव्हां आपल्या ढोंगीपणावर ते अप्रामाणिकपणाचा कळस चढवितात, हेंच खरें !

● ● ●

## २२

### " स्तुति करण्याची कला......"

एकदा एका कवीची आणि माझी कोणीं तरी ओळख करून दिली, आणि तो कवि निघून गेल्यावर पूर्वी त्याची मला काहींच माहिती नसल्यामुळें त्याला ओळखत असलेल्या माझ्या एका मित्राला मी विचारलें, " कसा काय आहे रे तो कवि ? " तेव्हा त्या मित्रानें जरा घुटमळत उत्तर दिलें, कीं " मनुष्य स्वभावानें फार चांगला आहे, बुवा ! "

त्याचें हें उत्तर ऐकून मला अनिवार हसू कोसळलें, आणि तेव्हापासून एखाद्याविषयीं कोणी " मनुष्य स्वभावानें चांगला आहे ! " असें म्हटलें कीं मला अगदीं हंसू आवरत नाहीं. " स्वभावानें चांगला आहे, " याचा अर्थ " तो मनुष्य अगदीं निर्बुद्ध आहे " असें मी समजतों ! स्तुति करण्यासारखें एखाद्या माणसात काहींच सापडलें नाहीं म्हणजे स्तुतिकोशांतले अगदीं शेवटचे शब्द ' मनुष्य स्वभावानें बरा आहे, बुवा ! " नाहीं तर एखाद्या चित्रकाराविषयीं किंवा कवीविषयीं " तो कसा आहे ? " असें विचारलें असतांना " तो स्वभावानें बरा आहे ! " हें सांगण्यात मतलब काय ?

पण स्तुति करण्यासारखें काहींच नसताना दुसऱ्या माणसाविषयीं बोलावयाचेंच तर तें काही तरी चांगलें बोलावें, हाच उदात्त आणि सहृदय हेतु या माणसांचा

असतो. आणि खरें सांगावयाचें म्हणजे हीं असें बोलणारीं माणसें स्वतःच स्वभा-वानें फार चांगलीं असतात !

अगदीं याच्या उलट प्रकारचीं माणसेंही मात्र जगांत कांहीं थोडीं नाहींत. कोणाविषयींही तुम्ही त्यांना विचारा, कीं "कसा काय मनुष्य आहे तो ?" त्यांचें उत्तर टरलेलें; "कांहीं वाईट नाहीं, पण..." एवढें म्हणून घुटमळत घुटमळत ते त्याचा कांहीं तरी दोष तुम्हाला सांगतील. कोणाची स्तुति केली, आणि ती जर थोडीबहुत कमजास्त झाली, तर आपल्यावर खटला होऊन फाशीची शिक्षा होईल, असें या लोकांना वाटतें ! स्वतःला हे मर्मज्ञ टीकाकार समजतात आणि ज्या वेळेला कोठल्याही वस्तूच्या सौंदर्याचें आकंटपान करावयाचें, त्या वेळेला हे लोक त्या सौंदर्याचें पृथक्करण करीत असतात. तानसेनाचें गाणें ऐकत असतां त्याच्या मधुरालापानीं बेभान होण्याऐवजीं तो गात असलेला राग शुद्ध आहे की मिश्र आहे, किंवा गातां गातां त्याचा एखादा स्वर चुकला तर पुढें काय होईल, या विचारानें यांचे चेहरे काळवंडलेले असतात, आणि एखाद्या चित्रकाराची भव्य चित्राकृति पाहात असतांना त्यातील रचनासौष्ठवाची किंवा रंगदारीची तारीफ करण्यापूर्वी त्यानें वापरलेले रंग हलके आहेत कीं उची आहेत, या विचारानें त्याच्या डोक्यात काहूर माजतें.

या मृतहृदयी, दुःखी जीवाची खरोखर मला कींव येते. जगातल्या कसल्याही सुंदर अगर चांगल्या गोष्टीची याना मनमुराद, तोंड भरून स्तुतीच करतां येत नाहीं. आणि एखादा तशी करूं लागला, तर हे लोक त्याला 'उगाच खुशामत करणारा' असें म्हणतात. याना एवढें कळत नाही, कीं खुशामत करणारा माणूस निर्भेळ आनंद व्यक्त न करतां आपला स्वार्थ साधण्याकरितां धडधडीत खोटें बोलत असतो. स्वतःला झालेल्या आनंदांत आपणाला ज्यामुळें आनंद झाला त्यालाही सममागी करणे हाच विशुद्ध स्तुतीचा हेतु असतो. इतर कोणत्याही कलेप्रमाणें स्तुति करण्याच्या कलेचेंही ध्येय आनंद-दायित्व हेंच आहे. आणि मला तरी स्वतःला झालेल्या आनंदानें दुसऱ्याला आनंदी करणें हाच माणुसकीचा मुख्य भाग वाटतो.

● ● ●

## २३

### " तत्त्वांचा पाया ... "

त्या दिवशीं गणूकाका माझ्या खोलींत शिरले, तेव्हा हे खास मला कांहीं तरी बोलणार, असें त्यांच्या चर्येवरून दिसत होतें. आत शिरले, ते सरळ जाऊन त्यांनीं माझ्या ईझिचेअरवर अंग टाकलें. पण ईझिचेअरचा दांडा मीं नीट लावलेला नसल्यामुळें खुर्चीचा सांधा सरकून क्षणार्धांत त्याचा नितंब-प्रदेश जमिनीवर आदळून दोन्ही पाय एकदम वर गेले ! मीं चटकन् त्यांना सांवरून खुर्ची वगैरे नीट करून दिली. पण झालें तें झालें. त्यांना बोलायला कारण मिळालें.

" हल्लींचे लोक काय गद्धे आहांत रे तुम्ही ! तुमच्या वागण्यात, राहण्यात कांहीं तत्त्व आहे का ? कांहीं तरी खायचं ! कसं तरी राह्यचं ! काय रे हें ? एखादा गडी नाहीं ठेवता येत तुला खुर्च्या नीट लावून ठेवायला ? "

शरीराला बसलेल्या धक्क्यामुळें त्यांची तत्त्वनिष्ठा एकदम जागृत झालेली पाहून मी स्तंभितच झालों !

" खुर्चीचा दांडा लावायला विसरलों, त्यांत तत्त्व कसलं आलं आहे, काका ? " मी किंचित् हंसत म्हणालों.

" तें सोड रे. तुझीच एकट्याची गोष्ट नाहीं सागत, पण एकंदरींत सगळ्याच लोकांचं पाहतों तों कांहीं तत्त्व म्हणून नाहीं आयुष्यांत ! "

" तुमची बँकेंत शिल्लेक किती आहे, काका ? " मीं अगदीं सहज प्रश्न विचारला. काका आश्चर्यचकित झाले.

" का रे ? "

" नाहीं म्हटलं, बहुतेक तत्त्वनिष्ठ लोकांच्या तत्त्वाचा पाया त्याच्या बँकेंत सांपडतो ! "

आणि मी जें हें गणूकाकांना म्हणालों तें अगदीं खरें आहे. भरपूर पैसा जवळ असला, म्हणजे सर्व तत्त्वाचें अगदी व्यवस्थित परिपालन करता येतें. गणूकाकाच्या इतके माझ्याजवळ पैसे असते तर मीं दोन गडी ठेवले असते. मग खुर्च्या वगैरे सर्व वस्तु कशा व्यवस्थित राहिल्या असत्या माझ्या खोलींत, आणि ईझिचेअरचा दांडाही नीट लागला असता.

पण तत्त्वनिष्ठ लोक एवढीच गोष्ट नेमकी विसरतात ! मागल्या मद्यपान-बंदीच्या चळवळीतली एक गोष्ट मला आठवते. एका सुप्रसिद्ध देशभक्ताची बायको तलम, रेशमी, स्वदेशी साडी नेसून प्रचारकार्य करावयाला जात असे. सकाळीं दूध, टोस्ट्, लोणी वगैरे वस्तूंचा फराळ करून ती बाहेर पडत असे. एकदा एका मजुराला ताडी पिताना पाहून त्याला तिनें अगदीं कळवळ्यानें सांगितलें,

" ताडी पीना हराम है, बाबा । "

" आहे खरं हराम, बाईसाहेब. " तो मजूर म्हणाला, " पण, मला जर कोणी रोज सकाळीं अच्छेर दूध प्यायला देईल, तर नाहीं पिणार ताडी. "

देशभक्तीण निरुत्तर होऊन घरीं परत आली, असें म्हणतात. मी जर त्या मजुराच्या जागीं असतों, तर याहूनही झणझणीत उत्तर दिलें असतें. आकाशात तांबडें फुटल्यापासून तों गडद काळोख पडेपर्यंत मर मर काम करूनही स्वतःच्या पोटाची टीचभर खळगी ज्यांना भरता येत नाहीं, आणि भुकेनें तडफडणाऱ्या आपल्या पोटच्या पोरांना घोटभर दूध देता येत नाहीं, अशा मजुरांनीं आपला मनःसंताप ताडीच्या बाटलींत बुडवून टाकणें, हें हराम आहे खरें; पण त्यांची ही आर्थिक स्थिति बदलण्याचा काहीं एक प्रयत्न न करतां, दुधाचे प्याले आणि द्राक्षांचे घड फस्त करून ताडी न पिण्याचा सवंग उपदेश त्यांना करणें, हें हरामाहून हराम आहे !

पण भुकेकंगाल बहुजनसमाजाची आर्थिक स्थिति बदलण्याचा क्रांतिकारक प्रयत्न हे तत्त्वनिष्ठ लोक कसा करतील ? बहुजनसमाज भुकेकंगाल आहे आणि आपल्या रक्ताचें पाणी करून संपत्ति निर्माण करतो आहे, म्हणूनच या मूठभर तत्त्वनिष्ठ लोकाना या संपत्तीच्या जोरावर दररोज ताडी न पिता निर्भेळ दूध पिणें, घाणेरडे कपडे न घालता स्वच्छ परीट घडीचे कपडे वापरून स्वच्छता राखणें, आणि गावात रोगराई झाली असता आजारी पडण्याऐवजी डोंगरमाथ्यावरील उंच हवेशीर ठिकाणीं जाऊन आपल्या आरोग्याची नीट काळजी घेणें, इत्यादि इत्यादि तत्त्वाचें व्यवस्थित परिपालन करता येतें !

यावर कोणी विचारील, की सर्वसंगपरित्याग केलेले स्वार्थत्यागी महात्मे जेव्हा मोठमोठ्या तत्त्वाचा उपदेश करतात तेव्हा त्यांचाही हेतु स्वार्थीच असतो का ? खरेंच या स्वार्थत्यागाच्या तत्त्वाचा विचार करणें राहूनच गेलें. परवा एका महंताच्या मठातील सात-आठ लाख रुपयाच्या इस्टेटीसाठीं त्याच्या दोन शिष्यामध्यें दावा चालला होता, आणि दुसऱ्या एका महात्म्याच्या आश्रमाची किंमत काहीं लाखावर गेली आहे, असें म्हणतात. हे महंत आणि महात्मे स्वार्थत्यागाच्या तत्त्वाचे मोठेच पुरस्कर्ते असतात. कारण गरीबगुरीब बहुजनसमाजाच्या स्वार्थत्यागावरच याच्या मठाची आणि आश्रमांची भरभराट होत असते आणि श्रीमन्त लोकही या महात्म्याना उचलून धरतात. कारण आर्थिक दृष्ट्या शोषल्या जाणाऱ्या जनतेंत स्वार्थत्यागाच्या तत्त्वाचा जितका फैलाव होईल तितक्या प्रमाणात सत्ताधारी श्रीमंत लोकाचा स्वार्थ अधिक साधला जाईल. तिजोरीच्या रक्षणाकरिता ज्याप्रमाणें कुत्रे बाळगणें हें धनिकाचें कर्तव्य आहे, त्याचप्रमाणें विषम समाजरचनेच्या रक्षणाकरिता काही महात्मे पदरीं बाळगणें हेंही तितकेंच किंबहुना त्याहूनही अधिक फायद्याचें आहे. गरीब मूर्खांनीं किंवा पैसेवाल्या बदमाश शिष्यांनीं खाण्यापिण्याची, उठण्याबसण्याची, सर्व कांहीं राजासारखी सोय केल्यानंतर या महात्म्यांना स्वार्थत्यागाच्या तत्त्वाची सर्व जगभर घोषणा करीत फिरायला काय हरकत आहे ?

कारण, स्वार्थत्याग म्हणजे संपत्ति संभाळण्याची कांही एक यातायात न घेता संपत्तिपासून होणाऱ्या सर्व फायद्याचा यथेच्छ राजरोस उपभोग घेण्याची कला !

● ● ●

## २४

### " छोटे चोर आणि मोठे चोर..."

पूर्वाश्रमीं नानातऱ्हेच्या धाडसी चोऱ्या करून प्रसिद्धीस आलेल्या आणि आता वृद्धापकाळीं शांतपणें ईश्वरभजनात वेळ घालवणाऱ्या एका प्रख्यात अमेरिकन् चोराची एक मुलाखत मीं कुठेंशी वाचली. मुलाखत मोठी मनोरंजक आणि बोधप्रद आहे. खरे चोर आणि भुरटे चोर यांच्यामधला भेद त्यानें मोठ्या मार्मिक रीतीनें विशद केला आहे. तो म्हणतो, कीं " खरा चोर आपल्या साथीदाराचें नाव प्राण गेला तरी बाहेर फोडणार नाहीं. त्याचप्रमाणें आपला साथीदार गैरहजर का असेना, चोरी केलेल्या मालमत्तेंतील त्याचा वाटा तो कधींही गिळंकृत करण्याचा प्रयत्न करणार नाहीं ! "

चोरीच्या धंद्याचेंसुद्धा नीतिशास्त्र आणि तत्त्वज्ञान आहे, हें पाहून पहिल्यादा मला किंचित् आश्चर्य वाटलें; पण जरा खोल विचार करता बऱ्याचशा तत्त्वज्ञानांचा आणि नीतिशास्त्राचा उगम आपण करीत असलेल्या कृत्यांच्या समर्थनार्थ कांहीं तरी तात्त्विक इंद्रजाल उभें करण्याच्या मनोवृत्तींतच सांपडतो, असें मला वाटतें. आणि या विधानाची सत्यता चोरी करूं नये, असें प्रतिपादन करणाऱ्या लोकांच्या तत्त्वज्ञानाची बारकाईनें छाननी केल्यास आपणाला लगेच पटेल या सर्व तत्त्वज्ञानाची उभारणी मालकी हक्काच्या जाणिवेवर झाली आहे. कारण चोरी म्हणजे काय ? दुसऱ्याच्या मालकीची वस्तु त्याच्या परवानगीशिवाय

घेणें. अर्थात् मालकी हक्काच्या जोरावर सर्व समाजाचें नियत्रण करून जे आपली चैन अबाधित चालवितात, त्या सत्ताधारी वर्गानें चोरी हा भयंकर गुन्हा ठरवून त्याला कडक शिक्षा ठेवली, यात काहींच नवल नाहीं. सबंध कायदेशास्त्र आपले हे मालकी हक्क अबाधित राखण्याकरितांच सत्ताधारी वर्गानें निर्माण केलें आहे, आणि कायदा हा धर्माच्या आणि नीतीच्या पायावर उभारला आहे, वगैरे वगैरे तत्त्वज्ञानाच्या गोड थापाना बहुजनसमाजाच्या डोळ्यात धूळ फेंकून आपल्या सत्तेचें आसन स्थिर ठेवण्याचें एक प्रभावशाली साधन म्हणूनच कायद्याचा उपयोग सत्ताधारी वर्ग करीत असतो.

कोर्टात पाहिलेला एक उद्‌बोधक प्रसंग मला आठवतो. एका मॅजिस्ट्रेटच्या घरीं झालेल्या चोरीचा एक खटला दुसऱ्या एका मॅजिस्ट्रेटसमोर चालला होता. चार किंवा पाच रुपयांची चोरी झाली होती. चोराला आणून मॅजिस्ट्रेटसमोर उभा केला होता. अगदीं कंगाल दिसत होता तो; पण त्याचे डोळे मात्र कमालीचे पाणीदार दिसत होते. त्याला प्रश्न विचारल्यावर त्यानें आपली हकीकत सागायला सुरुवात केली. पूर्वी तो गिरणीत काम करणारा मजूर होता. दीड वर्ष सारें शहर पालथें घालूनही त्याला कुठें काम मिळालें नाहीं. बेकारीनें मेटाकुटीला येऊन शेवटीं त्यानें हा चोरीचा मार्ग पत्करला. आपल्या कृत्याचें तो मोठ्या जोरानें समर्थन करीत असता त्याचा आणि मॅजिस्ट्रेटचा कांहीं तरी खटका उडाला आणि मॅजिस्ट्रेट त्याच्या अंगावर ' चोर ' म्हणून ओरडला. एक क्षणभर तो मनुष्य थबकल्यासारखा दिसला. त्याच्या डोळ्यातून संतापाच्या ज्वाला बाहेर पडतातशा दिसू लागल्या.

" मी चोर ? " तो ओरडला, " तर मग मला काम न देता भुके मारून मोटार उडविणारे तुम्ही पैसेवाले लोक बडे चोर आहात ! "

त्याचे शब्द पुरे व्हायच्या आधींच कोर्टाच्या रखवालदारांनीं त्याला चूप केला ! आणि कोर्टाचा उपमर्द केल्याबद्दल त्याला होणार होती त्यापेक्षाही अधिक कडक शिक्षा झाली, ही गोष्ट वेगळी. पण छोट्या आणि मोठ्या चोराची ती चकमक पाहण्यासारखी झाली, यात शंका नाहीं.

तो चोर म्हणाला त्यात मला तरी काहीं चूक दिसत नाही. आपला फायदा व चैन जशीच्या तशी चालू राहण्याकरिता ज्या जागीं गिरणीत चार माग

एक मजूर सभाळीत होता, त्या जागी एका मजुराला आठ माग चालवा-वयाला लावून मजुरींत बचत करावयाची व बेकारी वाढवावयाची, आणि काम करून प्रामाणिकपणें पोट भरूं इच्छिणारा पण आपणच बेकार केलेला भुकेकंगाल मजूर पोट जाळण्याकरिता चोरी करूं लागला की त्याला 'चोर' म्हणावयाचें! दुसऱ्याच्या श्रमानें उत्पन्न होणारी संपत्ति त्याला धड पोटापुरतेंही न देता आपण घशाखालीं कोंबावयाची, आणि असली ही शिष्टसमत चोरी करून केवळ त्या चोरीच्या परिणामामुळें कंगाल झालेल्या दुसऱ्या माणसानें या संपत्तींतला लवमात्र भाग उचलला तर त्याला 'चोर' म्हणून शिक्षा करावयाची! चोराच्या उलट्या बोंबा म्हणतात, त्या अशाच असाव्या.

पण सध्या आपण ज्या तऱ्हेच्या समाजव्यवस्थेंत राहात आहोंत त्या तऱ्हेच्या व्यवस्थेंत या असल्या उलट्या बोंबानाच तत्त्वज्ञान आणि नीतिशास्त्र म्हणतात. एका माणसानें दुसऱ्या माणसाला ठार मारलें कीं त्याला खुनी म्हणतात. पण सत्ताधारी वर्गाच्या अमानुष महत्त्वाकांक्षा पुऱ्या होण्याकरिता एखाद्या महायुद्धात भाग घेऊन तुम्ही पावपन्नास मुडदे पाडलेत, कीं वीराग्रणी म्हणून तुमचें स्मारक उभारलें जातें! पोटाकरिता दुसऱ्याचे पाच रुपये उचलले तर त्याला चोरी म्हणतात, पण साम्राज्यवृद्धीच्या हावेनें राष्ट्रेंच्या राष्ट्रें खिशात घालण्याच्या कलेला मुत्सद्देगिरी म्हणतात. पण सत्ताधारी वर्गाकडून पोसल्या जाणाऱ्या तत्त्वज्ञान्यांनीं आणि नीति-शास्त्रज्ञांनीं तरी दलितवर्गानें जें केलें असता चोरी, गुन्हेगारी किंवा बंड असें म्हणावयाचें, तेंच सत्ताधारी वर्गानें केल्यास त्याला समाजधारणा, राष्ट्रसेवा किंवा मुत्सद्देगिरी अशीं गोंडस नावें कां देऊं नयेत?

● ● ●

## २५

## " शाईनें लिहिणारे लेखक आणि
## रक्तानें लिहिणारे लेखक... "

लेखक म्हणून मला जर कधीं धन्यता वाटली असेल, तर ती काल. माझ्या एका मित्राच्या घरीं मी काल गेलों, तेव्हा त्याची बायको अगदीं रागा-रागानें मला सांगूं लागली,

" काय लिहिता हो तुम्ही हें भलतं भलतं ? "

मीं म्हटलं, " काय ? "

" तें व्यवस्थितपणाविषयीं तुम्हीं कांहीं तरी लिहिलंत. "

" मग झालं काय, वहिनी ? " मी हंसत म्हणालों.

" झालं काय ? अहो, आमच्या बेबीनं तुमचा तो लेख वाचल्यापासून कमाल चालवली आहे. एक वस्तु जाग्यावर ठेवील तर शपथ ! शाळेंतून आल्यावर पुस्तकं एकीकडे उडवील, तर कपडे दुसऱ्या कोंपऱ्यात फेंकून देईल. असा नुसता धांगडधिंगा चालविला आहे तिनं. आणि बोलायची सोय नाहीं. कारण कांहीं बोलायला गेलं, तर म्हणते, ' त्या लेखात पाहा काय छापलं आहे तें. उगाच खोटं कांहीं तरी लोक छापतात वाटतं ? व्यव-स्थित राहण्यापासून कांहीं एक फायदा नाहीं ! ' सांगा, आतां हिच्यापुढें काय करायचं तें ? "

वहिनीचे ते शब्द ऐकून माझा आनंद गगनात मावेनासा झाला. इतकी निष्ठावान् शिष्यीण मिळाल्यावर कुणाला आनंद होणार नाहीं ?

खरोखरच छापलेल्या शब्दाचा महिमा काहीं और आहे खरा ! बेबीचीच गोष्ट कशाला. मोठीं वयातीत माणसेंसुद्धा कोणतीही छापलेली गोष्ट प्रमाणभूत समजतात. आमच्या गणूकाकांच्या देवादिकाच्या कल्पना तर राजा रविवर्म्याच्या चित्रांवरूनच ठरलेल्या आहेत. या बाबतींत तुम्ही त्याच्याशीं कांहीं वादविवाद करावयाला जाल, तर ते तुमचें मुळींच ऐकणार नाहींत. उलट तुम्हांलाच मूर्ख ठरवितील ! मीं मात्र त्याच्या या समजुतींचा एकदां पुरेपूर फायदा घेतला आहे. मी जेव्हां पहिल्यादांच मिशा काढल्या, तेव्हां ते माझ्यावर भयंकर रागावले.

" काय रे हें ? पुरुषासारखे पुरुष तुम्ही आणि हे काय बायकी चाळे ? "

" हं. काका, असं म्हणूं नका हं, " मी म्हणालों, " तुमच्या देवाना मिशा आहेत का पाहा बर. पाहा रविवर्म्याचं रामाचं, नाहीं तर कृष्णाचं चित्र. त्यांना तुम्ही बायकी म्हणणार वाटतं ? "

गणूकाकांना माझें म्हणणं पटलें कीं नाहीं कुणाला ठाऊक ? पण त्या प्रश्नावर त्यांनीं मला पुन्हा डिंवचला नाहीं. राजा रविवर्म्यानें माझी बाजू बेमालूम बचावली !

मी जेव्हां बेबीची गोष्ट गणूकाकाना सांगून छापील शब्दाची महती गाऊं लागलों, तेव्हां ते अगदीं कमालीचे अस्वस्थ झाले.

" तें काहीं नाहीं, " ते म्हणाले, " मलासुद्धां आतां लेख लिहून ते छापवून घेतले पाहिजेत. तुझ्या ओळखीचे बरेचसे मासिकवाले आहेत ना रे ? मग माझे लेख छापवून काढ. "

" पण तुम्ही लिहिणार कशावर, काका ? " मी म्हणालों.

" कशावर? शेंकडों विषयांवर. देवाचं भजन केल्यापासून फायदे, पैसा कसा राखावा, हें सर्व जग म्हणजे माया आहे, वगैरे वगैरे किती तरी विषय आहेत. "

काकांचे ते विषय ऐकून मला हंसू येत होतें, पण त्यांना राग येईल म्हणून मीं तें आवरून धरलें. पण काकांना तरी कां हंसावयाचें ? लेखक लेखक

म्हणून मिरविणारे बरेचसे लोक असलेच शिळे आणि कळकट विचार मोहक आणि मंजुळ भाषेत घोळवून लोकाना चारण्यापलीकडे दुसरें काय करतात ? आणि तुम्ही जर त्याना म्हणाल,

"काय हो, तुम्हाला असं जर काहींच सागण्यासारख नाहीं, तर तुम्ही लिहूं नका," तर मोठा गंभीर आव आणून ते तुम्हाला सागतील, "आम्हाला प्रचंड गोष्टी सागावयाच्या आहेत, पण लोकाना पटायला हव्यात ना त्या !"

हे शब्द उच्चारताना आपण काय म्हणतों आहोंत याची त्यांना बहुधा कल्पना नसते. पण त्याच्या त्या म्हणण्यात सत्य मात्र काठोकाठ असतें. लोकाचे नेते आणि लोकांचे खुशामस्करे असे लेखकाचे जर दोन वर्ग केले, तर आपण या दुसऱ्या वर्गातले आहोंत असाच कबुलीजबाब वरील विधानात असतो.

बेबीची गोष्ट घेतली काय किंवा गणूकाकाची घेतली काय, छापील शब्दावर एवढा विश्वास ठेवला जातो, याचा अर्थ इतकाच कीं खऱ्या लेखकाकडून लोक नेतृत्वाची अपेक्षा करतात; खुशामतीची नव्हे. म्हणूनच आपल्या कलेशीं इमानानें वागणारा कोणताही लेखक केवळ पुढ्यात कागद आहे, आणि जवळ शाई आहे म्हणून लेखणी उचलणार नाहीं. माझ्या एका आवडत्या ग्रंथकाराचे शब्द मला आठवतात. त्याचें एक लहानसें पुस्तक खूप लोकप्रिय झालें, आणि जो तो येऊन त्याचें अभिनंदन करूं लागला. अभिनंदनाच्या माऱ्यानें कंटाळून जाऊन तो स्वस्थ बसला असतां एक भक्त आत शिरून त्याची स्तुति करूं लागला, "किती छानदार पुस्तक आहे तुमचं. किती सुरेख लिहिता तुम्ही !"

"असं ?" तो डोकें वर करून शातपणें म्हणाला, "माझीं पुस्तकं मी शाईनं लिहीत नाहीं. हृदयातल्या रक्तानं मी माझा प्रत्येक शब्द लिहितों !" खरंच, धंदेवाईक लेखक आणि कलावंत लेखक यातला फरक हाच, कीं एक आपलें लिखाण शाईनें लिहितो, आणि दुसरा रक्तानें लिहितो.

● ● ●

## २६

## " माणसें – चांगलीं आणि वाईट..."

मी स्वतःला फार चांगला मनुष्य समजतों. मला वाटतें प्रत्येक मनुष्य स्वतः-ला फार चांगला समजतो. अगदीं दुष्ट समजला जाणारा मनुष्य जर एखादे दिवशीं मनमोकळेपणानें बोलूं लागला, तर तोही स्वतःला फार चांगला समजतो असेंच तुम्हांला आढळून येईल. याचें कारण काय म्हणून कुणीं विचारलें, तर मला तरी नीटसें सांगतां येणार नाहीं. कदाचित् मनुष्यस्वभावाचा असा धर्मच असेल कीं स्वतःच्या दोषापुरता मात्र प्रत्येक मनुष्य पूर्णपणें आंधळा, पण गुणांच्या बाबतींत मात्र लखलखीत डोळस ! काय असेल तें असो. हें असें आहे खरें !

या सर्व गोष्टींची मला आठवण व्हायचें कारण मी स्वतःला फार चांगला समजत होतों, आणि आतांपर्यंत तरी सर्व लोक मला चांगला म्हणतात, अशी माझी कल्पना होती. पण नुकताच या कल्पनेला चांगलाच धक्का बसला. एका कुटुंबातली मंडळी मला अट्टल बदमाश समजतात. आणि भेटेल त्या मनुष्याकडे माझ्या बदमाशीचें रसभरीत वर्णन करतात, असें मला कळलें. आणि त्यांच्या दृष्टीनें मी बदमाश कां ठरलों तेंही मला समजलें.

मी कबूल करतों, कीं जगांतले कांहीं थोडे लोक तरी मला बदमाश समजतात हें कळल्यावर मला वाईट वाटलें. पण पुन्हा नेहमींच्या मनुष्य-स्वभावाप्रमाणें ती मंडळीच बदमाश आहेत, तेव्हां बदमाश लोकांनीं मला

बदमाश ठरविलें, त्याचा अर्थ मी चांगलाच मनुष्य आहें असा युक्तिवाद लढवून मी मनाचें समाधान करून घेतलें. काय मनुष्यस्वभाव आहे पाहा ! एखाद्यानें आपणाला चांगलें म्हटलें तर तो मनुष्यच चांगला आहे, असें आपण म्हणतों आणि चांगल्या मनुष्यानें आपणाला चांगला म्हटलें म्हणून आपण चांगले ! आणि एखाद्या मनुष्यानें आपणास बदमाश ठरविलें, तर तो म्हणणारा मनुष्यच बदमाश असला पाहिजे, अशी आपण आपल्या मनाची खात्री करून घेतों. आणि अर्थात् बदमाश मनुष्य चांगल्या माणसांना बदमाशच म्हणणार, असा पोक्त विचार करून आपण पुन्हा स्वतःला चांगलेच ठरवतों !

पण माझ्या मनापुढें उपस्थित झालेला मुद्दा निराळाच आहे. रंगाच्या बाबतींत ज्याप्रमाणें अमुक एक वस्तु हिरवी आहे, अमुक निळी आहे, अशीं आखीव मतें देतों, त्याप्रमाणें मनुष्याच्या बाबतींतसुद्धा अमुक मनुष्य चांगला आहे, अमुक बदमाश आहे, असा असा मनुष्य मत्सरग्रस्त आहे, तमका माणूस अगदीं निर्मत्सर आहे, अशा एकांतिक कल्पना करणें सत्यपूर्ण होईल का ?

हा प्रश्न माझ्या मनात उद्भवावयाचें कारण मला कांहीं लोक चांगला समजतात, तर दुसरी कुणी मंडळी बदमाश ठरवतात, हें तर खरेंच, पण त्याहीपेक्षा दुसरें एक जबरदस्त कारण झालें. माझ्या ओळखीचा एक मनुष्य आहे. आमच्यापैकी कुणालाही जर तुम्ही त्याच्याविषयीं विचाराल, तर आम्ही एकमुखानें सांगूं कीं अत्यंत सालस, अत्यंत प्रेमळ, भारीच गोड स्वभावाचा मनुष्य आहे तो. पण एक भयंकर गोष्ट मला अशी कळली, की त्याची बायको त्याचा मनापासून तिरस्कार करते ! तर मग, कुणी म्हणेल कीं ती दुष्ट स्त्री असली पाहिजे. तसें मुळींच नाही. तिला ओळखणाऱ्या कुणाही स्त्रीला अगर पुरुषाला विचारा, ती अत्यंत प्रेमळ व सालस बाई आहे, असेंच कुणीही सांगेल ! आणि असें असूनही ती आपल्या नवऱ्याचा तिरस्कार करते व तिचें आणि नवऱ्याचें पटत नाहीं हें ऐकून सर्व लोक आश्चर्यसागरांत बुडून जातात. पण त्या दोघांच्या संबंधाचें सूक्ष्म निरीक्षण करता मला असें आढळून आलें आहे कीं, ती फार उमद्या स्वभावाची व खेळाडू वृत्तीची आहे. नानातऱ्हेच्या लोकांत मिसळावें, हंसावें, खेळावें असें

तिला वाटतें. आणि बरोबर हीच गोष्ट तिच्या नवऱ्याला आवडत नाहीं. इतका चांगला असलेल्या त्या माणसाच्या मनाला असूयेची विकृति जडलेली आहे. मला वाटतें त्याचा अपराध नसेल, पण अजूनही त्याला या मानसिक दोषावर विजय मिळविता आलेला नाहीं. आपल्या बायकोनें कुणाशीं फारसें बोललेलें हंसलेलें खेळलेलें त्याला मुळींच आवडत नाहीं. पण काय, कुणाकड ती ज्यास्त वेळ पाहात राहिली तरीही त्याला राग येतो. आणि तिचा तर स्वभाव अत्यंत खेळाडू आहे. अर्थात् हा काहीं तिचा अपराध नव्हे आणि त्याच्या मनाच्या दुबळेपणामुळें त्याचाही काहीं इलाज नाहीं. पण सर्व लोकाना प्रिय असलेला तो, सर्व लोक जिच्या चांगुलपणाची वाहवा करतात अशा आपल्या बायकोच्या तिरस्काराला पात्र झाला आहे ! आणि मला या गोष्टीचें मुळींच नवल वाटत नाही. निळा रंग नुसता पाहिला तर छानदार दिसतो, त्याचप्रमाणें पिवळा रंगही स्वतंत्रपणें मोहक दिसतो. पण हे दोन रंग जर का एके ठिकाणीं मिसळले, तर निळाही नाहींसा होतो आणि पिवळाही नाहीसा होतो, आणि तिसराच हिरवा रंग दृष्टीला पडतो ! ही घटना जितकी आश्चर्यकारक, तितकीच दोन चांगलीं माणसें एकठिकाणीं आलीं असता तीं एकमेकाना वाईट दिसावीं हीही घटना विचित्र !

एका विशिष्ट व्यक्तिसमूहात ( Group ) एखादा मनुष्य चांगला ठरतो, तोच दुसऱ्या व्यक्तिसमूहात बदमाश ठरतो ! मग तो खरोखर असतो तरी कसा ? का ज्याप्रमाणें पाणी ज्या आकाराच्या भांड्यात ओतावें तो आकार धारण करतें, त्याचप्रमाणें मनुष्यस्वभावाचें पाणीसुद्धा ज्या प्रकारच्या परिस्थितीच्या प्याल्यात तें असेल त्याप्रकारचें स्वरूप धारण करतें ? मला तरी या प्रश्नाचें उत्तर देता येत नाही.



## २७

## " धर्माचे उपयोग... "

आमच्या गणूकाकाचा एक विधूर मित्र त्याच्याशी एकदा गप्पा मारावयाला आला होता, तेव्हा त्या दोघांमधला संवाद मला मोठा मनोरंजक वाटला. आपली बायको मेल्यानंतर आपण किती शोकग्रस्त झालों, आणि तें दुःख विसरण्याकरिता आपण काय काय उपाय योजिले, याचें तो वर्णन करीत होता. बायको जिवंत असताना आपण एखादी दुसरी विडी ओठांत असों, असें तो म्हणाला, पण नंतर दुःख विसरण्याकरिता विड्यांचीं बंडलेंच्या बंडलें तो फस्त करूं लागला, तरीही काही विसर पडेना! गांजा ओढून पाहिला, अफूसुद्धा खाऊन पाहिली, पण त्याच्या मनाला समाधान म्हणून मिळेना! शेवटी तो धर्माकडे वळला. सकाळ-संध्याकाळ भजन पूजन, कथा-कीर्तन इत्यादि धार्मिक कृत्यात तो वेळ घालवू लागला; आणि त्याच्या मतें धर्माच्या योगानें त्याच्या मनाला बरेंचसें समाधान मिळालें.

या सर्व गोष्टींचें मोठ्या गंभीरपणें तो रसाळ वर्णन करीत होता. आणि गणूकाकाही मान डोलवीत तें ऐकत होते. धर्मभावनेच्या उमाळ्यानें दोघेही धर्मवीर सद्गदित झाले होते. तो निघून गेल्यावर गणूकाकांनीं चष्म्याच्या काचावर बुब्बुळें चढवून माझ्याकडे विजयी मुद्रेनें पाहिलें.

" धर्माशिवाय गत्यंतर नाहीं, बाबा! " मी चीत झालों आहे अशी समजूत करून ते म्हणाले.

" तें कसं काय ? " मी म्हणालों.

" ऐकलंस ना तो काय सांगत होता तें ? "

" ऐकलं, मग काय ? " मी म्हणालों.

" शेवटीं धर्मानं त्याच्या मनाला समाधान मिळालं ! "

" अस्सं, अस्सं. " मी म्हणालों, " दुःख विसरण्याकरिता पहिल्यादां विड्या, विड्यानंतर अफू, आणि अफूनेंही समाधान होईना तेव्हां धर्म ! म्हणजे विड्या, अफू आणि धर्म यांत धर्म सर्वांत अधिक प्रभावशाली ठरला ! कबूल, कबूल, बुवा. खरं आहे तुमचं म्हणणं ! "

काकांनीं रागानें नाकावरचा चष्मा कपाळावर चढविला, आणि माझ्या-संबंधीं सर्व आशा सोडून देऊन ते तडक बाहेर निघून गेले !

मला स्वतःला धर्म म्हणजे काय तें विशेषसें कळत नाहीं. पण गणू-काकांच्या त्या दिवसाच्या संवादापासून मला थोडी थोडी अंधुक कल्पना येऊं लागली. धर्माचा उपयोग अफूच्या गोळीसारखा केला जातो खरा. अशिक्षित आया ज्याप्रमाणें आपल्या रडक्या मुलांना अफूची बाळगोळी देऊन घरातील कामें करावयाला मोकळ्या होतात, त्याप्रमाणेंच आपल्या सदसद्विवेकबुद्धीला धार्मिक अफूच्या गोळीनें झोंपी घाडून कांहीं लोक आपापलीं कामें शांतपणें उरकतात. एकदां रात्रीं नऊ-दहाच्या सुमाराला मुंबईजवळच्या कुठल्या तरी उपनगराला मी आगगाडीनें जात होतों. माझ्या शेजारींच एक मारवाडी बसला होता. मला वाटतें, पेढी बंद करून तो घरीं जात होता. चष्मा लावून आपल्या हिशोबांच्या चोपड्यांचा तो लक्षपूर्वक अभ्यास करीत होता. काहीं वेळानें त्यानें चोपड्या बंद केल्या खिशांतल्या नोटा नीट जागच्या जागीं ठेवल्यानंतर शांत-पणें त्यानें खिशांतून एक भगवद्गीतेची प्रत काढली, आणि मोठ्या आस्थेनें त्यांतले अध्याय तो वाचूं लागला. वाचतां वाचतां तो इतका उल्हसित झाला, कीं त्याच्यानें राहवेना. माझ्यापुढें पुस्तक धरून तो म्हणाला,

" ज्यो शेट्, ' नायं हन्ति न हन्यते ', आत्मा मारतो बी नथी ने मरतो बी नथी ! भगवान् कृष्णजी कमाल करे छे ! आ, हा हा हा ! "

हिशोबाच्या चोपड्या तपासल्यानंतर दामदुप्पट व्याजानें पिळून काढलेले शेंकडों आत्मे आपल्या नांवानें तळतळाट करणार, या कल्पनेनें बेचैन

झालेल्या सदसद्विवेकबुद्धीला 'आत्मा मारतो बी नथी ने मरतो बी नथी' — आपण मुंड्या मुरगाळलेले आत्मे मरूं शकत नाहींत, आणि आपला आत्मा त्यांना मारूंही शकत नाहीं — हें तत्त्वज्ञान कां समाधान देणार नाहीं ?

हा झाला धर्माचा किरकोळ उपयोग ! पण सत्ताधारी वर्ग आणि त्यांच्या बगलेंतले धर्मगुरु या धार्मिक अफूचा फार घाऊक प्रमाणावर उपयोग करतात. या जन्मीं मरेमरेतों काम करून भुकेकंगाल राहिलात तरी हरकत नाहीं; कारण स्वर्गसाम्राज्य तुमच्यासाठींच आहे, इत्यादि धार्मिक संदेशांची भरपूर अफू चारून अज्ञ बहुजनसमाजाला सत्ताधाऱ्यांनी चालविलेल्या त्यांच्या पिळणुकीचा भास होऊं न देतां सत्ताधाऱ्यांची सत्ता अबाधित राखण्याचें काम हे धर्ममार्तंड मोठ्या शिताफीनें पार पाडतात. सत्ताधारी वर्गाचा पुरस्कार करणाऱ्या एका प्रख्यात् तत्त्ववेत्त्यानें — नकळत कां होईना — एक सुरेख कबुलीजबाब दिला आहे. परमेश्वराच्या अस्तित्वासंबंधीं साधकबाधक सर्व मुद्याचा विचार करून थकून गेल्यानंतर तो म्हणतो, "परमेश्वर जर नसेल, तर आपण एक परमेश्वर निर्माण केला पाहिजे."

खरं आहे तो कशाला निर्माण केला पाहिजे तें सांगण्याची जरूरच नाहीं.



## २८

### " पति आणि वल्लभ......"

एका जगद्विख्यात कादंबरीकाराची एक अत्यंत मनोरंजक कादंबरी मागें एकदा आम्हीं वाचली. त्यांतला विषयसुद्धां जितका महत्त्वाचा तितकाच मजेदारही होता. कादंबरीचा नायक एक सुस्वभावी, सालस, अत्यंत प्रेमळ असा एक मास्तर होता. आपल्या सुंदर बायकोवर त्याचें निरतिशय प्रेम होतें. त्या दोघाना दोन-तीन मुलेंही होतीं. त्याच्या एकंदर चांगलेपणाबद्दल तिला अत्यंत कृतज्ञता वाटे. पण तिचें प्रेम मात्र दुसऱ्या एका तरुणावर असून तिच्या आणि वल्लभाच्या रोज गांठीभेटी होत असत. हा प्रकार तिच्या नवऱ्याच्या ध्यानात आल्यावर त्यानें जेव्हा तिला जाब विचारला, तेव्हा चाललेल्या प्रकाराबद्दल मुळींच दिलगिरी प्रदर्शित न करता तिनें त्याला स्पष्ट सांगितलें, कीं " तुम्ही माझ्यासाठीं सर्व कांहीं करता हें मला कबूल आहे; पण मला जें पाहिजे तें तुमच्याकडून मिळत नाहीं ! "

कादंबरी अत्यंत शोकपर्यवसायी आहे, पण ती वाचल्यानंतर आम्हीं ज्या मुद्द्याचा विचार करीत होतों तो हाच कीं, तिला नवऱ्याकडून जें मिळत नव्हतें आणि वल्लभाकडून मिळत होतें तें काय ? पहिल्याच क्षणीं मी संतापानें असें उत्तर दिलें, कीं वल्लभाकडून तिला हवी होती तसली खुशामत मिळत होती. तिचा आणि तिच्या मुलांबाळांचा संसार चालविण्याकरितां

काम करून तिच्या वल्लभाला घाम काढावा लागत नव्हता. तें काम तिचा गरीब बिचारा नवरा करीत होता. आणि साहजिकच जिच्यासाठीं अंग मोडावें लागत नाहीं तिला 'देवता' 'त्रिभुवनसुंदरी' वगैरे विशेषणांनीं गौरवून आणि दिव्य प्रेमाचे गोड गोड पोवाडे गाऊन हरभऱ्याच्या झाडावर चढवावयाला तिच्या वल्लभाला काय हरकत? आणि तिलासुद्धां तो कां न आवडावा? नवऱ्यासाठीं चूल फुंकण्यापासून तों कपडे धुण्यापर्यंत नानातऱ्हेच्या खस्ता तिला काढाव्या लागत, पण वल्लभासाठीं कांहींच करावें लागत नसे — अर्थात् त्याच्यासाठीं खस्ता खाणारीं दुसरीं माणसें होतीं! — तेव्हा तिला पाहिजे होतें तें त्याच्याकडून तिला मिळत होतें, त्यांत काहींच नवल नाहीं.

पहिल्याच तडाख्याला मीं तिच्याविरुद्ध असा निकाल दिला खरा; पण तो कितपत न्याय्य आहे कुणाला ठाऊक! कदाचित् तिच्या काव्यात्म जीवाच्या खरोखरच काहीं प्रामाणिक अपेक्षा असतील, आणि तिचा पति त्या पुरवूं शकत नसेल. वल्लभ-वल्लभेच्या संबंधातील अद्‌भुतरम्यता पति-पत्नींच्या संबंधांत मुळींच नसावी, असें मी तरी म्हणणार नाहीं. मला कबूल आहे, कीं तांदूळवाल्याचीं बिलें आणि घरवाल्याचें भाडें चुकतें करता करता अद्‌भुतरम्यतेला विशेष वाव राहात नाहीं. तरीपण संसाराच्या रूक्ष व्यवहाराला अद्‌भुतरम्यतेची थोडी तरी रुपेरी किनार असावी, असें मला वाटतें. अर्थात् याचा अर्थ असा नव्हे कीं उठता बसता प्रत्येक पतीनें आपल्या पत्नीला 'हे हृदयेश्वरी!' आणि प्रत्येक पत्नीनं आपल्या नवऱ्याला 'हे प्राणनाथ!' या शब्दांशिवाय हाक मारूं नये!

बारीकसारीक गोष्टीसुद्धां संसाराला थोडीबहुत अद्‌भुतरम्यता आणूं शकतात. एक-दोन उदाहरणें माझ्या डोळ्यांसमोर येतात. माझ्या एका मित्राची बायको आपला नवरा ऑफिसात जावयाला निघाला म्हणजे हातांत कसलेंही काम असलें तरी तें टाकून देऊन बाहेर येते, आणि खुंटीवरचा त्याचा कोट काढून साफसूफ करून स्वतः त्याच्या अंगावर चढवते. तिच्या नवऱ्याचे हात मोडलेले नाहींत. चागले धडधाकट आहेत. पण या असल्या क्षुल्लक गोष्टींनींच पतीचा वल्लभ आणि पत्नीची वल्लभा होते. तिच्या त्या लहानशा कृत्यांत वल्लभेची आतुरता दिसून येते. याच्या उलट माझ्या एका शेजाऱ्याचा संसार. त्यानें

एकदा चुकून आपला हातरुमाल मळका कां राहिला म्हणून आपल्या बायकोल विचारलें. झालें ! रडत ओरडत ती गरजली, " एवढासा मेला हातरुमाल, तो सुद्धां अगदीं मींच धुतला पाहिजे ! तेवढासुद्धां धुवून घेता येत नाहीं ना ! "

अर्थात् पतिपत्नींच्या संबंधात अतिपरिचयामुळें एकमेकांची अवज्ञा होण्याचा संभव असतो, आणि वल्लभवल्लभेच्या संबंधातल्या चोरटेपणाची विशिष्ट खुमारीही त्यांना कधीं चाखता येणार नाहीं, हें खरें आहे. एक तत्त्वज्ञ तर असें म्हणतो, कीं विरहानें आतुरता वाढते, म्हणून प्रत्येक पति-पत्नीनें वर्षांतून दोन-चार महिने तरी एकमेकापासून कुठें तरी दूर जाऊन राहावें ! तें कांहींही असो. पण एवढें खरें कीं संसाराचें नाटक जर आनंदपर्यवसायी करावयाचें असेल, तर प्रत्येक पतीनें वल्लभाची आणि प्रत्येक पत्नीनें वल्लभेची भूमिका करण्याचा थोडा-फार तरी अभ्यास ठेवला पाहिजे.



# २१

## " पोरकटपणा... "

' किती पोरकट आहेस तूं अजून ! ' असें म्हणून लोक माझी निर्भर्त्सना करतात, तेव्हा त्याच्या त्या निंदेचा माझ्यावर स्तुतीसारखा परिणाम होऊन मला आनंदाच्या उकळ्या फुटूं लागतात ! मी पोरकट आहें याचा अर्थ इतकाच, कीं माझें अंतःकरण अजूनही ताजें आहे; माझा मेंदू पूर्णपणें तल्लख आहे; मी अत्यंत जिवंत आहें ! कारण पोरकटपणा म्हणजे काय ? ज्या गोष्टीकडे मोठीं झालेलीं — जुनाट झालेलीं माणसें ' उंः, काय आहे त्यात ! ' म्हणून ढुंकूनसुद्धा पाहात नाहींत, त्या गोष्टींतसुद्धा नावीन्य पाहणें आणि त्या नावीन्यानें चकित होऊन क्षणाक्षणाला नवनवीन आनंदानें बेहोश होणें ! परवांच माझ्या खोलींत एक मजेदार गोष्ट घडली. संध्याकाळची वेळ होती. मी आणि गणूकाका गप्पा करीत बसलों होतों. माझ्या एका शेजाऱ्याची छोटी मुलगी माझ्याजवळच खेळत बसली होती. काळोख पडूं लागला, तेव्हां बटन दाबून मीं खोलींतला विजेचा दिवा पेटवला. खोलींत एकदम लख्ख उजेड झाल्याबरोबर त्या पोरीला जो काहीं आनंद झाला, तो विचारूं नका ! खोलीभर ती टाळ्या पिटीत नाचूं-बागडूं लागली.

" बटन दाबल्याबरोबर दिवा कां हो पेटतो ? " तिनें मला लाडिकपणानें प्रश्न विचारला.

" दिवा पेटलेला कधीं जन्मांत पाहिलास नाहीं वाटतं ? " गणूकाका

तिच्या अंगावर खेंकसले. आधींच तिच्या अकारण — अर्थात् गणूकाकांच्या दृष्टीनें — नाचण्या-बागडण्यानें गणूकाका भडकले होते. त्यात आणखी तिनें तो पोरकट प्रश्न विचारल्यामुळें गणूकाका खवळले यात नवल नाहीं! बटन दाबल्यावर दिवा पेटतो, आणि दिवा पेटल्याबरोबर काळोखाच्या ठिकाणीं उजेड येतो, यांत गणूकाकाच्या मोठ्या झालेल्या — कीं मेलेल्या ? — मनाला आश्चर्य आणि आनंद कसला वाटणार ? — बटनाला बोट लावल्याबरोबर क्षणार्धांत काळोखी खोली लख्ख, सफेत उजेडानें भरून जाते, हें अद्‌भुतरम्य दृश्य पाहून या चिमुकल्या जिवाला इतका अनावर आनंद झाला, कीं खोलीभर नाचून बागडून तो व्यक्त केल्याशिवाय त्या ' पोरकट ' प्राण्याला राहवेना! इतकेंच नव्हे, तर त्या आनंदाचें कारण काय — बटन दाबल्या-बरोबर दिवा कां पेटतो — हें जाणण्याची तीव्र जिज्ञासा तिच्या मनांत उत्पन्न झाली. अर्थात् अशा तऱ्हेची जिज्ञासा व्यक्त करणें हें पोरकटपणाचें लक्षण आहे, असें बऱ्याच मोठ्या माणसांना वाटतें. झाडावरून फळ खालीं पड-तांना पाहून न्यूटनच्या मनाला मोठें आश्चर्य वाटलें, आणि त्याच्या कारण-मीमांसेचा विचार करता करता गुरुत्वाकर्षणाचा जगद्विख्यात सिद्धान्त त्यानें शोधून काढला. पण तें फळ पडत असताना त्याच्या शेजारीं जर आमचे गणूकाका बसलेले असते आणि फांदीवरून तुटलेलें फळ खालीं जमिनीवर कां पडलें, वर आकाशांत कां गेलें नाहीं, असा प्रश्न जर का न्यूनटनें त्याच्यासमोर उपस्थित केला असता, तर " काय पोरकट आहेस रे तू ? " म्हणून हंसत हंसत गणूकाकांनीं न्यूटनचा करकचून कान पिरगळला असता, याची मला बालंबाल खात्री आहे!

माझ्यावर जेव्हां गणूकाका किंवा दुसरे काहीं लोक पोरकटपणाचाच आरोप करतात, तेव्हा त्याचीं कारणें निराळींच असतात. खरोखरच केव्हां केव्हा लहान पोरासारखी माझी वागणूक पोरकट असते खरी! लहान मुलें ज्या-प्रमाणें एखादा पोरकट प्रश्न विचारून इतर लोकांसमोर खोटें बोलणाऱ्या मोठ्या माणसाची मोठीच गैरसोय करतात, त्याप्रमाणें मलाही पोरकट प्रश्न विचारण्याची मोठी हौस आहे. गणूकाकांचा एक म्हातारा विधूर मित्र आपण लवकरच दुसरें लग्न कां करणार, याची एकदां कारणमीमांसा देत होता.

" मुलांची खाण्यापिण्याची फार आबाळ होते, बुवा; लग्न करण्याशिवाय गत्यंतर नाहीं आतां ! " तो मोठ्या गंभीरपणें सांगत होता.

" अहो, मग लग्न कशाला ? एखादा चांगला, हुशार स्वयंपाकी ठेवा कीं ! " मी तितक्याच गंभीरपणें त्याला म्हणालों.

तो गृहस्थ निघून गेल्यावर गणूकाका माझ्यावर फारच भडकले. " काय रे, कांहीं तरी पोरकट प्रश्न विचारतोस ? लहान का तूं आता ? "

खरोखरच म्हातारपणीं बायको हवीशी असतां तसें सरळ सरळ, उघड न सांगता मुलाच्या खाण्यापिण्याच्या सोयीकरिता बायको करणें भाग आहे, म्हणून खोटें बोलणाऱ्या माणसाच्या ढोंगाचा बुडबुडा एखादा भलताच प्रश्न विचारून फोडणें हें मोठ्या माणसाना शोभतें का ? नग्न सत्य इतक्या निर्भयपणें पुढें माडणें हें फक्त निर्मळ अंतःकरणाच्या लहानग्या पोरानाच शक्य आहे. आणि पोरें जें करतात त्याला ' पोरकटपणा ' नाहीं तर काय म्हणावयाचें ?



## ३०

## " काळेपणा, गोरेपणा आणि सौंदर्य ..."

नुकतेंच कुठल्या तरी वर्तमान-पत्रांत मी वाचलें, कीं आपली नवपरिणीत बायको काळी आहे म्हणून सर्व मित्र चिडवूं लागले, एवढ्यावरून दुःखित होऊन एका तरुणानें आत्महत्त्या केली ! ही बातमी वाचून मी तर स्तंभितच झालों. आपल्या बायकोला लोकांनीं काळी म्हटल्यामुळें दुःखित होऊन प्राण देणाऱ्या त्या वेडगळ तरुणाचें मला आश्चर्य वाटलें, आणि दयाही आली. पण त्याहीपेक्षा मला आश्चर्य वाटलें, तें त्याच्या मित्रांचें ! काळेपणात हंसण्यासारखें काय आहे ? जगात काळीं माणसें आहेत, गोरीं माणसें आहेत, पिवळीं माणसें आहेत, तांबडींही माणसें आहेत ! त्यांत कुणीं कुणाला हंसावें, हेंच मला समजत नाहीं. एखाद्या माणसाच्या सौंदर्याचा विचार करतांना ज्या अनेक गोष्टींचा विचार करावयाचा असतो, त्यांमध्यें त्याचा रंग ही एक गोष्ट असते, हें खरें आहे. पण तो रंग अमुकच असेल, तर तें माणूस सुंदर, हें मात्र मला मुळींच कबूल नाहीं. सौंदर्याच्या चढाओढींत मला जर परीक्षक नेमलें, तर कदाचित् एखाद्या श्यामवर्ण स्त्रीला पहिला नंबर देऊन, एखाद्या खूप गोऱ्या बाईला मी शेवटचा नंबर देण्याचा संभव आहे ! अर्थात् याचा अर्थ असा नव्हे, कीं एखादी बाई केवळ काळी आहे म्हणून तिला मी पहिला नंबर देईन, आणि दुसरी खूप गोरी आहे म्हणून तिला शेवटचा देईन ! माझें म्हणणें इतकेंच, कीं रंगा-

खेरीज इतर गोष्टींचा विचार करतां एखादी कृष्णवर्ण स्त्री दुसऱ्या एखाद्या गौरकांति स्त्रीपेक्षां सुंदर दिसण्याचा सुतराम् संभव आहे. माणसाचें सौंदर्य त्याच्या एकंदर अवयवाच्या आणि रंगाच्या विशिष्ट संगतींत ( Harmony ) आहे, असें मला वाटतें. एखाद्या विशेष प्रकारच्या अवयवसंगतींत काळा वर्ण खुलून दिसेल, तर दुसऱ्या एखाद्याच्या स्वरूपवैशिष्ट्याला गोऱ्या रंगानें उठाव येईल. नुसता रंग गोरा असून इतर अवयवात जर संगति नसेल तर तो मनुष्य कधींही सुंदर ठरणार नाहीं. सुंदर अवयव असा शब्दप्रयोग न करतां, अवयवाची संगति हे शब्द मी मुद्दाम वापरतों आहें. कारण माझें असें ठाम मत आहे, कीं सर्व अवयव सुंदर असून देखील एखादा मनुष्य मुळींच सुंदर दिसत नाहीं. त्या मनुष्याचें नाक सरळ असेल, कान रेखीव असतील, डोळे विशाल असतील, कपाळही भव्य असेल, आणि तरीही तो मनुष्य सुंदर दिसणार नाहीं ! याच्या उलट मी असा एखादा मनुष्य दाखवून देईन, कीं ज्याचा कोणताही एकेक अवयव घेतला असतां त्यात विशेष असें सौंदर्य मुळींच दृष्टीला पडणार नाहीं; पण त्याच्या सर्व अवयवाचें एकत्र मीलन इतकें गोड झालेलें असेल, कीं त्याच्या चेहऱ्याला कुणीही सुंदर म्हटल्याशिवाय राहणार नाहीं.

तें कांहींही असो, पण गोरेपणाची विशेष आवड आपल्या लोकांना आहे कीं नाहीं, — आपला वर्ण गोरा असल्यास आपण अधिक सुंदर असें आपणाला वाटतें कीं नाहीं — असें जर मला कुणी विचारलें, तर मी कबूल करीन, कीं तसें वाटतें खरें पण त्याचा अर्थ असा नव्हे, कीं गौरवर्ण हा सौंदर्याचा भाग आहे. तसें वाटण्याचीं निराळींच कांहीं कारणें असूं शकतील. आपल्या उष्ण देशांत गौरवर्ण अधिक दुर्मिळ आहे, म्हणून तो आपणाला हवासा वाटत असेल. कारण माणसांचा स्वभावच असा आहे, कीं जें जवळ नसेल त्यासाठीं निःश्वास टाकीत बसावयाचें ! युरोपांत हल्लीं गौरवर्णाचा त्या लोकांना इतका वीट आला आहे, कीं आपली गोरी कातडी काळसर करण्याकरितां सौंदर्येच्छू युवकयुवतींचे ताडेच्या तांडे समुद्रकिनाऱ्यावर आपले अर्धाच्छादित देह सूर्यप्रकाशांत तापवीत असलेले दृष्टीला पडतात ! मला वाटतें, आमच्या सौंदर्यकोशांत गोरेपणाला जी इतकी किंमत प्राप्त झाली आहे, याचें कारण गौरवर्णाची दुर्मिळता.

सोन्यापेक्षा प्लॅटिनम धातू दिसतो वाईट, पण त्याची किंमत अधिक का? तर तो सुवर्णापेक्षां दुर्मिळ म्हणून.

आमचे गणूकाका मात्र हें काहींच तत्त्वज्ञान ऐकून घ्यावयाला कबूल नाहींत. त्यांच्या मतें कृष्णवर्ण केव्हाही श्रेष्ठ. काकांच्या रंगाशीं तुलना करतां मी स्वतःला खूपच गोरा समजतों. तेव्हा बोलतां बोलता मीं सहज एकदा काकांच्या काळेपणाचा उल्लेख केला मात्र, त्यासरशीं काकांनीं आपला एक सिद्धान्त माझ्या तोंडावर फेकला. तो प्रत्येक श्यामवर्णीयानें स्वतःच्या उराशीं जपून ठेवण्यासारखा आहे!—

काका म्हणाले, "अरे, गोऱ्या माणसापेक्षा आम्ही काळे लोक अधिक स्वच्छ असतों. कारण गोऱ्या लोकांना वाटतं कीं जराशी अस्वच्छता राहिली तर काय मोठें होणार आहे? गोरेपणावर आपण सर्व काहीं नेऊं चालवून! पण आमच्या काळ्या लोकाचं तसं नसतं. थोड्याशा अस्वच्छतेमुळें सुद्धां आणि फार अस्वच्छ दिसूं या भीतीनें घासून-पुसून आम्ही नेहमीं स्वच्छ राहतों!"

"पण काका, असं उलट नहीं का म्हणता येणार," मी म्हणालों, "कीं आपल्या अंगावरील थोडीशी अस्वच्छतादेखील चट्‌दिशीं लोकांच्या दृष्टो-त्पत्तीला येईल, म्हणून गोरे लोकच अधिक स्वच्छता पाळीत असावे. काळ्या लोकाचं काय! आधींच मळकट रंग असतो. त्यात आणखी थोडासा मळ-कटपणा सहज खपून जाईल, या कल्पनेनें काळे लोकच अस्वच्छ राहण्याचा अधिक संभव!"

माझ्या या बोलण्यावर काकांनीं माझ्याकडे अशा दृष्टीनें पाहिलें, कीं "मूर्ख आहेस तूं! माझे सिद्धान्त तुला काय कळणार!" हाच त्या दृष्टीचा अर्थ होता!

● ● ●

# ३१

## " अर्धसत्यें...... "

' स्त्रियाची जात म्हणजे निमकहराम ! ' हें वाक्य शेक्स्पीअरसारख्या जग-द्विख्यात माणसाच्या लेखणींतून उतरल्यामुळें, कोल्ह्याच्या हातांत जसें कोलीत, त्याप्रमाणें काहीं अर्धवट माणसाच्या हातात तें वाक्य होतें; आणि वाटेल तो सोम्यागोम्या सबंध स्त्री-जातीवर हल्ला करावयाला मोकळा होतो ! आपल्या वाक्याचा असा दुरुपयोग होईल, हें जर शेक्स्पीरअरच्या ध्यानात आलें असतें, तर कदाचित् त्यानें हें वाक्य लिहिलेंही नसतें. शेक्स्पीअरच्याच बाबतींत हा प्रकार होतो असें नाहीं तर प्रत्येक तत्त्वप्रतिपादकाच्या बाबतीत हेंच होतें, असें मला वाटतें.

कारण एखादा मनुष्य जेव्हा एखाद्या तत्त्वाचें प्रतिपादन करीत असतो, तेव्हा त्याचा हेतु किंवा परिस्थिति काय असतात, याचा कुणीच विचार करीत नाहीं. त्यामुळें त्या तत्त्वातलें अर्धें सत्य नष्ट होऊन त्याला अर्धसत्याचें स्वरूप प्राप्त होतें. आणि माझ्या मतें अर्धसत्य हें केव्हा केव्हा असत्यापेक्षाही अपायकारक ठरतें.

शेक्स्पीअरचीच गोष्ट घ्या. वर उल्लेखिलेलें वाक्य शेक्स्पीअरनें निर्माण केलेल्या हॅम्लेट या पात्राच्या तोंडीं आहे. हॅम्लेट हा विशिष्ट प्रकृतीचा मनुष्य आहे, आणि त्यानें एका विशिष्ट मनःस्थितींत तें वाक्य उच्चारलेलें आहे. पण

या सर्व परिस्थितीचा विचार करतो कोण ? शेक्स्पीअर म्हणतो स्त्रियांची जात म्हणजे निमकहराम, म्हणून स्त्रियांची जात निमकहराम !

शेक्स्पीअरच्या पात्राचें मत शेक्स्पीअरच्या तोंडीं घालणें हा तर उघड-उघड अन्याय आहेच; पण जेव्हा एखादा तत्त्ववेत्ता डोळे दिपवून टाकणाऱ्या शब्दांनीं आपलें स्वतःचें मत म्हणून एखाद्या व्यापक तत्त्वाचें प्रतिपादन करीत असतो, तेव्हां सुद्धां त्याच्या त्या तत्त्वात संपूर्ण सत्य भरलेलें आहे, असें समजून त्याचा आपण स्वीकार करणें माझ्या मतें साफ चुकीचें आहे. इतकेंच नव्हे तर त्याची भाषा जितकी दिपवून टाकणारी आणि त्याच्या तत्त्वाचें स्वरूप जितकें सर्वव्यापक, तितक्याच प्रमाणांत तें तत्त्व पूर्णसत्य नसून अर्धसत्य आहे असें खुशाल समजावें, असें मी म्हणतों.

बहुतेक मोठमोठ्या लेखकाना अशीं दिपवून टाकणारीं तत्त्वमौक्तिकें उधळण्याची संवय आहे. बर्नार्ड शॉचा तर या बाबतींत कुणीच हात धरणार नाहीं. शॉच्या एका सुप्रसिद्ध तत्त्वाचें आपण उदाहरण घेऊं. त्याच्या मतें निसर्गाचा एक विशिष्ट हेतु साध्य करण्याकरिता स्त्री नेहमीं पुरुषाचा पाठलाग करते. या विधानांत जर संपूर्ण सत्य असेल तर स्त्रिया मागें लागल्या आहेत, आणि वाट मिळेल तेथें पुरुषाचे घोळकेच्या घोळके जीव घेऊन सैरावैरा पळताहेत, असें दृश्य आपणाला जगांत दिसलें पाहिजे ! खरोखर काहीं तसा प्रकार मला कुठेंच दिसत नाहीं. अर्थात् शॉ त्यावर असें म्हणतो, कीं पाठलाग करतात, याचा अर्थ वाघ शेळीचा पाठलाग करतो तसा नव्हे, तर कोळी ज्याप्रमाणें आपलें जाळें लांबवर पसरून आपल्या भक्ष्याला पकडण्याकरितां टपून बसतो, त्या तऱ्हेनें स्त्रिया पुरुषाना पकडण्याकरिता त्यांचा पाठलाग करतात ! हें विधान ऐकून किती तरी पुरुषाना शॉची दाढी बाजूला करून शॉच्या गोंडस चेहऱ्याचें चुंबन घ्यावेंसें वाटेल ! पण इतकें हुरळून जाण्याचें कांहींच कारण नाहीं, असें मी त्यांना सांगेन. कारण शॉचें हें बेछूट विधान पूर्णसत्य नसून अर्धसत्य आहे.

मानवजातीचें सातत्य राखण्याकरितां निसर्गानें स्त्रीपुरुषांमध्यें दुर्दमनीय आकर्षण निर्माण केलें आहे, ही गोष्ट उघड आहे. हें सातत्य चालू राखण्याची — नवमानवाला जन्म देण्याची अत्यंत जोखमीची जबाबदारी

स्त्रीच्याच शिरावर आहे. पुरुषाला स्वतःकडे आकर्षित करून घ्याव-याची कामगिरी निसर्ग स्त्रीकडून करवून घेत असला पाहिजे, हेंही खरें असेल. तरी पण शॉनें दिलेल्या कोळ्याच्या उपमेंत मात्र पूर्ण सत्य नसून अर्धसत्य आहे, असेंच मी म्हणतों. कोळ्याच्या जाळ्यात माशी सांपडते, तेव्हा ती नकळत त्या जाळ्यात अडकते. कुठचा पुरुष स्त्रीच्या जाळ्यांत नकळत सांपडतो ? उलट त्या नाजुक, सुखकर जाळ्यात सापडून घेण्याकरिता प्रत्येक निरोगी पुरुष जिवापाड मेहनत करीत असतो, असेंच दिसून येतें ! स्वतःच्या शरीराला सुखविण्याकरिता स्वतः होऊन एखादा सुंदर, ऊबदार कोट अंगात घालून कुणी पुरुष जर ' मी कोटात सापडलों; मला वांचवा रे ! ' म्हणून ओरडूं लागला, तर त्याला मी जें म्हणेन तेंच वरील विधानाच्या बाबतींत मी शॉला म्हणेन !

स्त्रीला पुरुषाचें जितकें आकर्षण असतें, तितकेंच पुरुषाला स्त्रीचें असतें. मग स्त्रिया पुरुषाचा पाठलाग करतात, — बिचाऱ्या पुरुषाना धूर्त स्त्रीजात आपल्या जाळ्यात पकडते, असें म्हणण्यात काय अर्थ आहे ? अर्थात् असलीं विधानें पुरुषच करतात असें नाहीं. पुष्कळ स्त्री-लेखिकाच्या मतें पुरुष स्त्रीवर प्रेम करतो, तेव्हां तो तिला फूस लावून फशीं पाडण्याचा प्रयत्न करतो, — स्त्रियांना पुरुषाचें आकर्षण वगैरे काहीं नसतें !

पण मी म्हणतों मूर्खपणाचीं विधानें करण्यांत तरी स्त्रियानीं पुरुषांना का हार जावें ?

खरी गम्मत अशी आहे, कीं जग हें इतकें विविधरंगी आहे आणि मनुष्य-स्वभावाच्या गुंतागुंतींत इतके अगणित धागे आहेत, कीं वरील तऱ्हेचीं बेछूट तत्त्वें कितीही दैदीप्यमान शब्दरत्नांनीं मढवलेलीं असलीं, तरी सूक्ष्म विचारांतीं तीं अर्धसत्येंच ठरावयाचीं !

● ● ●

## ३२

### " पळण्याची कला... "

अगदीं लहानपणीं मी शाळेंत असताना घडलेली एक गोष्ट मला आठवते. त्या वेळीं मुंबईत होणारे क्रिकेटचे चौरंगी सामने फुकट पाहण्याची आम्हाला फार हौस. अर्थात् फुकट पाहण्यात जितका आनंद असतो, तितकाच धोकाही असतो ! पोलिस शिपाई येऊन किती वेळा हाकलून काढील त्याचा नेम नाहीं ! अशाच एका वेळीं त्या ठिकाणीं व्यवस्था ठेवण्याकरिता नेमलेला एक सोल्जर, आपल्या कुणालाही न समजणाऱ्या इंग्रजींत आमच्या अंगावर ओरडूं लागला. त्याला आमच्या एका वात्रट मित्रानें वेडावलें. त्यासरशीं एक शिवी हासडून त्या मित्राला पकडण्यासाठीं त्या सोल्जरनें झेंप टाकली आणि आता तो त्याची गचांडी पकडणार, इतक्यात अशा काहीं शिताफीनें आमचा मित्र त्याच्या हातातून निसटला, कीं आम्ही पाहातच राहिलों ! तो सोल्जर अधिकच चिडला, आणि त्याचा पाटलाग करूं लागला. आमचा मित्र पुढें आणि तो सोल्जर मागें अशी साधारण अर्धा मैल प्रेक्षणीय शर्यत त्या मैदानात चालली होती ! पण आमचा मित्र निसटला तो निसटलाच !

त्याचे जोडे, टोपी वगैरे जमा करून जेव्हा त्या वस्तु त्याला परत द्यावयाला आम्ही त्याच्या घरीं गेलों, तेव्हा तो मोठ्या विजयोत्साहानें हंसत हंसत आमच्यासमोर आला, आणि " कसा रे तूं जीव घेऊन पळालास ! " असें म्हणून

आम्ही त्याला हंसण्यापूर्वी तोच आम्हाला सांगूं लागला, " काय ! कसा पळालोंय् ?" स्वतःच्या पळण्याची त्याला तारीफ करतांना पाहून आम्ही तर थक्कच झालों !

पण खरोखर थक्क होण्यासारखें त्यात काहीं नव्हतें, असें मला वाटतें; कारण पुढें पुढें जेव्हा महायुद्धाच्या बातम्या आम्ही वर्तमान-पत्रांत वाचूं लागलों, तेव्हा किती तरी वेळां आमच्या वाचण्यात येई, कीं अमक्या अमक्या सेनापतीनें आपल्या सैन्याला यशस्वी माघार ( *Glorious retreat* ) घ्यावयाला लावली. एखादा बडा सेनापती आपल्या सैन्यासह-वर्तमान मागें पळाला, कीं त्यानें यशस्वी माघार घेतली, असें म्हणावयाचें; आणि आपल्या जिवासाठीं आमच्या मित्रानें धूम ठोकली, तर त्याला मात्र पळपुटया म्हणावयाचें ! माणसांचा स्वभावच असा आहे, कीं जी गोष्ट लहान प्रमाणावर केली असता त्याना उपहासास्पद दिसते, तीच मोठ्या प्रमाणावर पाहिली, कीं त्याना आश्चर्यकारक आणि प्रशंसनीय वाटते !

माझ्या मतें आमचा मित्र पळाला तेंच बरोबर. त्या वेळेला त्याला ' पळ-पुट्या ' म्हणून आम्ही हंसलों, हें खरें आहे. पण त्या हंसण्याचें कारण आमच्या शौर्याच्या कल्पना चुकीच्या होत्या म्हणून. त्यानें त्या सोल्जरशीं जर थोडी झटापट केली असती, आणि दोन-चार दात किंवा आपला एखादा डोळा जर तो गमावून बसला असता, तर मोठा शूर वीर म्हणून आम्हीं त्याचा गौरव केला असता. साहजिकच आहे. कारण स्वतःच्या केसालाही धक्का न लागता सुरक्षित जागेवरून रक्तपात पाहण्याची हौस जर एखाद्यानें फेडली, तर शौर्यशाली वीराग्रणी म्हणून डोक्यावर घेऊन आम्हीं त्याला का नाचवूं नये ?—

मला वाटतें बहुतेक माणसांना रक्तपात पाहण्याची थोडी-बहुत हौस ( *Sadist tendency* ) असते. कदाचित् फार पूर्वकाळीं मानवजात जेव्हा रानटी अवस्थेंत होती, त्या काळच्या स्वभावाचा हा अवशेष असेल, आणि म्हणूनच आमच्या शौर्याच्या कल्पना अजूनही थोड्याशा रानटी आहेत. नुसत्या शारीरिक बळाच्या जोरावर आपलें वर्चस्व स्थापण्याच्या अवस्थेतून पुढें जाऊन मनुष्यानें आपल्या मेंदूचा किती तरी विकास केला आहे, आणि मेंदूच्या जोरावर आपलें श्रेष्ठत्व स्थापण्याच्या अवस्थेला

मनुष्य येऊन पोहोंचला आहे, हें आपण पुष्कळच वेळां विसरतों. म्हणूनच लाइट ब्रिगेडमधल्या अवघ्या सहाशें लोकांनीं जेव्हा प्रचंड रशियन सेनेशीं बेफाम झुंज घेतली आणि त्यांतला प्रत्येक शिपाई मारला गेला, तेव्हां टेनिसन्-सारखा महाकविसुद्धा फसला; आणि आपल्या काव्यांत त्या ब्रिगेडवर त्यानें स्तुतीचा वर्षाव केला. खरी गंमत अशी आहे, कीं त्या शिपायांना थोडी-बहुत जर अक्कल असती — थोडा मेंदू जर त्यांनीं वापरला असता, — तर भलत्याच मोठ्या सैन्याशीं झुंज घेण्याऐवजीं जीव घेऊन ते मागें पळत सुटले असते. यालाच यशस्वी माघार ( *Glorious retreat* ) म्हणतात. हेंच खरें शौर्य. नाहीं तर भिंतीवर डोकें आपटून प्राण देणाऱ्याला वीरश्रेष्ठ का म्हणू नये !

ज्याप्रमाणें काय बोलावें यापेक्षा काय बोलूं नये, हें ज्याला माहीत आहे, तो खरा वक्ता; काय लिहावें याहीपेक्षा काय लिहूं नये, हें ज्याला समजतें तोच खरा लेखक; त्याचप्रमाणें लढण्यापेक्षा पळण्याची कला ज्याला अवगत आहे तोच खरा शूर !



## ३३

### " वेगळी गोष्ट ....."

माझ्या माहितींतल्या एका मुलीनें एका गृहस्थाशीं आपला विवाह ठर-विला. तो प्रेमविवाह होता. तिच्या विधवा आईची त्या विवाहाला पूर्ण संमति होती तिची विधवा आई तरुण असून तिला दुसऱ्या एका गृहस्थाबरोबर पुनर्विवाह करावयाचा होता. त्याला मात्र त्या मुलीचा कसून विरोध होता !

" असं कां ? " म्हणून मीं विचारतां ती मला म्हणाली, " माझी गोष्ट वेगळी आहे ! आईला हें शोभत नाहीं ! "

तिचे मुद्दे मी पुढें ऐकत बसलों नाहीं. कारण ते काय असणार हें मला माहीत होतें. आईचा पुनर्विवाह आहे. माझा प्रेमविवाह आहे. या वयात आईला विवाह करणें शोभत नाहीं, वगैरे वगैरे !—

माणसाचा स्वभावच मुळीं असा आहे, कीं दुसऱ्यानें केलें असता ज्याला आपण नाक मुरडतों, तें स्वतः करतांना मात्र अगणित सबबी पुढें आणून आपली गोष्ट इतरांपेक्षां कशी वेगळी आहे हें सिद्ध करावयाचें !

गेल्या महायुद्धाच्या वेळीं अशा तऱ्हेच्या पुष्कळच मजेदार गोष्टी घडत. जर्मन मुत्सद्दी आपल्या लोकांना सांगत, कीं खरोखर लढाई आम्हाला मुळींच नको होती; पण ऑस्ट्रियन् राजपुत्राचा खून झाल्यामुळें सत्याची बाजू राखण्या-करितां ऑस्ट्रियाच्या बाजूनें शस्त्र धरणें आम्हांला भाग पडलें ! आणि इंग्रज

मुत्सद्दी आपल्या लोकाना सांगत, कीं झोंपेंतसुद्धा लढाई करावयाचा आमचा विचार नव्हता. पण करता काय ? असहाय्य चिमुकल्या बेल्जिअमवर दुष्ट जर्मन लोकांनीं हल्ला केल्यामुळें सत्पक्षाच्या संरक्षणाकरितां युद्धात उडी घेतल्याशिवाय आमच्यानें राहवेना ! इतकेंच नव्हे, तर आपण सत्याचे वाली असल्यामुळें आपल्या राष्ट्राचा विजय व्हावा, म्हणून जर्मन पाद्री आपल्या चर्चेसमधून प्रार्थना करीत; आणि इंग्रज पाद्री देवाला आळवीत, कीं आमचा विजय म्हणजेच सत्याचा विजय, म्हणून तूं आम्हाला मदत कर ! आणि दोघाचाही परमेश्वर एकच असल्यामुळें या दोन सद्‌गुणी भक्तांपैकीं कुणाचें ऐकावें, याचा त्या सर्वसाक्षी आकाशस्थाला मोठा प्रश्न पडला असेल !

स्वार्थी हेतूमुळें म्हणा, किंवा दुसऱ्या कांहीं कारणामुळें म्हणा, मनातून् जेव्हां एखादी गोष्ट करावयाची नसते, तेव्हा हुशार हुशार म्हणविणारे लोकसुद्धा या ‘ वेगळ्या गोष्टी ’च्या बुरख्याखालीं तोंड लपवितात. एखाद्या राष्ट्रीय पुढाऱ्याला तुम्ही सागा, कीं बहुजनसमाजाचें जर खरें कल्याण करावयाचें असेल, तर रशियाप्रमाणेंच भाडवलशाहीचा उच्छेद करून उत्पादनाचीं सर्व साधनें सामाजिक मालकीचीं केलीं पाहिजेत. तो हंसून तुम्हाला लगेच सागेल, “ अहो, रशियाची गोष्ट निराळी, आपली गोष्ट वेगळी आहे ! भांडवलवाले आणि मजूर हा लढा आपल्याकडे नाहीं ! आपले भाडवलवाले मजुराचे मायबाप आहेत ! ”

खरोखरच आपली गोष्ट किती वेगळी आहे ! रशियातल्या भाडवलदारासारखे आपले भांडवलवाले आहेत काय ! महालक्ष्मी आणि वाळकेश्वरातल्या टोलेजंग वाड्यातून ते आपल्या मजूरलेकरासहवर्तमान किती गुण्यागोविंदानें राहतात ! याशिवाय भांडवलवाल्यासारखे ते मोटारी थोड्याच उडवतात ! ते नेहमीं स्वदेशी बैलगाड्यातून फिरतात ! गिरण्यातून तरी ते काय मँचेस्टरसारखी अगदीं आधुनिक यंत्रसामुग्री वापरतात ? छे ! छे ! हिंदुस्थानातल्या गिरण्यांतून यांत्रिक मार्गाऐवजीं लाकडी चरख्याच्या रांगाच्या रागा दृष्टीस पडतात ! आणि युरोपात संप झाला असतां संपवाल्यावर ज्याप्रमाणें तिकडे गोळीबार केला जातो त्याप्रमाणें इकडे थोडाच केला जातो ? हिंदुस्थानी भांडवलवाले संपवाल्यांवर पुष्पांचा वर्षाव करतात !

काहीं काहीं व्यक्ति तर स्वतःची ' गोष्ट ' इतकी ' वेगळी ' समजतात, कीं आपण जगतों हेच जगावर मोठे उपकार करतों, तेव्हा आपण लोकासाठीं काहीं करूं नये, पण लोकानीं मात्र आपल्यासाठीं सर्व काहीं करावें, असें या स्वयंमन्य हुतात्म्याना वाटतें. बऱ्याचशा लोकाना पैसे देणें असलेला, असला एक ' हुतात्मा ' मला एकदा सागूं लागला, कीं "अमक्या अमक्या गृहस्थाकडून आपले काहीं पैसे येणे आहेत, आणि तो गृहस्थ इतका वाईट आहे, कीं परोपरीनें मागूनसुद्धा तो पैसे काहीं देत नाहीं. "

" तुम्हीसुद्धा काहीं केल्या आपले पैसे देत नाहीं, असें चार-पाच लोक मला सागत होते ! " मी म्हणालों.

" माझी गोष्ट वेगळी आहे हो ! " तो चटकन् म्हणाला, " मी सध्यां अशा परिस्थितींत आहें... "

याची गोष्ट मात्र वेगळी ! आणि याचे पैसे न देणाऱ्या गृहस्थाची गोष्ट मात्र वेगळी नाहीं ! आत्मप्रीतीच्या रोगानें हे लोक इतके पछाडलेले असतात, कीं सर्व जगाहून आपली गोष्ट कांहीं वेगळी आहे, असें यांना वाटतें. अलीकडे अलीकडे लोकांनी करूं नये असें वाटत असलेली गोष्ट आपण कां करतों, किंवा लोकांनीं एखादी गोष्ट करावी असें आपणाला वाटतें, पण आपणाला मात्र ती कां करता येत नाहीं, याचें एखादा मनुष्य समर्थन करण्याचा प्रयत्न करूं लागला, म्हणजे त्याला मध्येंच थाबवून मी सागतों कीं " समजलों, समजलों. ज्यास्त बोलायची कांहीं एक जरूर नाहीं. तुमची गोष्ट वेगळी आहे ! समजलों मी ! "



# ३४

## दरिद्री नारायणाची सेवा

एक छोटा महात्मा माझ्याशीं बोलता बोलता सहज मला म्हणाला, " तुम च्यासारख्या दलितवर्गाच्या उद्धाराच्या आणि श्रीमंतानीं गरीबाची चालविलेली पिळणूक थांबविण्याच्या लांब लांब गप्पा आम्ही छाटीत नाहीं. मीं देशातल्या असंख्य दरिद्री जनतेच्या—दरिद्रनारायणाच्या सेवेला आजन्म वाहून घेतलं आहे ! "

" अस्सं ! " मी म्हणालों, " तूं आजन्म दरिद्रनारायणाच्या सेवेला वाहून घेतलं आहेस, म्हणजे निदान तूं मरेपर्यंत तरी देशांतली असंख्य जनता दरिद्रीच राहिली पाहिजे ! त्याशिवाय तुझ्या मागून येणाऱ्या महात्म्यानीं कुणाची तरी सेवा करून महात्म्याची परंपरा जर कायम ठेवावयाची असेल, तर ही असंख्य जनता कायमचीच दरिद्री राहणं तुम्हा महात्म्याच्या पथ्यावर पडणार आहे. हो, नाहीं तर तुम्ही सेवा कुणाची करणार आणि महात्मे होणार कसे ? "

या दरिद्रनारायणाच्या सेवकाचें मला मोठें कौतुक वाटतें. दरिद्र्याना संपन्न करण्याऐवजीं त्यांची सेवा करण्याचें ध्येय हे पुढें ठेवतात. मला तर अशी भीति वाटते, कीं उद्या हे दरिद्री जर संपन्न झाले तर हे महात्मे त्याच्यावर भडकायचे ! दरिद्रनारायण दरिद्री राहिला नाहीं, तर यांचा धंदाच बुडाला ना !

अशाच तऱ्हेची मनुष्यस्वभावाची गंमत इथें सांगितल्याशिवाय मला राहवत

नाहीं. एक लघुकथा मला वाचलेली आठवते. एक सुंदर, तरुण मुलगी एका पावाच्या दुकानात रोज सकाळीं आपल्या धन्याकरिता ताजा पाव विकत घेण्याकरिता येत असे. त्या पावाच्या 'बेकरी'त काम करणारे पचवीस-सव्वीस नोकर-चाकर — झाडून सारेजण तिच्या सौंदर्यावर, तिच्या चागुलपणावर, तिच्या मनमिळाऊ स्वभावावर अगदीं निहायत खूप होते. ती पाव विकत घेऊन गेली म्हणजे ते नेहमीं आपापसात तिच्या चागुलपणाच्या एकमेकांना गोष्टी सागत, तिची स्तुति करीत बसत असत. तिला या प्रकाराची अर्थात् कल्पनाहि नव्हती. एके दिवशीं सकाळीं ती आली असता सुंदर कपडे केलेला देखणा असा एक गावगुंड त्याच वेळीं तेथें आला होता. ती निघून गेल्यावर तिच्याकडे पाहात तो म्हणाला, " काय झकास आहे पोरगी ! "

हे सव्वीसहि जण गावगुंडाच्या अंगावर खेंकसून म्हणाले, " ए, आमच्या ( ! ) पोरीवर वाईट नजर ठेवशील तर खबरदार. तुझ्यासारख्या गावगुंडावर भाळायला ती अशी तशी नाहीं ! "

" ठाऊक आहे, अशा खूप पोरी पाहिल्या आहेत मीं ! " तो गुंड भुवया उडवीत म्हणाला, " माझी इच्छा असेल तर दोन दिवसात माझ्या पायाशीं आणीन तिला मी ! "

हे सव्वीसहि जण त्याच्याशीं हमरीतुमरीवर आले. शेवटीं " दोन दिवसात तिचा हात धरून फिरताना तुम्ही मला पाहाल, " अशी त्या गुंडानें त्याच्याशीं पैज मारली.

दुसऱ्या दिवशीं ती मुलगी नेहमींप्रमाणें दुकानात आली. एखाद्या देवतेकडे पाहावें तशा आदरानें हे सव्वीसहि जण तिच्याकडे पाहात होते. तिला अर्थात् विशेष फरक वाटला नाहीं. दुसऱ्या दिवशीं नाना उपाय करून त्या गुंडानें तिची दोस्ती केली; आणि त्या दिवशीं संध्याकाळीं मोठ्या ऐटींत तिचा हात धरून विजयोन्मादानें शीळ वाजवीत त्या दुकानावरून तो गेला ! या सव्वीसहि जणानीं हें दृश्य पाहिलें. स्वतःच्या डोळ्यावर त्याचा विश्वास बसेना. पण खात्री झाल्यावर त्यांचा धीर खचला; धरणी दुभंग होऊन आपणाला पोटांत घेईल तर बरें, असें त्याना वाटूं लागलें. त्या धक्क्याचा जोर ओसरल्यावर त्यांना हळूहळू त्या पोरीचा भयंकर संताप येऊं लागला.

" बदमाष कुठली ! " ते एकदम ओरडले.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं नेहमींप्रमाणें पाव घ्यावयाला ती दुकानावर आली; त्यासरशीं या सव्वीसहि जणांनीं तिच्यावर शिव्याशापाचा वर्षाव केला. ती भांबावून जाऊन पळून जाऊं लागली, तेव्हा ते दुखावलेले लोक तिला दगड मारूं लागले.

उद्या श्रीमंताची सत्ता झुगारून देऊन दरिद्री नारायण जर का संपन्न झाला, तर दरिद्री नारायणाच्या सेवेसाठी हपापलेले उपरिनिर्दिष्ट ध्येयवादी महात्मे दरिद्री नारायणाला असाच दगडांनीं ठेंचून काढतील, असें मला वाटतें !

दलितवर्गानें सत्ताप्राप्तीसाठी लढा चालवावा, असें म्हणणाऱ्या लोकांवर या दरिद्रनारायणाच्या सेवकाचा आणखी एक आरोप असतो : " तुम्ही दलिताचे पुढारी म्हणवता ना रे ? मग तुम्ही पोटभर खाता पितां, सुंदर कपडे घालता, वेळप्रसंगासाठी जवळ पैसे बाळगता, याचा अर्थ काय ? " असा प्रश्न हे छुपे महात्मे अगदीं 'आपण जिंकली' अशा आवाजात मोठ्या कुर्रेबाजपणानें विचारतात. याला सरळ सरळ उत्तर असें, की कंगालानीहि आमच्यासारखेंच खावें, प्यावें आणि सुखी व्हावें म्हणून आमची खटपट आहे; जगातले बरेच लोक कंगाल आहेत म्हणून आपणहि कंगाल कळा तोंडावर आणावी, याकरिता लढा लढावयाची काहींच जरूर नाहीं. तें अगदीं सोपें काम आहे ! माझी खात्री आहे, कीं ज्या दिवशीं दरिद्री नारायण आपल्या या आजन्म सेवकांचें खरें स्वरूप ओळखील, त्या दिवशीं आपल्या या मित्रांची गचांडी धरून " तुमची सेवा आता पुरे करा " असें खडसून बजावून त्याना दूर फेंकून देईल !



३५

## चोर आणि चांदणें

जगात तिरस्कार करण्यासारख्या खूप गोष्टी आहेत; पण एक गोष्ट मला अत्यंत तिरस्करणीय वाटते. आणि ती म्हणजे लहान बालकाचें एखादें कृत्य आपणाला आवडलें नाहीं, तर त्या बालकावर दुष्ट अगर वाईट हेतूचा आरोप करणें. इतक्या संतापानें असे उद्‌गार काढावयाला मला कारणहि तसेंच झालें. माझ्या शेजारीं राहणाऱ्या गृहस्थाची एक पाच वर्षांची मुलगी आहे. फार गोड आहे पोर ती शेजारीच राहणाऱ्या एका मुलीबरोबर ती खेळावयाला गेली असता त्या मुलीला तिच्या आईनें घेऊन दिलेली एक सुंदर नवीन बाहुली तिच्या दृष्टीला पडली व तिला ती फार आवडली. तिनें ती सरळ उचलली आणि स्वतःच्या घरांत आणून ठेवली. कांहीं वेळानें त्या मुलीच्या आईला हें कळल्यावर त्या सत्त्वशील बाईचा संताप अनावर झाला आणि "चोर कुठली! भारीच बाई चोरटी झाली आहे कारटी! हां हा म्हणता आमच्या बबीची बाहुली चोरलीन्!" वगैरे हुतात्म्याला शोभण्यासारख्या शब्दाचे फवारे सोडीत तिनें त्या लहानग्या पोरीला निर्दयपणें दोन-तीन चापट्या मारल्या.

पाच वर्षांच्या मुलीला ही वस्तु अमक्याची आणि ती वस्तु तमक्याची वगैरे मालकी हक्काचा कायदा पूर्णपणें कळतो, आणि हा कायदा जाणून-बुजून मोडून चोरीचा भयंकर गुन्हा त्या चिमुरड्या जिवानें केला, अशी त्या बाईची खरोखरच

कल्पना होती, कीं जगात निर्मळ मनाच्या लहानसहान मुलापासून तों यच्चयावत् मोठ्या माणसापर्यंत सर्वांचीं मनें स्वतःच्या मनासारखींच क्षुद्र स्वार्थी हेतूनें भरून गेलीं आहेत, असें तिला वाटत होतें न कळे! तिचें तें कृत्य मला अत्यंत तिरस्करणीय वाटलें, यात शंका नाहीं.

मला वाटतें, इतक्या चटदिशीं दुसऱ्या माणसावर वाईट हेतूंचा आरोप करणाऱ्या माणसाचीं स्वतःचीच मनें आमूलाग्र किडलेलीं असतात. चोराच्या मनात चादणें, किंवा स्वतःवरून जग ओळखणें, या शिळ्या झालेल्या म्हणींची असें काहीं झालें की थोडीथोडी यथार्थता पटूं लागते. बाहेरख्याली नवरा स्वतःच्या बायकोच्या वर्तनाविषयीं फार संशयी असतो, याचें कारण मला वाटतें हेंच असावें. एक गोष्ट अशी सागतात, कीं एक बाहेरख्याली नवरा आपले ख्याल आटपून घरी आला म्हणजे स्वतःच्या बायकोवर तिच्या लहानसहान चुकाबद्दल रागावून “ तूं बदमाप आहेस. तूं अमक्याकडेच पाहतेस. अमुक ठिकाणींच उभी राहतस.” अशा प्रकारचे वाटेल तसे आरोप करून तिला सतावून सोडीत असे. शेवटीं ती इतकी कंटाळून गेली, कीं नवऱ्याचा सूड घेण्याकरिता एक दिवस तिनें खरोखरच व्यभिचार केला; आणि नवऱ्याची वाट पाहात ती उभी राहिली. नवरा घरात आल्याबरोबर त्यानें तोंड उघडावयाच्या आत तिनेंच बोलावयाला सुरुवात केली. “ काहीं बोलूं नका. मी व्यभिचारिणी आहें ना? कबूल आहे मला. मीं खरोखरच आज व्यभिचार केला!” हे शब्द ऐकल्याबरोबर तिच्या नवऱ्याचा चेहरा कसा झाला, किंवा पुढें त्यानें काय केलें, तें मला ठाऊक नाहीं. पण ही गोष्ट मात्र मला इसापच्या गोष्टीइतकीच बोधप्रद वाटते.

अर्थात् माझें असें म्हणणें नाहीं, कीं आपल्यावर कुणीं वाईट आरोप केला, कीं आपण तो आरोप खरा करून दाखविण्याकरितां वाईट वर्तणूक ठेवावी, किंवा प्रत्येक वेळेला एखादा माणूस दुसऱ्यावर दुष्ट आरोप करतो तेव्हां तो स्वतः दुष्ट असतोच. मनुष्यस्वभावाविषयीं असे एकातिक, अढळ नियम बाधणें मूर्खपणाचें आहे.

याच्या उलट वागणारींहि पुष्कळ माणसें आपणाला आढळतात. त्याचीं अतःकरणें चागुलपणानें इतकीं भरून गेलेलीं असतात, कीं जगात त्याना कुठें

वाईट दिसतच नाहीं. स्वतःला लाथ मारणाऱ्या मंबाजीचे पाय चुरणारा तुकाराम, किंवा आपणासारख्या दरिद्याच्या घरांत चोरण्यासारखें विशेष काहीं मिळालें नसेल म्हणून घरात चोरी करून पळून गेलेल्या चोरासाठीं हळहळणारा चारुदत्त, हे या प्रकारचे महात्मे होत.

याचाहि स्वभाव मला तितकासा आवडत नाहीं. हे स्वतः कितीहि चागले असले, तरी याच्या या वर्तनानें दुष्टाना उत्तेजन मिळतें, आणि चोराना चागलेच फावतें. यावर चिडून मला कुणी विचारील, कीं "अहो, माणसानें करावें तरी काय ?" यावर मी हंसून इतकेंच म्हणेन, कीं जीवनातल्या या असल्या प्रश्नाची उत्तरें जर माणसाना देता येऊं लागलीं, तर मग जगण्यात मौज ती काय राहणार ?



## ३६

### जगाशीं संबंध

अलिकडे अलिकडे मला जिरवणें, हा गणूकाकाचा व्यवसायच झाला आहे. मी जिरलों आणि माझा चेहरा गोरामोरा झाला म्हणजे गणूकाकाना अपरंपार आनद होतो! काल असेंच झालें. गणूकाकांबरोबर मी बोलत बसलों होतों. मी अगदीं बोलण्याच्या रंगात आलों होतों, "...मानवजातीच्या हिताकरिता सध्याची विषम समाजपद्धति आमूलाग्र बदललीच पाहिजे..." मी एखाद्या पुढाऱ्यासारखा किंवा दारुड्यासारखा बोलत होतों.

"काय रे, ही तुझी मानवजात कुठें असते रे?" काकांनीं शांतपणें धोतराच्या सोग्यानें चष्म्याचीं भिंगें पुशीत मला विचारलें, "आपण कांहीं पाहिली नाहीं कुठें! ब्राह्मणजात, परभूजात, साळीजात, माळीजात आपणाला माहीत आहे. पण ही कांहीं नवीनच जात दिसते आहे!"

झालें, मी जिरलों. काकांना आनंद झाला.

मला जिरवण्याकरिता वरील शब्द उच्चारतांना मला जिरवणें हा काकांचा उद्देश होताच; पण थट्टेनें बोलतांना कां होईना, काकांच्या त्या शब्दांच्या मागें एक विशिष्ट मनोवृत्ति होती, यांत शंका नाहीं. ती मनोवृत्ति म्हणजे, जगाशीं करायचें आहे काय आपणाला? आपण बरे, आपलें घर बरें; साऱ्या जगाच्या आणि अखिल मानवजातीच्या उठाठेवी हव्यात कशाला?

एका दृष्टीनें काकाचें हें म्हणणें अगदींच चूक आहे, असें मला वाटत नाहीं. उठल्यासुटल्या प्रत्येक मनुष्य कोणतीहि लहानसहान गोष्ट करताना त्या गोष्टीचे साऱ्या जगावर आणि अखिल मानवजातीवर काय परिणाम होतील, याचा जर विचार करूं लागला, तर त्याच्या हातून काहींच होणार नाहीं. व्यापक दृष्टीचा तो अव्यवहार्य अतिरेक होईल. अहिंसातत्त्वाचा फाजील अतिरेक करून स्वतःला हास्यास्पद करून घेणारे काहीं जैन साधु ज्याप्रमाणें श्वासोच्छ्वासाबरोबर नाकात जीवजंतू शिरून हिंसा होऊं नये म्हणून नाकावर एक फडकें बांधून फिरतात, किंवा खालीं बसताना आपल्या अंगाखालीं एखादा जीव चिरडूं नये, म्हणून भुई झाडण्याकरिता एक लहानशी झाडू काखेंत सदैव लटकवितात, त्याप्रमाणेंच प्रत्येक माणसाला वागावें लागेल !

जगाच्या आणि मानवजातीच्या कुणी गप्पा मारूं लागला, कीं पूर्वी मीहि त्याला काकाच्यासारखाच जिरवीत असें. पण असें करतांना एकदा मात्र मी चांगलाच जिरलों. अर्थशास्त्राच्या एका सुप्रसिद्ध प्रोफेसराबरोबर एकदां मी चहा पीत बसलों होतों. बोलता बोलता प्रोफेसरसाहेब एकदा अगदीं रंगात येऊन मी जसा काकाना साऱ्या जगाच्या गोष्टी सुनावीत होतों, त्याप्रमाणेंच सारी मानवजात अलिकडे किती परस्परावलंबी झाली आहे, प्रत्येक बारीकसारीक प्रश्नाचा विचार करताना सर्व मानवजातीचे हितसंबंध आपण कसे डोळ्यापुढें ठेवले पाहिजेत, वगैरे वगैरे विषयावर माझ्यापुढें व्याख्यान झोडण्याच्या बेतात आले होते. त्यांना जिरवण्याकरिता हातातला चहाचा कप पुढें करून मी मिस्किलपणें म्हणालों,

" काय हो, या कपातला चहा पिताना सबंध मानवजातीचे हितसंबंध कसे काय डोळ्यापुढें आणायचे ? "

माझ्या प्रश्नानें जिरून जाण्याऐवजीं प्रोफेसरसाहेब मला शांतपणें उत्तर देऊं लागले, " चहा पिऊन टाकून तो कप उलटा करून पाहा. कुठें बनवला आहे तो ? "

मीं कप उलटा करून पाहिला. कपावर कोरलेलीं पुढील अक्षरें मीं वाचून दाखविलीं, " मेड् इन् झेकोस्लोव्हाकिया. "

" बरं, " ते पुढें बोलूं लागले, " कप झेकोस्लोव्हाकियाचा झाला, चहांतील साखर जावा किंवा मॉरिशस बेटांतली, मी दार्जिलिंग चहा वापरतों,

तेव्हा चहाची पावडर दार्जिलिंगची. तो दुधाचा ' जग् ' आहे तो मेड् इन् चायना — चीन मधला. काय — एक कप चहा पितांना जगाच्या किती भागाशीं तुझा संबंध आला ? ”

मी थंडच झालों, प्रोफेसरसाहेबाना जिरवायला गेलों, आणि मीच पुरा जिरलों !

त्या दिवसाचें संभाषण मी कधींच विसरणार नाहीं. व्यवहारापुरती मनुष्यानें कितीहि संकुचित दृष्टि ठेवली, तरी जगाचा आणि आपला किती जिव्हाळ्याचा संबंध आहे, ही गोष्ट त्यानें विसरून जाता कामा नये. कळत अगर नकळत आपण जगाशीं संबंध टेवतों. कळत अगर नकळत आपणाला जग हवें आहे.

काकानीं मला त्या दिवशी जिरवलें, ही गोष्ट माझ्या मनात सारखी डाचत होती. दोन-तीन दिवसानीं काकाना जिरवायचा निश्चय करून मी काकाच्या घरीं गेलों. आगाऊ सूचना न देता शत्रूवर हल्ला करावयाचें मीं ठरविलें होतें. काकाना कल्पनाहि नव्हती मी कशाकरिता आलों आहे त्याची. ते बिचारे ती गोष्ट विसरून गेले होते. बोलतां बोलता काकाना पकडण्याचा मी प्रयत्न करूं लागलों.

“ का हो काका, हजार जातीचीं आणि हजार प्रकारचीं माणसं या चाळींत आहेत. तुम्ही ही जागा सोडून तिकडे माहीमच्या बाजूला एकान्त जागीं एवढ्याच भाड्यात लहान घरं मिळतात तिकडे राहायला का जात नाहीं ? ”

काका खुर्चीत येऊन मला सागूं लागले, “ नको रे बाबा तिकडे, आपणाला माणसांचा गजबजाट हवा आवर्तीभोंवतीं. आपल्याला नाहीं एकलकोंडपणा परवडत. ”

“ अस्सं ! ” मी विजयोत्साहानें बोलूं लागलों, “ जगाशीं आणि मानव-जातीशीं मला काय करायचं आहे म्हणून मला सागत होतां नाहीं त्या दिवशीं ! पण या बऱ्यावाईट, तुसड्या, मनमिळाऊ माणसाचा गजबजाट हवाच आहे तुम्हाला आवतींभोंवतीं ! मी तरी काय सांगत होतों, कीं सारा मानवी समाज — ”

मीं एकदम आटोपतें घेतलें. काका जिरले होते. पण मीं आणखी लाब जीभ सोडली असती, तर काका तसे कमी नव्हते. ते पुन्हा जिरवायचे !

● ● ●

## ३७

## चमत्कारिक कल्पना

एक जुनी आठवण झाली, कीं मला अजूनहि हंसू येतें. माझ्या लहानपणची गोष्ट आहे. शाळेंत जात असें मी तेव्हा. आमच्या शेजारी राहणाऱ्या गृहस्थानीं आपली बायको नुकतीच कोंकणांतून मुंबईला आणली होती. साधीभोळी होती बिचारी बाई. तिची लहान मुलगी एकदा आजारी होती. एक दिवशीं दुपारीं त्या मुलीचें जरा जास्त झालें. ती बाई घाबरून गेली. तिला कांहीं सुचेना.

" जरा हपीसात जाऊन याना बोलावून आणशील का रे, बाबू ? " तिनें काकुळतीला येऊन मला विचारलें.

" हो, " मी म्हणालों, " कुठच्या हपीसात जातात ते ? पत्ता काय त्याच्या हपीसाचा ? "

" पत्ता कसला ? अरे कोटातल्या हपीसात, " माझा प्रश्न अगदीं वेडगळ-पणाचा समजून ती मला उत्तर देऊं लागली, " तुझे मामा नाहीं का जात हपीसात ? "

" अहो पण काकू, " मी म्हणालों, " मामांचें हपीस मला माहीत आहे; पण शंकररावाचं हपीस मला कुठें माहीत आहे ? "

" म्हणजे ? " ती जरा गोंधळून म्हणाली, " तुझ्या मामांचं हपीस आणि

यांचं हपीस वेगळं आहे वाटतं ? सर्व लोक कामाला जातात तें हपीस एकच आहे ना रे ? ”

मला हंसता हंसता पुरेवाट झाली. हपीस नावाची एक भलीमोठी इमारत कोटात असून तिच्यात सर्व नवरे कामाला जातात, अशी त्या भोळ्या बाईची कल्पना होती !

काकूंची हपीसाची कल्पना ऐकून कुणाला हंसू आल्यास नवल नाहीं. भोळ्या आणि अशिक्षितच होत्या त्या; पण जगातल्या मोटमोठ्या गोष्टीसंबंधानें देखील किती तरी ‘ मी ’ ‘ मी ’ म्हणणाऱ्या माणसाच्या अशाच काहींतरी अस्पष्ट पण ठाम कल्पना असतात. आमचे गणूकाका मला नेहमीं म्हणत,

“ बाबानो, कसल्या चळवळी करता ? इकडे चळवळ करून होणार काय ? तिकडे विलायतेला जाऊन स्वराज्य आणा. ”

काकाच्या या गप्पा मीं बरेच दिवस ऐकून घेतल्या. शेवटीं एक दिवशीं मी चिडून म्हणालों, “ काका, स्वराज्य म्हणजे काय पंचम जॉर्ज बादशहाच्या घरांत पडलेलं गाठोडं आहे वाटतं ? तें तिकडे जाऊन उचलायचं, आणि काखेंत मारून हिंदुस्थानाकडे धूम ठोकायची ! ”

माणसाच्या काहीं गोष्टींविषयीं अशा अस्पष्ट आणि काहींतरी कल्पना असतात त्याचें मला नवल वाटत नाहीं. सर्वच माणसें चिकित्सक आणि तत्त्वज्ञानी कुठून असणार ? पण मनुष्यस्वभावाची मला खरी गंमत वाटते ती या असल्या अस्पष्ट कल्पनासाठीं मनुष्य केव्हा केव्हा स्वतःचा जीवहि ठेंचायला सिद्ध होतो त्याची.

गेल्या सत्याग्रहाच्या चळवळींत अनेक हालअपेष्टा सोसून, खडतर तुरुंगवास भोगून आलेल्या एका तरुण मुलाला एका वृद्ध गृहस्थानीं एकदा सहज विचारलें, “ काय रे, एवढे कशाला हाल सोसलेस उगीच ? ”

आपले खोल गेलेले डोळे त्या वृद्ध गृहस्थाकडे निर्भयपणें रोखून अभिमानानें तो मुलगा म्हणाला, “ स्वातंत्र्यासाठीं ! ”

मी जवळच उभा होतों. “ स्वातंत्र्य म्हणजे काय रे ? ” मी किंचित् उपरोधपूर्ण स्वरांत त्याला विचारलें. तो बिचारा गोंधळून गेला. त्याला उत्तर देता येईना. मला वाईट वाटलें. स्वातंत्र्याची व्याख्या त्याला करतां येत नव्हती.

पण एका उदात्त उद्देशानें तो लढला होता, यात शंका नाहीं. तसला क्षुद्रमनस्क प्रश्न विचारून त्याच्या अस्पष्ट, पण उदात्त हेतूची अवहेलना करणें रास्त नव्हतें. त्याची ती गोंधळलेली मुद्रा पाहून त्याची मीं मनापासून क्षमा मागितली.

केव्हा केव्हां या उदारचरित महाभागाच्या अंतःकरणातली कल्पनासृष्टि आणि बाहेरली सत्यसृष्टि यांत जमीन-अस्मानाची तफावत पडते, आणि मग मात्र या धीरोदात्त ध्येयवाद्याच्या आयुर्नाटकाची अत्यंत हृदयविदारक शोककथा होते. वर उल्लेखिलेल्या तरुण मुलाचीच गोष्ट सांगतों. परदेशी दुकानासमोर सत्याग्रह करून आणि स्वदेशी मालाचा 'उदो' 'उदो' करून आपली मायभूमि स्वतंत्र होईल या दुर्दम्य आशेनें त्यानें स्वतःच्या जिवाचें रान करून घेतलें होतें. पुढें लवकरच त्याच्या ध्यानात आलें, कीं त्याच्या आणि त्याच्या-सारख्या हजारों भावनाशील तरुणाच्या अतुल स्वार्थत्यागाचा पुरेपूर फायदा स्वदेशी भाडवलवाल्यानीं घेऊन ते भरपूर गबर झाले होते; पण त्याचा प्रिय देश मात्र होता तिथेंच होता. आपलें सुखस्वप्न अशा तऱ्हेनें डोळ्यांसमोर विरून गेलेलें पाहिल्याबरोबर त्या तरुणाच्या दुःखाला पारावार उरला नाहीं.

यावर कुणी असें म्हणेल, कीं अशा तऱ्हेच्या काहींतरी अस्पष्ट पण उदात्त कल्पनानीं बेभान होणें, आणि त्याहिपेक्षा पुढें जाऊन त्या कल्पनासाठीं जीव पाखडणें, हें मूर्खपणाचेंच नाहीं का ? असेलहि कदाचित् तें मूर्खपणाचें. मी नाहीं म्हणत नाहीं. पण असलीं चुकीचीं अगर बरोबर सुखस्वप्नें पाहण्याची दृष्टिच नसून आयुष्य सुखमय होण्यापेक्षा विरलेली का होईनात, पण दिव्य सुखस्वप्नें मनमुराद पाहात आयुष्याची होळी झालेली मला परवडेल. तो मूर्ख-पणा असो कीं शहाणपणा असो, काहींतरी उदात्त कल्पनासृष्टि डोळ्यासमोर उभारणें आणि मग त्यासाठीं प्राणहि अर्पण करण्यास सिद्ध होणें या मनुष्य-स्वभावातल्या चमत्कारिक विशेषाविषयीं मला निरतिशय आदरच वाटतो. माण-साच्या माणुसकीची आणि मानवी जीवनाच्या प्रगतीची किल्ली मला वाटतें या विशेषांतच आहे.



## ३८

### तत्त्वांचें रोगण !

काहीं दिवसापूर्वी एका सुप्रसिद्ध लेखकानें लिहिलेलें एक नाटक पाहावयाला माझ्या एका मित्राबरोबर मी गेलों होतों. खलपुरुषाचें एक अभिनव चित्र लेखकानें त्या नाटकात रंगविलें होतें. नेहमींच्या खलपुरुषाप्रमाणें स्वतःचा स्वार्थ साधण्याकरितां तो खलपुरुष लबाडी, लुच्चेगिरी किंवा दुष्टपणा काहीं करीत नव्हता. स्वार्थ साधण्याची त्याची पद्धत अगदीं अभिनव होती. त्यागप्रियता, दयाशीलता, परहिततत्परता इत्यादि इत्यादि जे कांहीं उदात्त गुण मनुष्यस्वभावात केव्हा केव्हा दृष्टीला पडतात त्यांना जागृत करून, त्याना उत्तेजन देऊन त्या वाहत्या गंगेत हात धुऊन घ्यावयाचा आणि स्वतःचा स्वार्थ साधावयाचा, हेंच त्या खलपुरुषाचें अपूर्व तंत्र !

एका तरुण मुलीशीं त्याचा प्रेमसंबंध होता. पुढें काहीं दिवसानीं तिला टाकून त्यानें दुसऱ्याच एका श्रीमंत तरुणीशीं विवाह करावयाचा बेत केला हें जेव्हा त्या पहिल्या मुलीला कळलें तेव्हा ती संतापानें त्याच्या दुष्टपणाचा त्याला जाब विचारावयाला गेली. त्याच्या मनाची मुळींच चलबिचल झाली नाहीं. उलट त्यानें डोळ्यात पाणी आणून तिला सागितलें, कीं त्याचें तिच्यावर निरतिशय प्रेम होतें, पण त्याचे वृद्ध आईबाप तिच्याशीं लग्न केल्यास प्राणत्यागाची धमकी देऊ लागले. आईबापाची इच्छा त्यानें त्या दुसऱ्या मुलीशीं लग्न करावें अशी होती. आणि म्हणून त्याला स्वतःच्या उत्कट भावनांची होळी करून त्या दुसऱ्या मुलीशीं लग्न करावें लागत आहे. खरें प्रेम त्यागांत आहे.

" माझं तुझ्यावर खरं प्रेम आहे, " तो म्हणाला, " आणि म्हणूनच या दिव्य त्यागाला मी तयार झालों ! "

त्याच्या या उद्‌गारांनीं त्या उदारहृदयी मुलीला त्यागाच्या तत्त्वाची महती पटून आपल्यावर त्याचें अलौकिक आणि अटळ प्रेम आहे अशी तिची खात्री झाली. इतकेंच नव्हे, तर त्याच्या दुसऱ्या लग्नाला तिनें मोकळ्या मनानें परवानगी दिली !

पण रंगभूमीवर हें नाटक चालूं असताना प्रेक्षकांत सर्वसाधारण मानवी स्वभावावर प्रकाश पाडणारें दुसरें एक नाटक चालू होतें, त्याची मला खरी गम्मत वाटली. एक म्हातारा गृहस्थ आपल्या पंचवीस सव्वीस वर्षे वयाच्या तरुण मुलीबरोबर प्रेक्षकांच्या अगदीं पुढच्या रांगेंत बसला होता. मी आणि माझा मित्र त्या दोघांच्या मागेंच बसलों होतों. म्हातारा नाटकांत अगदीं रंगून गेला होता. त्या खलपुरुषानें ' प्रेम त्यागात आहे ! ' हें वाक्य आपल्या परिणामकारक आवाजात उच्चारल्याबरोबर 'बरोबर आहे ! बरोबर आहे !' हे शब्द तो म्हातारा स्वतःशींच पण इतक्या मोठ्यादा उद्‌गारला, कीं आजूबाजूचे लोक खदखदा हंसूं लागले. माझ्या मित्राची तर हंसता हंसता मुरकुंडी वळली. माझ्या मित्राला इतकें विशेष हंसावयाचें कारण काय म्हणून जेव्हा मीं विचारलें, तेव्हा तो म्हणाला,

" मला इतकं हंसू का आवरेना तें तुला कळणार नाहीं. कारण तुला या म्हाताऱ्याची माझ्याइतकी माहिती नाही. "

" म्हणजे ! " मी उद्‌गारलों.

" अरे, ती त्याची मुलगी त्याच्या शेजारीं बसली आहे ना ? " माझा मित्र हळूहळू त्या म्हाताऱ्याची हकीकत मला सागूं लागला, " ती ग्रॅज्युएट आहे, चागली मिळवती आहे. तिचं एकावर प्रेम आहे, नी तिला त्याच्याशीं लग्न करायचं आहे. हा म्हातारा कांहीं पोरगी हातची जाऊं द्यायला कबूल नाहीं. हा त्या लग्नाविरुद्ध आकाशपाताळ एक करतो आहे. "

" मग ? " मी म्हणालों.

" मग काय ? प्रेम त्यागांत आहे, लग्नांत नाहीं, हें पटवून देतो आहे पोरीला ' बरोबर आहे, बरोबर आहे ' म्हणून शिरा ताणून ! लोक हंसले

म्हातारा रंगला म्हणून, पण मला हंसू आवरेना ही आंतली भानगड माहिती असल्यामुळें ! ''

एकाच वेळीं एका तिकिटात हीं दोन नाटकें पाहतांना मला मात्र कमालीची मौज वाटली. म्हातारा जाणून-बुजून आपल्या मुलीवर छाप पाडण्यासाठीं उद्गारला, कीं खरोखरच त्याचें ध्येयवादित्व उफाळून येऊन तो रंगात आला होता, कुणाला ठाऊक; पण रंगभूमीवरल्या त्या खलपुरुषाची तो नकळत नक्कल करीत होता, यात शंका नाहीं. त्या प्रसंगांतली करुणकथा हीच होती, कीं ज्या वाक्याला नेटानें टेकू देण्याकरितां आपण टाळ्या पिटीत आहोंत, तें वाक्य नाटकातल्या उदात्त भूमिकेच्या तोंडीं नसून खलपुरुषाच्या तोंडून उच्चारलें जात आहे, हें त्या बिचाऱ्याच्या लक्षांत आलें नाही.

त्या म्हाताऱ्याला किंवा त्या खलपुरुषाला विशेष हंसावेंसें मला वाटत नाहीं. खलपुरुषच कशाला, आपणापैकीं प्रत्येकजण कमीअधिक प्रमाणांत असाच वागतो. आपल्या लहानसहान स्वार्थी कृत्यांना मोठेपणाचा मुलामा देण्याकरिता आपण कितीतरी वेळां उदात्त तत्त्वाचें चकचकीत रोगण वापरीत असतों. माझ्या माहितीतला एक श्रीमंत गृहस्थ आहे. त्याच्या इस्टेटीवर देखरेख करण्याकरिता ऐंशी रुपये पगारावर काम करणारा एक वृद्ध कारभारी आहे. आज कित्येक वर्षें ऐंशी रुपये पगारावर तो म्हातारा आपल्या धन्यासाठीं अगदीं मनापासून मरे मरेतों काम करीत आहे. मीं एकदा सहज त्या गृहस्थाला म्हटलें,

" अहो, दिवाणजींना जरा ऐंशीचा शंभर रुपये पगार करा कीं आता ! ''

" करायला काहीं हरकत नाहीं हो, '' तो चट्कन उत्तरला, " पण बिचाऱ्याला उगीच इन्कमटॅक्स भरावा लागेल. ''

आपल्या इमानी नोकराच्या खिशाला इन्कमटॅक्सची कात्री लागूं नये म्हणून कोण ही काळजी !

खलपुरुष शोधून काढण्याकरितां आजूबाजूला पाहण्याची किंवा रंगभूमि धुंडाळण्याची कांहीं एक जरूर नाहीं, असें मला वाटतें. आपणापैकीं प्रत्येकजण स्वतःच्या अंतःकरणांत जरा डोळे ताणून जर डोकावून पाहील, तर किती तरी छोटेखानी खलपुरुष तिथें स्वैरपणें विहार करीत असलेले त्याच्या दृष्टीला पडतील !

● ● ●

# ३९

## प्रत्येकाचें वेड

मला माझ्या एका स्नेह्यानें एकदा विचारलें, " जगाकडे तूं पाहूं लागलास कीं अधिकात अधिक हंसू तुला केव्हा येतं ? "

मीं त्याला चट्कन उत्तर दिलें, " आपणापैकीं प्रत्येकाला काहीं ना काहीं तरी एक वेड आहे; आणि तरी पण स्वतःला हें माहीत नसल्यामुळें प्रत्येकजण दुसऱ्याच्या अशाच काहीं तरी विलक्षण वेडाला हंसत असतो ! हें एका वेड्यानें दुसऱ्या वेड्याला हंसणें – ही उपरोधपूर्ण घटना जेव्हा मी पदोपदीं पाहतों, तेव्हा मला अनावर हंसू कोसळतें ! "

" काय, जगातला प्रत्येक माणूस वेडा आहे ? " माझा मित्र स्तिमित होऊन म्हणाला.

" होय; मला वाटतं प्रत्येकाला काहीं तरी एक वेड आहे. " मी म्हणालों.

मी थट्टा करण्याकरिता तसें बोललों नाहीं. मला खरोखरच तसें वाटतें. कालच आमच्या गणूकाकांचा कुत्रा जरा आजारी होता म्हणून मुंबईतल्या एका प्रख्यात कुत्र्याच्या डॉक्टराकडे आम्ही गेलों होतों. कुणाचाहि कसलाहि रोग उपासानें बरा होतो, अशी आमच्या गणूकाकांची ठाम समजूत असल्यामुळें त्यानीं आपल्या कुत्र्याला दोन-तीन दिवस कडक उपास करावयास लावलें होतें. ही गोष्ट त्यांनीं जेव्हां डॉक्टरांना सांगितली तेव्हां डॉक्टर पोट धरून हंसूं

लागले. उपासानें कुत्र्याचा रोग बरा होणें शक्य नव्हतें. कुत्र्याला उपचार वगैरे केल्यानंतर डॉक्टर बराच वेळ आमच्याबरोबर गप्पा करीत होते. डॉक्टराच्या खोलींत जिकडे तिकडे नानातऱ्हेच्या कुत्र्याचीं चित्रें लावलेलीं होतीं. एक गवत भरलेला मोठा थोरला कुत्रा खोलीच्या कोंपऱ्यात एखाद्या जिवंत कुत्र्यासारखा डोळे रोखून आणि शेंपटी वर करून उभा होता. निरनिराळ्या कुत्र्याच्या गुणधर्मांविषयीं डॉक्टर आम्हाला गोष्टी सांगत होते. " कुत्र्याची एक जात तर अशी आहे, " ते म्हणाले कीं " पंधरा वर्षांनीं जरी धनी भेटला तरी ते त्याला ताबडतोब ओळखतात. दुसऱ्या एका जातीचा कुत्रा धन्यानें कुठेंहि आगींत जरी उडी टाक म्हणून सांगितलें तरी क्षणभरहि कांकूं न करता बेधडक उडी टाकतो ! "

डॉक्टराचीं कुत्र्याच्या मोठेपणाचीं आवेशयुक्त वर्णनें ऐकून मी हंसत हंसत डॉक्टरांना म्हणालों, " डॉक्टर, तुमच्या मतें या जगात माणसापेक्षाहि कुत्रा हा महत्त्वाचा प्राणी आहे, असं वाटतं ! "

" संशयच नाहीं मुळीं, " डॉक्टर टेबलावर हात मारून म्हणाले, " I prefer dogs to men ! "

काकांना आणि मला हंसू आवरेना. परत येताना रस्त्यात काका मला सांगूं लागले, " काय वेडा आहे लेकाचा ! वेड लागलं आहे त्याला कुत्र्याचं ! "

कुत्र्याचें वेड लागलें आहे, म्हणून काकांनीं डॉक्टरना हंसायचें; आणि उपासाच्या वेडानें माथें फिरून गेलें आहे, म्हणून डॉक्टरनीं काकाना हसायचें ! एका डॉक्टराला असें वाटतें, कीं बर्फाचा मारा केला, कीं हरएक रोग बरे होतात, तर दुसरा म्हणतो, कीं तोंडांत, नाकात, कानांत शक्य तेव्हां आणि शक्य तेवढें मीठ घालीत चला, कीं जगांतल्या साऱ्या आधिव्याधि नाहींशा होतील ! दुसरा पहिल्यासंबंधीं म्हणतो, कीं त्याचें डोकें भडकलें असून त्यावर बर्फाचे थर घातले पाहिजेत; पहिला दुसऱ्याविषयीं म्हणतो, कीं त्याच्या मेंदूला जखम झाली असून त्यात कुणीं तरी मीठ भरलें असावें !

केव्हां केव्हा असलें हें वेड कोणत्या थराला जाऊं शकतें याचें एक मति गुंग करून टाकणारें उदाहरण मला माहीत आहे. एका लिंगशास्त्रज्ञानें इतिहास-प्रसिद्ध फ्रेंच राज्यक्रांतीची कमालीची मार्मिक उपपत्ती लावली आहे. तो

म्हणतो, कीं त्या वेळेला फ्रान्स देशावर राज्य करणारा लुई याचें जननेंद्रिय फारच ऱ्हस्वाकार असल्यामुळें त्याची असंतुष्ट राणी भयंकर बदफैली झाली होती. आपल्या राष्ट्राच्या प्रत्यक्ष महाराणीचा तो अनिरुद्ध बदफैलीपणा पाहून फ्रान्स देशातल्या जनतेंत प्रचंड क्षोभ उत्पन्न झाला, आणि या क्षुब्ध जनतेनें राजाविरुद्ध बंड पुकारून फ्रान्समध्यें राज्यक्रांति घडवून आणली ! फ्रेंच राज्यक्रांतीच्या निरनिराळ्या मार्मिक उपपत्त्या मीं आतापर्यंत खूप वाचल्या आहेत, पण ही उपपत्ती एकमेवाद्वितीय आहे, यात शंकाच नाहीं !

प्रत्येकाचें हें असलें वेड अतिशयोक्तीमुळें जरी केव्हा केव्हा हास्यास्पद होत असलें, तरी या वैयक्तिक वेडात सत्याचा लवमात्र का होईना, पण थोडासा अंश असतो याबद्दल मात्र माझी खात्री आहे. मनुष्य हास्यास्पद होतो याचें कारण या लवमात्र सत्याच्या दर्शनानें आपणाला पूर्ण सत्याचा साठा सापडला असें वाटून तो हुरळून जातो म्हणून. मानवी जीवन अजूनहि इतकें अगाध आणि अगम्य आहे कीं कुणाहि एका व्यक्तीच्या इवल्याशा शहाणपणाची – किंवा वैयत्तिक वेडाची म्हणा पाहिजे तर – मोडकी किल्ली लावून जगाचें अफाट कोडें उलगडण्याचा प्रयत्न करणें केव्हाहि हास्यास्पदच ठरणार. मला मात्र असें वाटतें कीं आपणा सर्वांचीं हीं वैयक्तिक वेडें जर एकत्र केलीं, तर पुढें-मागें कधींकाळीं का होईना, पण सत्याचें किंवा मानवजातीच्या सामुदायिक शहाण-पणाचें ओझरतें दर्शन तरी आपणाला होईल म्हणूनच मी म्हणतों, कीं प्रत्येकानें स्वतःच्या मनाशीं एकच खूणगाठ बांधून ठेवावी, कीं मी वेडा आहें, पण आपण सर्वजण शहाणे आहोंत !



## ४०

## सद्गुणी माणसें

" दोघी जुळ्या बहिणी, " गणूकाका मला सागत होते, " एक किती चागली आहे; आणि ही अशी छिनाल निघाली ! "

गणूकाकाच्या कुठल्यातरी दूरच्या नात्यातल्या दोन मुलींविषयीं गणूकाका बोलत होते. त्या दोघी जुळ्या बहिणी होत्या. एक कुठल्यातरी श्रीमंत कुटुंबात दिलेली होती; दुसरी एका गरीब मास्तराला दिलेली होती; ही दुसरी मुलगी कुणातरी सुस्वरूप श्रीमंत तरुणाचा हात धरून पळून गेली होती. साहजिकच त्यामुळें तिच्या बहिणीच्या सद्गुणाचा भाव फार वाढला होता ! जो तो तिच्या असलेल्या आणि नसलेल्या विविध सद्गुणांची स्तुति करीत होता. आमचे गणूकाका तर पंच-पतिव्रतांत तिला सहावी पतिव्रता म्हणून बसवावयाला जवळ जवळ एका पायावर तयार झाले होते.

" कधीं कुणाकडे डोळा वर करून पाहावयाची नाहीं, " गणूकाका तिच्या सद्गुणांचें रसभरित वर्णन करतां करतां म्हणाले, " कीं परक्या पुरुषाबरोबर बोलायची नाहीं ! "

" तुमच्या वर्णनावरून मला ती कांहीं सद्गुणाची खाण वाटत नाहीं. " मी शांतपणें गणूकाकाना म्हणालों.

माझ्या शब्दांनीं त्यांच्या उत्साहावर पाणी पडल्यामुळें गणूकाका क्षणभर

चमकले; पण लगेच शांतपणाचा आव आणून ते उपरोधिक स्वरात म्हणाले, " हो, विसरलोंच. तूं नवमतवादी; तुमच्या मतें ती पळून गेलेली छिनाल कारटीच सद्गुणांची पुतळी — ! "

" ती सद्गुणी होती कीं दुर्गुणी होती, हें ठरविण्याचें धाडस मी करीत नाहीं, " मी म्हणालों, " कारण तिच्या एकंदर परिस्थितीची मला काहींच माहिती नाहीं. पण त्या दुसऱ्या मुलीला मात्र सद्गुणी म्हणावयाला आपण मुळींच कबूल नाहीं. "

" म्हणजे ऽ ? " गणूकाका उद्गारले.

" म्हणजे असं, कीं ती जर एखाद्या गरीब मास्तराची बायको असती, आणि एखाद्या सुंदर, धनवान् तरुणाशीं तिचा संबंध आला असता, आणि त्यानंतरहि ती आपल्या नवऱ्याशीं इमानानें वागली असती, तर कदाचित् तिला मीं सद्गुणी म्हटलं असतं. रात्रंदिवस तबेल्यात कोंडून ठेवलेला घोडा ब्रह्मचर्य पाळतो म्हणून त्याची स्तुति कसली करायची ? "

मोहाला बळी पडणाराची मी तरफदारी करतों, अशातला भाग नाहीं. पण मोहाला बळी पडूं नये हें सांगणें जितकें सोपें आहे, तितकेंच मोहाला बळी न पडणें हें कठीण आहे, असें मला वाटतें. मोहाचा ज्याच्यावर कधीं प्रसंगच आला नाहीं, असे सुदैवी प्राणी मोहाला बळी पडलेल्या दुर्दैवी प्राण्याना ' दुर्गुणी ' किंवा ' दुबळ्या मनाचे ' म्हणून हंसत असतात. बायकांत तर एकमेकांना अशा तऱ्हेनें नावें ठेवण्याची प्रवृत्ति अतिशयच प्रबळ आहे, असा माझा अनुभव आहे. एखाद्या पुरुषाच्या प्रेमपाशात सापडून एखादी तरुणी त्याच्याबरोबर हिंडूं फिरूं लागली, कीं " इश्श ! अगदींच बाई निर्लज्ज ! " म्हणून इतर सोंवळ्या तरुणी तिला हंसूं लागतात. आणि पुरुषांना ' इश्श ' ' इश्श ' करून या अविवाहित पतिव्रता दमल्या, कीं एका सुप्रसिद्ध नाटककारानें म्हटल्याप्रमाणें जो कुणी वेडावाकडा पुरुष यांच्यासमोर पाहिल्या प्रथम येईल त्याच्या खांद्यावर विश्रांतीकरिता या मान टेकतात !

आणि मी म्हणतों ' मोह ' ' मोह ' म्हणजे तरी काय ? कोणत्या गोष्टीचा मोह चांगला आणि कोणत्या गोष्टीचा वाईट, हें कोणाला ठरवितां येईल काय ?

स्वतःच्या मालकीच्या द्राक्षाच्या मळ्यात भरपूर जेवणानंतर शतपावली करीत असता, एखाद्या ढेरपोट्या मालकाला रसभरानें लवलेला एखादा द्राक्षांचा घड पाहून त्यांतलीं चार द्राक्षें तोंडात टाकण्याचा मोह झाला, आणि त्यानें तीं तोडलीं तर त्यात कांहींच वाईट किंवा चुकल्यासारखें लोकांना वाटणार नाहीं; पण त्याच मळयावरून चाललेल्या एखाद्या भुकेलेल्या भिकाऱ्याची त्या द्राक्षाच्या घडाकडे दृष्टि गेली, आणि त्याच्या तोंडाला पाणी सुटून त्यानें त्यातलीं चार द्राक्षें तोंडात टाकलीं तर तो मात्र लोकदृष्ट्या चोरीचा गुन्हा होईल. दोघानाहि द्राक्षें खाण्याचा मोह झाला, पण समाजाच्या दृष्टीनें एक साव आणि दुसरा चोर! माझ्या एका आवडत्या लेखिकेची सद्गुणी माणसाची व्याख्याच मला फार आवडते ती म्हणते,

" सद्गुणी सद्गुणी म्हणून जे मिरवतात, त्याच्यावर पुरेशा मोहाचा कधीं प्रसंगच आलेला नसतो! "



## ४१

### स्वानुभवाची शाळा

एका बाईचें लहानगें मूल नुकतेंच चालायला लागलें होतें. तें दिवसांतून पन्नास वेळा खालीं पडे आणि हात, पाय किंवा डोकें ठेंचाळून घेई. ती बाई बिचारी अगदीं कंटाळून गेली होती. एकदा त्या कुटुंबाचे डॉक्टर घरीं आले असता ती काकुळतीला येऊन त्यांना सांगू लागली, " बघा हो, डाक्टर, त्याच्या डोक्यावर किती टेंगळं झालीं आहेत तीं. कांहींतरी सांगा हो, डाक्टर ! "

" कांहीं सांगायला नको, आणि काहीं करायला नको, " डॉक्टर शांतपणें म्हणाले, " जितका जास्त ठेंचाळेल तितका लवकर चालायला शिकेल. तुम्ही त्याला ' बाबा रे ' आणि ' सोन्या रे ' म्हणून आता जपत राहाल तर आता त्याला चालायला वेळ लागेलच; पण चालायलासुद्धा स्वतःच न शिकल्यामुळें पुढेंसुद्धा तो बावळा होईल. हीं निरोगी आणि सशक्त मुलंच आपण होऊन चालायला शिकायची फार धडपड करतात आणि पडून-झडून ठेंचा खातात; समजलं ? "

त्या डॉक्टराचें हें तत्त्वज्ञान नुसतें मुलाच्याच बाबतींत नव्हे, तर मानवी जीवनांतल्या अनेक जिव्हाळ्याच्या आणि महत्त्वाच्या बाबतींतहि खरें आहे, असें मला वाटतें. जीवन सखोलतेनें आणि उत्कटत्वानें ज्याला जगायचें आहे त्याला स्वानुभवाच्या शाळेंतच शिकलें पाहिजे. या बाबतींत दुसऱ्याचा अनुभव व्यर्थ आहे. मग तो डोळ्यांनीं पाहिलेला असो, कानांनीं ऐकलेला असो, किंवा पुस्तका-

तून वाचलेला असो. या असल्या बाजारी अनुभवानें मनुष्य स्वतःला पुष्कळ वेळा आरण खूप शहाणा झालों आहों, असें समजतो. पण जीवनांतल्या प्रखर प्रश्नाशीं प्रत्यक्ष सामना द्यावयाचा प्रसंग आला, कीं त्यानें स्वसंरक्षणाकरिता स्वतःभोंवतीं उभी केलेली परानुभवाची दगडी भिंत पत्त्याचा बंगला ठरून जीवनाच्या एका फुंकरीनें पार कुठच्या कुठें उडून जाते.

मुंबईत प्रत्यक्ष घडलेलें एक मजेदार उदाहरण मला आठवतें. एका श्रीमंत कुटुंबातला एक होतकरू तरुण उच्च शिक्षणाकरितां विलायतेला जाऊन तेथें बरींच वर्षें राहिला होता. एका इंग्लिश मुलीशीं त्याची ओळख होऊन तिच्याशीं इंग्लंडमध्येंच विवाहबद्ध होण्याचा त्यानें विचार केला. कांहीं दिवस ही बातमी हिंदुस्थानातल्या त्याच्या कुटुंबीय मंडळींना कळली नव्हती; पण ती जेव्हां कळली तेव्हा त्या कुटुंबात एकच हाहाःकार उडाला. त्याची आई अगदीं घायाळ होऊन अंथरुणाला खिळली. त्या मुलाचा एक मध्यमवयस्क मामा त्या कुटुंबात मोठा शहाणा आणि विचारी पुरुष समजला जात असे. त्याची तरुणपणींच बायको वारली होती. पण पुनः विवाह न करता तो तसाच विधुर राहिला होता. बहिणीची ती अवस्था पाहून तो तिची समजूत घालूं लागला, " तूं काहीं भिऊ नकोस. मी स्वतः विलायतेला जातों आणि त्याला सगळं समजावून सागून त्याचं मन वळवतों. या गोऱ्या पोरी कशा असतात, त्याला माहिती नाहीं. माझे कितीतरी मित्र विलायतेला जाऊन आले आहेत. त्यांनीं अगदीं स्वानुभवावरून विलायतेंतल्या पोरींच्या सगळ्या लीला मला वर्णन करून सांगितल्या आहेत. आपला बाबू अगदीं भोळा आहे; मी जाऊन त्याला सगळी परिस्थिति बरोबर ध्यानात आणून दिली, कीं तो आपोआप त्या पोरीला सोडून देईल. तूं कांहीं घाबरूं नको. "

मामाच्या या बोलण्यानें कुटुंबांतल्या सर्व मंडळींना बरें वाटलें. थोड्याच दिवसांनीं सर्वांचा निरोप आणि शुभेच्छा घेऊन भाच्याला आणण्याकरिता मामा विलायतेला निघून गेले. सहा महिने भाच्याची समजूत घालण्याकरिता मामा विलायतेंत राहिले. सहा महिन्यांनीं दोघेहि स्वदेशीं परत आले. दोघांनींहि एक एक मडम बरोबर आणली होती! ही कपोलकल्पित कथा नव्हे, ही नव्वद टक्के सत्यकथा आहे. भाच्याच्या गोऱ्या वल्लभेच्या थोरल्या बहिणीशीं मामांची दाट

मैत्री झाली. बाजारी शहाणपणाच्या वाळूचे किल्ले ढासळून पडले. मामानें आणि भाच्यानें—दोघांनींहि विलायतेंत आपलीं लग्नें रजिस्टर केलीं; आणि दोघेहि आपल्या बायकाना घेऊन परत आले. मामा आपल्या बहिणीला शहाणपणाच्या गोष्टी सांगत होते, तेव्हां जीवन पोट धरून खदखदा हंसत असावें. पण जीवनाचें हास्य मानवाला ऐकूं येत नाहीं त्याला इलाज काय ?



## ४२

## प्रश्नांचीं उत्तरें

एक रशियन कादंबरीकार आपल्या एका पात्राचें वर्णन करताना म्हणतो, " कांहीं माणसाना तुम्हीं लाख रुपये दिलेत तरी ते त्याना नको असतात; त्याना आपल्या प्रश्नांचीं उत्तरें पाहिजे असतात अशा मूठभर वेड्या पिरांपैकीं तो एक होता. " कित्येक दिवस आणि कित्येक महिने या वाक्याचा मी विचार करीत होतों, पण मला त्याचा कांहीं बोध होत नव्हता. आणि नंतर एक लहानसा प्रसंग घडला; पण त्यामुळें या साध्या शब्दाचा अर्थ एका क्षणात सूर्यप्रकाशासारखा माझ्या डोळ्यांसमोर स्पष्ट झाला. माझ्या शेजारींच राहणारा माझा एक मित्र एके दिवशीं सकाळीं हातांत एक वर्तमानपत्र घेऊन माझ्या खोलींत आला, आणि चमत्कारिक चेहेरा करून म्हणाला, " काय जगात एक एक वेडेपीर आहेत पाहा ! एका जपानी शास्त्रज्ञाच्या थोड्याशा चमत्कारिक मृत्यूची बातमी आजच्या वर्तमानपत्रात आली आहे. तो म्हणे मनुष्याची हृदय-क्रिया बंद पडली तर एखादें औषध टोंचून ती पुनः चालू करतां यावी म्हणून कित्येक वर्षें आपल्या प्रयोगशाळेंत प्रयोग करीत होता. बंद पडलेली हृदयक्रिया पुनः कां चालू करतां येऊं नये, या प्रश्नाचें उत्तर त्याला पाहिजे होतें. शेवटीं प्रयोग यशस्वी होऊन एका रसायनाचा शोध त्याला लागला. मनुष्याखेरीज इतर प्राण्यांवर त्यानें तो प्रयोग करून पाहिला आणि तो यशस्वीहि झाला. पण

मनुष्यावर त्याला तो प्रयोग कुणी करूं देईना. तेव्हा त्यानें स्वतः दुसरें एक रसायन स्वतःच्याच हृदयांत टोंचून घेऊन आपली हृदयक्रिया बंद पाडली आणि आपल्या विद्यार्थ्याला तें नवीन रसायन आपल्या हृदयांत टोंचून हृदयक्रिया पुनः चालू करण्याचा प्रयोग करावयास सांगितलें. तें टोंचताना त्या विद्यार्थ्याच्या हातून कांहीं चूक झाली आणि ह्या शोधासाठीं वेड्या झालेल्या शास्त्रज्ञाची हृदयक्रिया बंद पडली ती कायमचीच बंद पडली ! ''

ही हकीकत ऐकून आज कित्येक दिवस माझ्या डोक्यात कोडें होऊन बसलेल्या त्या कादंबरीकाराच्या शब्दावर लख्ख प्रकाश पडला — " कांहीं माणसाना तुम्हीं लाख रुपये दिलेत तरी ते त्याना नको असतात, त्याना आपल्या प्रश्नाचीं उत्तरें पाहिजे असतात. '' अगदीं खरें आहे. त्या जपानी शास्त्रज्ञाला वेडा म्हणून हसणारा माझा तो शेजारी लाख रुपयांवर खूप होणाऱ्या असंख्य सामान्य माणसांपैकीं एक होता; तो जपानी शास्त्रज्ञ आपल्या प्रश्नाच्या उत्तरासाठीं लाख रुपयावरच काय, पण स्वतःच्या प्राणावरहि निःशंकपणें पाणी सोडणाऱ्या जगातल्या हातावर मोजण्याइतक्या थोड्या माणसांपैकीं एक माणूस होता. जगातले सारेच थोर तत्त्वज्ञ आणि शास्त्रज्ञ प्रश्नाच्या उत्तरासाठीं जीव पाखडणारे वेडेपीर असतात.

प्रश्नाच्या उत्तराकरिता किंवा भौतिक शोधाकरिता एखादा शास्त्रज्ञ जिवाचें रान करतो, त्याचें इतकें आश्चर्य वाटत नाहीं. बंद पडलेली हृदयक्रिया पुनः चालू करता आली, तर मानवजातीवर अपरिमित उपकार होतील. पण सामान्य माणसाना अत्यंत आश्चर्य वाटतें तें तत्त्वज्ञाचें. तत्त्वज्ञाचे प्रश्न काय, तर मनुष्य जन्माला का आला ? सर्वसाधारण मनुष्य म्हणेल, " करायचें आहे काय या प्रश्नाचें उत्तर शोधून ? जन्माला आलों खरें आणि एक दिवशीं मरणार हेंहि खरें. मग हवी कशाला उगाच आटापीट जन्माला का आलों आणि मरणार का याची ? '' वरवर विचार करता ही विचारसरणी अत्यंत सयुक्तिक वाटते. पण मनुष्यस्वभावाचा किंचित् सूक्ष्म अभ्यास केल्यास अगदीं उलटा अनुभव येतो. प्रत्येक मनुष्याला या आणि असल्या प्रश्नाचीं उत्तरें पाहिजे असतात. एखाद्या थोर तत्त्वज्ञाइतकी असामान्य बुद्धिमत्ता आणि बुद्धीच्या समाधानासाठीं अलौकिक स्वार्थत्याग करावयाची तयारी नसल्यामुळें सामान्य मनुष्य या प्रश्नांचीं उत्तरें

शोधण्याकरिता धडपड करताना दिसत नाहीं. आणि कोल्ह्याला ज्याप्रमाणें द्राक्षें आंबट वाटलीं त्याप्रमाणें तत्त्वज्ञाच्या या असामान्य धडपडीला शुद्ध वेडेपणा असें मोठ्या आढ्यतेनें म्हणून तो हंसतो. एकच उदाहरण मी देतों. स्वतःला सुशिक्षित आणि आधुनिक म्हणवणारे आपण सर्वजण ज्योतिष्याना आणि भविष्याला हंसतों आणि त्याची टर उडवतों; पण आपणापैकीं प्रत्येकजण आपल्या राशीचें भविष्य चोरून पाहात असतों. आपण दुसऱ्याला फसवतों—इतकेंच नव्हे, तर आपण स्वतःलासुद्धा फसवीत असतों. आपण आपल्याच मनाला सांगतों, कीं या भविष्यात काहीं विशेष तथ्य नाहीं, पण थोडा वेळ आपली करमणूक म्हणून पाह्यचें. खरोखर, मनातल्या मनात आपलें भविष्य जाणण्याची प्रत्येक माणसाला अत्यंत तीव्र जिज्ञासा असते. का ? एक दिवस जन्माला आलों आणि एक दिवस नक्की मरणार हें जर आपणाला माहीत आहे, तर भविष्य जाणण्याची ही अनिवार उत्कंठा का ? खरी गंमत अशी आहे, कीं एखादी गोष्ट अपरिहार्य आहे, हें माहीत असूनहि ती का अपरिहार्य आहे हें जर आपणाला कळलें तर एक प्रकारचें उच्चतम समाधान मिळतें. एखादा दांडगट इसम आपणाला अचानक मारूं लागला, तर आपण पहिला प्रश्न असा विचारतों कीं, "अरे बाबा, का मारतोस ?" तो मारणार ही आपणाला खात्री असते, आपण त्याला निवारूं शकत नाहीं हेंहि आपणाला समजतें; तरी पण तो आपणाला का मारतो, याचें कारण समजण्याची आपणाला अनिवार इच्छा होते. अपरिहार्यतेच्या कारणाचें ज्ञान होणें, हेंच दुःखातहि एक प्रकारचें अपूर्व सुख वाटतें. म्हणूनच एक तत्त्वज्ञानी म्हणतो, कीं "अपरिहार्यतेची जाणीव हीच मानवी मनाची खरी स्वातंत्र्यप्राप्ती."

आपण एकदा जन्माला आलों आणि एकदा मरणार, हें खरें; पण त्यांतल्यात्यात कां जन्माला आलों आणि का मरणार हें कळलें, तर आपण एक प्रकारच्या उच्चतम समाधानानें मरणार नाहीं का ?

तत्त्वज्ञ जीव पाखडीत असतात ते याच समाधानासाठीं.

● ● ●

४३

## हॅम्लेटची चूक......

वाढत्या वयाबरोबर मनुष्य विचारी होत जातो, असें म्हणतात. पण माझा अनुभव याच्या अगदीं उलट आहे. माझ्या वयाचें एक वर्ष जसजसें उलटत जातें, तसतसा मी अधिकच अविचारी होत चाललों आहें. आणि कुणाहि विचारी मनुष्यानें जरा शांतपणें जर विचार केला, तर त्याला ताबडतोब दिसून येईल, कीं अविचार हेंच इहलोकांतील क्षणभंगुर जीवन जगण्याचें एकमेव आणि अमोघ साधन आहे "सहसा विदधीत न क्रियामविवेकः परमापदां पदम् ।" म्हणून मोठ्या आढ्यतेनें उद्‌गार काढणाऱ्या कवि भारवीला जगाचा काडी-इतकाहि अनुभव नसावा, असें मला वाटतें. बहुतेक तो घरचा चांगला खाऊन पिऊन सुखी असावा; आणि विचार कर करून काव्य लिहिण्यापलीकडे दुसरी कांहींच क्रिया किंवा कार्य तो करीत नसावा. जरा जगांत बाहेर पडून जर त्यानें विचार केला असता, तर त्याच्या लगेच ध्यानांत आलें असतें, कीं प्रत्येक बारीक-सारीक गोष्ट करतांना काय होईल आणि काय नाहीं, याचा जर मनुष्य सारखा विचार करूं लागला, तर या जगांत जगण्याकरितां जीं काहीं सरासरी पन्नास-साठ वर्षें माणसाच्या वाट्याला येतात तेवढ्या टीचभर अवधींत विविधतेनें नटलेल्या या सुंदर आणि अफाट जगताचें अंशमात्रसुद्धा स्वारस्य चाखायला त्याला वेळ उरणार नाहीं. माझी खात्री आहे, कीं एवढा विवेक जर महाकवि भारवीनें केला असता, तर "अविवेकः परमापदां पदं" या

शब्दाऐवजीं " अविवेकः सुखसंपदः पदं " असेच अधिक शहाणपणाचे उद्‌गार त्यानें काढले असते.

' विचार केल्याशिवाय बोलूं नका ! ' ' विचार केल्याशिवाय चालूं नका ! ' ' विचार केल्याशिवाय पुढें पाऊल टाकूं नका ! ' या तत्त्वाचा फाजील बाऊ करून शहाण्या लोकांनीं माणसाचें जीवन कमालीचें दुःखमय करून टाकलें आहे, असें मला वाटतें या असल्या शहाण्याच्या नादीं लागून बिचाऱ्या हॅम्लेटनें तडकाफडकीं आपल्या चुलत्याचा मुडदा पाडून राज्यावर बसण्याऐवजीं विचार कर करून शेवटीं स्वतःवर भर तारुण्यांत मरण ओढवून घेतलें !

या विचारवीरांचें म्हणणें असें कीं विचार केल्याशिवाय कांहीं केलें तर एखादे वेळीं भलताच वाईट प्रसंग माणसावर गुदरतो. या विचाऱ्यांना मी असें विचारतों, कीं मारे वेड लागेपर्यंत विचार करून कांहीं केल्यानंतरहि भलतेच वाईट प्रसंग गुदरावयाचे थोडेच राहतात ? यदृच्छया घडणाऱ्या गोष्टी, विचार करून केलेल्या कार्यांत आणि विचार केल्याशिवाय केलेल्याहि कार्यांत जर सारखाच धुडगूस घालणार आणि गरीब बिचाऱ्या मानवाचे बरेवाईट बेत वाटेल तेव्हा आणि वाटेल तसे ढासळून पाडणार, तर मग विचार करून आणखी माथें शिणवा कशाला ? विचार न करता कांहीं केल्यावर जर वाईट प्रसंग गुदरला, तर निदान एवढें तरी समाधान मिळेल, कीं बोलून-चालून अविचारानें केलेली गोष्ट, हुकली तर हुकली. मारे विचार करून एखादी गोष्ट करावयाची, आणि एवढें करूनहि ती फिस्कटली, कीं कपाळावर हात मारून आकाशाकडे पाहात बसायचें ! जगातल्या कसल्या तरी अदृश्य आणि अचाट शक्तीच्या करामतीपुढें आपण एक असहाय, बावळट, जीवजंतू आहोंत, असें स्वतःला वाटावयाला लावणारा लाजिरवाणा प्रसंग स्वतःवर आणाच कशाला ? त्यापेक्षां अविचारामुळें आपल्याच कर्मांचीं फळें आपण भोगतों आहोंत, असें स्वतःला वाटावयाला लावणें कितीतरी श्रेयस्कर !

अमुक पाप आहे कीं पुण्य आहे, याचासुद्धां फारसा विचार करण्यात अर्थ नाहीं, असें माझें प्रांजल मत आहे. आपण मोठ्या शहाणपणानें एखादी गोष्ट पाप आहे म्हणून करायची नाहीं आणि ती केल्याशिवाय मरून जायचें; आणि जग हें असें विचित्र आहे, कीं आजचीं पापें उद्यां पुण्यें ठरणार आणि मग

आपण मेल्यानंतर आपल्या वेळीं पाप म्हणून ठरलेल्या गोष्टी आपल्या मागचे शहाणे आणि विचारी लोक पुण्य म्हणून खुशाल करताना पाहून आपला आत्मा — असलाच तर — आपण तें केलें असतें तर बरें झालें असतें, असें वाटून विनाकारण हळहळणार ! सांगितलें आहे कुणीं इतकें ? जे काहीं चार दिवस या जगात काढायचे आहेत तेवढ्या परिमित अवधींत ज्या कांहीं बऱ्यावाईट गोष्टी करता येण्यासारख्या असतील त्या एकदा करून घ्याव्या, अशा मताचा मी आहें. नाहींतर तरुणपणीं एखादा कठीण पदार्थ, तो खाणें पाप आहे असें लोक म्हणतात म्हणून आपण खायचा नाहीं; आणि म्हातारपणीं आपल्या तोंडाचें बोळकें झालें म्हणजे हेच लोक तोच पदार्थ खाणें पवित्र कर्तव्य आहे, असें म्हणून मिटक्या मारीत खातांना पाहून आपण लाळ घोटीत बसायचें ! छे, छे, उगाच पश्चात्तापाची पाळी नको. जें काहीं करायचें असेल तें अविचारानें एकदा करून घ्यावें म्हातारपणीं, नाहींतर मेल्यावर मग विचार करायला खूप वेळ असतो.

यावर मला कुणी विचारील, " का हो, एखादा खोल खड्डा पुढ्यात दिसत असतासुद्धा विचार न करता पुढें पाऊल टाकून पडून मरा, असें तुमचें म्हणणें आहे कीं काय ?" याला माझें उत्तर हेंच, कीं अविचारानें वागा, असें मी माथें फिरलेल्या माणसाना सागत नाहीं. त्याना तें सागण्याची जरूरच नाहीं. डोकें शाबूत असलेल्या माणसाना मी हा उपदेश करतों आहें. आणि मेंदू शाबूत असलेलीं माणसें खड्डयात उडी मारून मरूं नये इतका मामुली विचार नकळत आपोआपच करतात. एवढी साधी गोष्ट त्याच्या ध्यानात आणण्याकरिता 'विचार करा' 'विचार करा' असा वेळीं अवेळीं त्याच्या कानात शंख करण्याची काहीं एक आवश्यकता नाहीं. डोळ्याकडे एखादा खडा, नाहींतर धुळीचा कण येत असल्यास तात्र्डतोब पापण्या मिटा, हें कुणीं कुणाला सागणें म्हणजे मूर्खपणा आहे. धुळीचा कण, नाहींतर खडा जवळ आल्याबरोबर पापण्या आपोआपच मिटल्या जातात. पण डोळे मिटून राहूं नका, डोळे सदैव उघडे ठेवा, हें सागणें मात्र खाचित शहाणपणाचें आहे. धडधाकट माणूस विचार हा नेहमीं करतोच; अविचार कर, हें मात्र त्याला कुणींतरी सांगितलें पाहिजे.

• • •

## ४४

## बोलणें आणि चालणें

प्रख्यात लेखक आणि तत्त्वज्ञ काउंट टॉल्स्टॉय उतार वयात विरक्त होऊन आपल्या लेखातून आणि व्यासपीठावरून जेव्हा कडकडीत ब्रह्मचर्याचा उपदेश करूं लागला, तेव्हा त्याच्या एका टीकाकारानें त्याला एक उपरोधपूर्ण, जळजळीत टोमणा मारला. तो म्हणाला; " काउंट टॉल्स्टॉय कडकडीत ब्रह्मचर्याचा उपदेश करीत बाहेर फिरताहेत, आणि काउंटस टॉल्स्टॉय चौदा मुलांच्या खस्ता काढीत घरीं बसल्या आहेत ! "

गोष्ट खरी होती. टॉल्स्टॉयला चौदा मुलें होतीं. टीकाकाराचा उपरोध जालीम होता, यांत शंका नाहीं. पण, मला या असल्या टोमण्याची काडीइतकीहि किंमत वाटत नाहीं. माझें म्हणणें असें, कीं टॉल्स्टॉयला चौदा मुलें होतीं म्हणूनच कडकडीत ब्रह्मचर्याचा उपदेश करण्याचा सर्वांत अधिक अधिकार त्याला आहे. खड्डयांत पडूं नको, म्हणून दुसऱ्याला सांगण्याचा अधिकार खड्डयात पडून जखमी झालेल्या माणसालाच ज्यास्त आहे.

मात्र सर्वसाधारण माणसांना असले सवंग टोमणे मारण्याची अतिशय आवड असते. मनुष्यमात्राच्या या स्वभावविशेषाची मला अत्यंत चीड आहे. मी स्वतः या सर्वसाधारण नियमाला अपवाद आहे, अशांतला मुळींच भाग नाहीं. माझ्या स्वतःच्या तोंडून असे शब्द निघून गेल्यानंतर काहीं वेळानें माझी मलाच लाज वाटूं लागते. आणि तरीहि असले सवंग टोमणे मारूं नका, असें दुसऱ्यांना सांगण्याचा मला अधिकार नाहीं, असें मला वाटत नाहीं.

एखादी गोष्ट वाईट कर, असें कुणीं दुसऱ्या माणसाला सांगितलें, आणि त्या माणसानें उपरोधिक उत्तर देऊन त्याचा पाणउतारा केला, तर तें एक वेळ क्षम्य होईल; पण चांगली गोष्ट करा असें सांगणाऱ्याला उण्या उत्तरानें घायाळ करावयाचें, म्हणजे तें केवळ आसुरी आनंद उपभोगण्याकरिताच असें मला वाटतें.

स्वतःच्या हातून अनेक चुका होत असतांना देखील तशा चुका करूं नका म्हणून जीव तोडून दुसऱ्यांना उपदेश करणाऱ्या माणसाचा मला तरी एकच उदात्त हेतु दिसतो आपणांत पूर्णत्व नाहीं, पण निदान दुसऱ्यांत तरी तें असावें, असेंच प्रत्येकाला वाटतें तरुणपणीं स्वैराचार केलेला मनुष्य म्हातारपणीं ब्रह्मचर्य पाळा म्हणून सर्वांना सांगत सुटतो, किंवा एखादा गांवचा आळशी वेळेवर कामें करण्याची महती दुसऱ्यासमोर गातो, याचें इंगित हेंच.

लोकांना मात्र ही उपरोधपूर्ण घटना पाहून राहवत नाही. बोलेल तसा जो चालेल, त्याच्याच पावलांना ते वंदन करणार! त्या बिचाऱ्यांना कुणींसें म्हटलेलें एवढें कळत नाहीं, कीं बोलतो त्याप्रमाणें चालणारा जगांत फक्त एकच मनुष्य असतो, आणि तो म्हणजे दारुड्या. तो जसा अडखळत बोलतो तसाच अडखळत चालतो! बाकी सर्व माणसांच्या बोलण्यांत आणि चालण्यांत जमीन आणि अस्मानाइतकें अंतर असतें. अमुक करूं नका, तमुक करा, असें जेव्हां मनुष्य बोलत असतो तेव्हां तो ध्येयसृष्टीच्या अस्मानांत विहरत असतो; पण चालतांना मात्र त्याला सत्यसृष्टीच्या खडबडीत जमिनीवरून चालावें लागतें. जमिनीवरून चालतांना तो स्वतः अडखळला धडपडला, म्हणून फुकटया शब्दानें त्यानें वर पसरलेलें अफाट अस्मान दुसऱ्यांना दाखवूं नये, असें थोडेंच आहे?

मी असाच कांहींतरी कुणाला उपदेश करूं लागलों, कीं बहुधा हेटाळणीच्या स्वरांत मला ठराविक अहेर मिळतो,

" माहीत आहे! लोकां सांगे ब्रह्मज्ञान, आणि आपण कोरडे पाषाण!"

यावर माझें उत्तर तितकेंच ठराविक आहे.

" मी कोरडा पाषाण आहें, हें मला एकदम कबूल. पण कोरड्या पाषाणाकडून का होईना, तुम्हांला जर घरबसल्या ब्रह्मज्ञानाची प्राप्ति होत असेल तर त्यांत तुमचें नुकसान काय आहे!"

• • •

## ४५

### मुखवटे

केव्हा केव्हा असे काही चमत्कारिक प्रसंग घडतात, कीं आपल्या डोक्यातल्या विचारचक्राचें परिभ्रमण अत्यंत वेगानें सुरू होतें. गोष्टी जुन्याच असतात; पण त्या असें काहीं अपूर्व नवलाचें रूप धारण करून आपल्या डोळ्यासमोर उभ्या राहतात, कीं आपण अगदीं आश्चर्यचकित होऊन जातों. असाच एक प्रसंग काहीं दिवसापूर्वी घडला. मी एका गावीं गेलों होतों. एक मोठा खळबळ उडवून टाकणारा खटला त्या गावात चालला होता. त्या गावातल्या अत्यंत लोकप्रिय, अत्यंत सुस्वभावी आणि आदर्श सद्‌गृहस्थ म्हणून समजल्या जाणाऱ्या एका डॉक्टरला एका अल्पवयी मुलीवर बलात्कार करण्याच्या आरोपावरून पकडण्यात आलें होतें. सारा गांव दुःखमिश्रित आश्चर्यात बुडून गेला होता. फार कशाला, मींहि त्या डॉक्टरला त्यापूर्वी पाहिलें होतें; आणि त्या खटल्यात पुरावा जर प्रत्यक्ष ऐकला नसता तर त्या डॉक्टरविषयीं तसली बातमी सांगणाऱ्या माणसाला मीं धक्के मारून घराबाहेर घालविलें असतें. ती गोष्ट घडली होती, यात मात्र तिळभरहि शंका नव्हती.

असें काहीं झालें, म्हणजे एक हत्ती आणि आंधळ्याची जी गोष्ट सांगतात, ती आपल्यासारख्या डोळस माणसाच्या बाबतींतहि शंभर टक्के लागू आहे, असें मला वाटूं लागतें. चार आंधळ्यांना एका हत्तीजवळ कुणींसें सोडलें आणि हत्ती हा प्राणी कसा आहे, म्हणून त्यांना विचारलें. सोंडेवरून हात फिरवणारा

आधळा सांगूं लागला, कीं हत्ती म्हणजे एक लाबलचक मांसाची पिशवी आहे; कानावरून हात फिरवणारा आधळा म्हणाला, कीं हत्ती सुपासारखा आहे; आणि शेपटी चाचपणारा आधळा, हत्ती एखाद्या जाड दोरखंडासारखा आहे, असें म्हणूं लागला !

अमुक मनुष्य रागीट आहे, तमुक मनुष्य शांत आहे आणि फलाणा लुच्चा आहे, हा सज्जन आहे आणि तो दुर्जन आहे, अशीं ठाम मतें आपण जेव्हा निरनिराळ्या माणसाविषयीं बनवीत असतों तेव्हा आपली स्थितिसुद्धा बऱ्याचशा प्रमाणात त्या गोष्टींतल्या आधळ्यासारखी असते, असें मला वाटतें. मानवी मन त्या गोष्टींतल्या हत्तीसारखें आहे; आणि आपली सामान्य माणसांची गोष्ट सोडून-नच द्या, पण मानवी मनाचा थांग लावूं पाहणारे मोठमोठे तत्त्ववेत्तेसुद्धा हे त्या गोष्टींतले आधळे होते. अथांग मानवी मनाची एखादी बाजू आपण आपल्या मर्यादित निरीक्षणशक्तीनें पाहतों, आणि एखाद्या मनुष्याचा स्वभाव कसा आहे तें आपणाला पूर्णपणें कळलें, या पोरकट कल्पनेनें आपण हुरळून जातों.

तो डॉक्टर सुस्वभावी होता, प्रामाणिक होता, मोठा भला माणूस होता, हें आपण पाहतों, आणि त्या माणसाविषयीं सर्व कांहीं कळलें असें आपणाला वाटतें. पण तो डॉक्टर सुस्वभावी होता, प्रामाणिक होता, त्याबरोबरच तो एक ' दोन पायाचें जनावर ' होता हें मात्र आपल्या ध्यानात आलेलें नसतें. खरोखरच माणूस म्हणजे विवेकशक्तीचा अंगरखा चढविलेला जनावरच नाहींतर काय ? हा अंगरखा जरा कुठें फाटला किंवा तुटला, कीं नुसतें जनावर दिसूं लागतें. भिन्न भिन्न स्वभा-वाचे चित्रविचित्र मुखवटे घालून निरनिराळीं माणसें फिरतात, पण त्या मुख-वट्याच्या आत दडलेल्या खऱ्या मनुष्यस्वभावाचा थांग कधीं कुणाला लागला आहे ?

मानवी मनाविषयीं एका कवीनें काढलेले उद्बोधक उद्गारच अशा वेळीं पुरेपूर पटतात. तो म्हणतो, कीं " अदृश्य वायूवर सत्ता गाजवून आपले संदेश इकडून तिकडे नेण्या-आणण्याकरिता मानवी मन त्याला हरघडीं राबवतें आहे, आणि चंचल चपलेला त्यानें गोगलगाय करून मानवांचीं घरें प्रकाशित करण्याकरितां दीन दासी बनविलें आहे. पण आपल्या लीलानीं मानवाला आश्चर्यचकित करून टाकणारें हें स्वतःचें मन मानव कधीं जिंकील काय ? "

● ● ●

## ४६

### जीवनशक्ति

त्या दिवशीं माझ्या खोलींत शिरल्याबरोबर गणूकाकानीं मला जो प्रश्न विचारला, तो ऐकल्याबरोबर मला हंसूच कोसळलें. 'केळीं खातोस काय?' किंवा 'बिस्किटें पाहिजेत काय?' असले घरगुती आणि क्षुल्लक प्रश्न आपण जितक्या सहजपणानें विचारतों, तितक्याच सहजपणानें गणूकाकानीं आपला रुमाल काढून टेबीत माझ्या ईझिचेअरवर बसता बसता मला विचारलें, "तुझा ईश्वरावर विश्वास आहे काय?"

हा प्रश्न ऐकून मी त्याच्या तोंडाकडे पाहातच राहिलों. त्याचा चेहरा पाहताच माझ्या ध्यानांत आलें, कीं बहुतेक नाना तऱ्हेचे युक्तिवाद करून ईश्वराचें अस्तित्व पटवू पाहणाऱ्या कुणातरी शास्त्रीपंडिताचें एखादें चोपडें गणूकाकानीं नुकतेंच वाचलें असावें. असें काहीं वाचलें, कीं गणूकाकाना तें लगेच पटतें, आणि मग माझ्यावर त्या मुद्द्याचा मारा करून केव्हा एकदा मला चीत करीन असें त्याना होतें. अशा वेळीं अगदीं गंभीर चेहेरा करून आणि आपण आतां सहज जिंकणार या कल्पनेनें होणाऱ्या आनंदाच्या गुदगुल्या आंतल्या आत दाबून ते मोठ्या शांतपणें असला काहींतरी प्रश्न मला विचारतात. पण मी आज गणूकाकांना कित्येक वर्षें ओळखतों आहें. असल्या युद्धांत कसले डावपेंच खेळावयाचे, तें मला पुरेपूर माहीत आहे. अशा वेळीं शत्रूची जी अपेक्षा

असेल, तिच्या बरोबर उलटें वर्तन आपण करावयाचें, कीं शत्रु गोंधळून जाऊन किंकर्तव्यतामूढ होतो. एखाद्यानें आपणाला काही वाईट शिवी दिली, तर त्याचा हेतु आणि अपेक्षा अशी असते, कीं आपण त्याच्या शब्दशरानी विद्ध होऊन चिडून जावें अशा वेळीं आपण जर चिडलों, तर आपल्या शत्रूचा विजय आणि त्याला आनद होतो. पण त्याच्या अपेक्षेविरुद्ध जर का आपण हंसरा चेहरा करून शांतपणें त्याच्याकडे पाहिलें, तर तोच पराभूत झाल्यासारखा होतो, आणि मनातल्या मनांत चरफडतो.

गणूकाकाची अपेक्षा अशी होती, कीं ' ईश्वर नाही ' असा मी जबाब देणार, आणि मग आपण आपल्या नवीनच सापडलेल्या मुद्द्याचा माझ्यावर मारा करणार. पण मीं गणूकाकाना चागलेंच चकवलें. ' ईश्वर आहे किंवा नाहीं, ' असा काहींच जबाब न देता मी शातपणें गणूकाकाना विचारलें, " ईश्वर म्हणजे काय, तें स्पष्ट सागा बुवा आपणाला अगोदर, मग तो आहे किंवा नाहीं — मला काय वाटतें तें मी तुम्हाला सागतों. नाहींतर ईश्वर म्हणजे तुमची एक कल्पना असायची आणि माझी दुसरीच असायची, आणि मी आहे म्हणायचं आणि तुम्हाला वाटायचं तुम्हाला वाटतं तसाच आहे. असल्या गैरसमजुतीनें उगाच वाद मिटायला नको. वादाचा विषय पक्की झाला कीं मग आपलं सरळ होय किंवा नाहीं म्हणता येईल. "

माझ्या अपेक्षेप्रमाणें गणूकाका सर्दच झाले. ईश्वराचें अस्तित्व पटवून देणाऱ्या शेंकडों मुद्द्याचें गाटोडें पाठीवर मारून ते आले होते. पण ईश्वर म्हणजे काय, हा मुद्दा उपस्थित होईल, याची त्याना कल्पनाच नव्हती.

" ईश्वर म्हणजे काय, तुला माहीत नाहीं ? " ते चिडून म्हणाले.

" अहो, तें जर मला माहीत आहे, असं तुम्हाला वाटतं, मग ईश्वर आहे कीं नाहीं हा प्रश्न मला विचारण्यात तरी अर्थ काय ? " मी त्यांना आणखी चिडविण्याकरिता म्हणालों.

बाकी गणूकाकाबरोबरचा असला हा वितंडवाद जरी सोडून दिला, तरी हा प्रश्न प्रत्येक माणसाच्या मनात जेव्हा तेव्हा उद्‌भवतो, यात शंका नाहीं. ईश्वर आहे असें म्हणणारांचें म्हणणें असें असतें, कीं चंद्र, सूर्य, तारे, निसर्गातले चराचर वस्तुजात आणि मनुष्यप्राणी निर्माण करणारी आणि जगाचे सर्व व्यवहार

चालविणारी अशी एक अतर्क्य आणि अगम्य शक्ति असून त्या शक्तीला बरें-वाईट सर्व कांहीं समजतें. ही शक्ति म्हणजेच ईश्वर. या आस्तिक्यवाद्याच्या मतें अशी शक्ति अस्तित्वात नाहीं, असें म्हणणारे ते नास्तिक किंवा पाखंडी. मला वाटतें, नास्तिकाची ही व्याख्या चुकीची आहे. कारण आस्तिक असो कीं नास्तिक असो, कुणाहि विचारी माणसाला एक गोष्ट कबूल करावीच लागते, कीं निसर्गाचें जीवन काय किंवा मानवाचें जीवन काय, या सर्वांना चेतना देणारी आणि काहीं विशिष्ट नियमानीं बद्ध अशी एक शक्ति आहे. विशिष्ट कक्षेंत विशिष्ट गतीनें बिनचूक फिरणारे चंद्र, सूर्य, तारे किंवा विवेक आणि इच्छाशक्ति असलेल्या मानव-जातीचा प्रगतिपर इतिहास पाहिला, की या शक्तीच्या अस्तित्वाबद्दल शंकाच राहात नाहीं. ईश्वरवाद्यात आणि निरीश्वरवाद्यात खरा फरक माझ्या मतें इतकाच, कीं ही शक्ति सर्वज्ञ आहे, या शक्तीला बरेंवाईट सर्व काही कळतें, असें ईश्वरवाद्याला वाटतें; आणि एकदा गति मिळालेली — कुणाकडून, कशी आणि कधीं कुणाला ठाऊक — अशी ही एक गतिमान, बरेंवाईट काहीं एक न समजणारी, आंधळी शक्ति आहे, असें विचारवंत निरीश्वरवाद्याला वाटतें.

तत्त्वज्ञ आणि शास्त्रज्ञ जे काय तात्त्विक झगडे लढावयाचे असतील ते आपापसात लढोत; माझ्यासारख्या सामान्य माणसाला इतकें मात्र उघडउघड दिसतें, कीं ही शक्ति मानवी जीवनाला अपूर्णत्वातून पूर्णत्वाकडे खास नेत आहे. आणि त्याहूनहि अभिमानाची गोष्ट अशी, की पूर्णत्वाकडे चाचपडत चाललेल्या या अचाट पण आंधळ्या शक्तीला जाणूनबुजून आणि डोळसपणें मदत करण्याचा अधिकार फक्त विवेकशील अशा मनुष्यप्राण्यालाच आहे.

● ● ●

## ४७

### समतेची आवड !...

गल्या वर्षसहा महिन्यात मी कामाकरिता मुंबईच्या बाहेर फिरत राहिल्यामुळें गणूकाकाची आणि माझी फुरसदीची अशी भेटच झाली नव्हती. अलीकडे मी मुंबईतच येऊन राहिलों आहे हें कळल्याबरोबर गणूकाका परवाच मला भेटावयाला आले. मी लो. टिळकाच्या राजकीय लेखाचा संग्रह वाचीत बसलों होतों.

"काय रे, काय चाललं आहे !" काकांनीं आत शिरता शिरताच प्रश्न केला.

"काहीं नाहीं, लो. टिळकाचे लेख वाचतोंय सहज," मीं पुस्तक बंद करीत उत्तर दिलें.

"माहीत आहेत रे तुझे मोठे टिळक ! आमच्याच शाळेंत होता तो !" काका रुमाल काढून ठेवून कपाळावरचा घाम पुशीत बसता बसता उद्गारले.

काकाच्या त्या उद्गाराची आठवण झाली, कीं मला हंसू येतें. म्हणजे काकाचें म्हणणें काय, कीं आपल्याबरोबर जो माणूस शिकत होता तो मोठा कसा असेल ? छे, छे, मला नाहीं वाटत काकांचें म्हणणें असें असेल. थोड्याबहुत प्रमाणात का होईना, पण अहंगंडानें ( Ego-Complex ) पछाडलेला मनुष्यस्वभाव लक्षांत घेतां स्वतःकडे कमीपणा घ्यावयाचा काकांचा हेतु असेल असें मला म्हणवत नाहीं. माझ्याबरोबर शिकणारा माणूस ज्यास्तींत ज्यास्त माझ्याइतकाच मोठा,

किंवा सर्वसाधारणपणें माझ्याइतकाच लहान असावा, असा नकळत कां होईना पण काकाच्या अंतर्मनातला हेतु असावा. नाहींतर मी म्हणतों, काकासारख्या साध्या आणि सीध्या माणसाला टिळकासारख्या मोठ्या माणसासंबंधीं अवमानगर्भ शब्द वापरण्याचा मोह का व्हावा! काकाच्या शाळेंत शिकत होते हा काय टिळकाचा अपराध ?

अर्थात् यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहींच नाहीं. सर्वसाधारण माणसाना —आणि मानवी समाजातली बहुसंख्याक माणसें सर्वसाधारणच असतात— आपल्यापैकीं आपल्यासारखाच एक आपल्या पुढें किंवा आपल्या वर गेलेला पाहून कसेंसेंच वाटलें तर नवल नाहीं. पक्ष्यात नाहीं का आपण पाहात? एखादा पक्षी जर माणसात मिसळून माणसाळला, आणि तो आपल्या जातभाईच्या तडाख्यात सापडला तर त्याला ते टोंचून टोंचून मारून नाहीं का टाकीत ? अर्थात् मानवी प्राणी सुधारलेला असल्यामुळें तो शब्दशल्यानीं टोंचतो इतकेंच !

माझ्या मतें मानवी मनात उपजतच असलेल्या समतेच्या आवडीचें हें एक स्वरूप आहे. मात्र ही समतेची आवड याच स्वरूपात राहावी कीं तिनें निराळें स्वरूप घ्यावें, हा वादाचा प्रश्न आहे. वर गेलेल्याला खाली असलेल्या बहुसंख्याकानी आपल्याबरोबर खालीं ओढून खालच्या पातळीत समता प्रस्थापित करावयाची, कीं आपणच वर जाण्याचा प्रयत्न करून वर गेलल्याच्या उच्च भूमिकेवर साम्य साधावयाचें ? मला वाटतें, माणसाला समतेची आवड असावी; पण ती दुसऱ्या तऱ्हेच्या समतेची ! मात्र बहुतेक माणसें समता साधण्याचा प्रयत्न करतात तो वर गेलेल्याचे पाय खालीं ओढण्याचा प्रयत्न करून !

सुरुवातीला सांगितलेलें आमच्या गणूकाकाचेंच उदाहरण घ्या ना किंवा आजकाल वृत्तपत्रसृष्टींत घोंघावणारीं टोपणनावीं वाङ्मय चिलटें घ्या. हे कवडीकिंमत उदरंभरू वाटेल त्या लहानमोठया साहित्यिकाला किंवा सुप्रसिद्ध राजकीय पुढाऱ्याला वेळीं अवेळीं वैयक्तिक टीकेचे चावे घेत असतात. अमुक अमुक कवीचें काव्य टाकाऊ आहे; कारण त्यानें एकापेक्षा अधिक बायका केल्या आहेत ! तमक्या राजकीय पुढाऱ्याची देशभक्ति नकली आहे; कारण त्यानें स्वतःच्या मुलाच्या पोटापाण्याची व्यवस्था करून ठेवली आहे ! न्यूनगंडानें ( Inferiority Complex ) जर्जर झालेल्या या प्राण्यांना स्वतःच्या क्षुद्र,

दुःखी-कष्टी मनापुढें हेंच सिद्ध करावयाचें असतें, कीं मला कविता लिहिता येत नसतील, पण मी जन्मभर एका स्त्रीशीं इमानानें वागतों आहें कीं नाहीं ? झालें तर मग. तो कवि कसला आला आहे माझ्यापेक्षा श्रेष्ठ. मीहि कांहीं कमी नाहीं ! पोटाकरिता वर्तमानपत्राच्या कचेरींत खर्डेघाशी आणि जाहिराती मिळविण्याची हमाली करण्यापलीकडे माझ्या हातून दुसरें कांहींच सत्कार्य झालें नसेल; पण देशकार्य करणाऱ्या त्या लोकप्रिय पुढाऱ्याचा स्वार्थत्याग माझ्यापेक्षा कांहीं मोठा नाहीं त्यानेंहि आपल्या मुलाच्या पोटापाण्याची व्यवस्था केलीच आहे कीं नाहीं ? वर वर्णिलेल्या विकृत समतेची आवड हीच अशा तऱ्हेच्या तिरस्करणीय वैयक्तिक टीकेच्या मुळाशीं असते.

उपरोक्त वाङ्मय-चिलटें ज्याच्यावर नेहमीं जिभल्या चाटीत तुटून पडतात अशा माझ्या एका साहित्यिक मित्राजवळ मीं एकदा सहानुभूति व्यक्त करून "तू उत्तर का देत नाहींस ?", म्हणून विचारलें असतां पुढील मानी जबाब त्यानें मला दिला,

"सिंहाची आयाळ उंदीर कुरतडतात, म्हणून उंदराची शेपटी सिंह कुरतडीत नाहीं ?"

दर्पोक्तीच्या उग्र दर्पानें त्याची ही शब्दपंक्ति घमघमत असली, तरी अंतःकरण उचंबळून टाकण्याची तिच्यात खास शक्ति आहे. त्याचे ते भव्य शब्द मला फार आवडतात.



## ४८

### कला आणि कळा ! ...

पुनर्विवाहाची आवश्यकता जनतेला पटवून देण्याकरिता एका जुन्या काळच्या सुप्रसिद्ध लेखकानें लिहिलेली एक दुःखान्तिका ( Tragedy ) मी नुकतीच वाचीत होतों. अर्थात् पुस्तकाची नायिका एक सालस विधवा असून तिचें एका तरुणावर प्रेम आहे. त्याचप्रमाणें तिचा दुष्ट सासरा, तिची खाष्ट सासू, तिचा पापी दीर तिचा अनन्वित छळ करीत आहेत. शेवटीं ती गांजलेली सुस्वभावी नायिका विष प्राशन करून परलोकाला चालती होते. आणि त्या दुःखान्तिकेचा शेवट होतो ! लेखकानें करुणरसाचा परमावधि साधला आहे. पण इतकें सर्व असूनहि मला आवश्यकता पटली ती पुनर्विवाहाची नव्हे. मला असें वाटलें, कीं ज्याप्रमाणें निर्दयपणें वागविल्या जाणाऱ्या बैल, घोडे इत्यादि प्राण्यांच्या संरक्षणाकरितां S P. C. A. ( Society for Prevention of Cruelty to Animals ) नावाची संस्था आहे, त्याचप्रमाणें गांजलेल्या हिंदु स्त्रियांकरिता एक S. P. C. W. ( Society for Prevention of Cruelty to Women ) नांवाच्या संस्थेची आपल्या समाजाला आवश्यकता आहे ! कारण असें आहे, कीं वरील तऱ्हेचे सासूसासरे किंवा दीर असल्यावर विधवेचा काय किंवा सधवेचा काय सारखाच छळ होऊं शकेल. या छळांतून मुक्तता व्हावयाला पुनर्विवाह हा उपाय नव्हे. खरोखर लेखकानें

असें दाखवावयाला पाहिजे होतें, कीं सासूसासरा, दीर किंवा जगातील इतर माणसें त्या निरपराध नायिकेला अत्यंत मायेनें वागवीत आहेत, पण केवळ पुनर्विवाहाची शक्यता नसल्यामुळें तिचा दुःखान्त शेवट होतो. म्हणजे मग वाचकाची खात्री पटली असती, कीं केवळ पुनर्विवाह आपल्या समाजाला संमत नसल्यामुळें इतर सर्व सुखें असूनहि त्या निरपराध जिवाला वैधव्यदुःखा-च्या खाईत पिचून मरावें लागतें. आणि म्हणून आपल्या समाजाला पुन-र्विवाहाची आवश्यकता आहे.

एखादी दुःखान्तिका जर अस्सल कलाकृति असेल, तर ती पाहणाऱ्याच्या किंवा वाचणाऱ्याच्या मनावर एक प्रकारचा उदात्त-गंभीर असा परिणाम करते. पण उपरोक्त दुःखान्तिका वाचून विधवाच्या दुःखाची कींव येऊन पुनर्विवाहाची आवश्यकता पटण्याऐवजीं S. P. C. W. नावाची संस्था काढावी अशी उपरोधगर्भ कल्पना मला सुचली ! याचें कारण हेंच, कीं कृत्रिम दुःखाच्या रसभरित वर्णनानें सुबुद्ध माणसाच्या हृदयाला यत्किंचितहि पाझर फुटत नाहीं.

मला तर असें वाटतें, कीं पुनर्विवाह, बेकारी इत्यादि आधुनिक सामाजिक प्रश्नावर लिहिलेली दुःखान्तिका अमर कलाकृतीच्या पदाला मुळीं पोहोंचूंच शकत नाहीं. मी वाचीत असलेली दुःखान्तिका तर ' विनायक प्रकुर्वाणो रचयामास वानरम् ' या सदराखालीं पडत असल्यामुळें तिला कलाकृतिच म्हणतां येत नाहीं. पण मी म्हणतों, वर म्हटल्याप्रमाणें त्या दुःखान्तिकेंतल्या विधवा नायिकेचा सासूसासऱ्याकडून यत्किंचितहि छळ न होता केवळ पुनर्विवाह न करता आल्यामुळें जरी ती नायिका वैधव्यदुःखांत होरपळून निघाली असती, तरीहि माझ्या मतें त्या दुःखान्तिकेला अमर कलाकृति ही पदवी प्राप्त होणार नाहीं. ती एक चागली कलाकृति म्हणता येईल. पण पुनर्विवाहासारख्या आधु-निक – म्हणजेच काल नव्हता, आज आहे आणि उद्यां कदाचित् नसेल – अशा सामाजिक प्रश्नावर ती आधारलेली असल्यामुळें चिरंतनत्वाच्या वलयाची प्रभा तिच्यातून फाकणार नाहीं. ती दुःखान्तिका ठरेल. ती कलाकृतिहि ठरेल. मात्र ती अमर कलाकृति ठरणार नाहीं, हेंच माझें म्हणणें.

मानवी दुःखाचेहि प्रकार आहेत. आधुनिक जगापुढें ' आ ' वासून राहिलेला बेकारीचा प्रश्न घ्या. धडधाकट शरीराचे कितीतरी तरुण बेकारीला

कंटाळून जगात जिकडेतिकडे आत्महत्या करून घेत आहेत. अगणित निरपराध कुटुंबें अन्नान्नदशा होऊन कुत्र्याच्या मोलानें आयुष्य कंठीत आहेत. या निराश जीवांच्या करुणकथा काहीं कमी दुःखान्त नाहींत. पण हें दुःख आज आहे; उद्या नाहीं आजच्या विषम समाजरचनेमुळें उत्पन्न झालेलें हें दुःख मानवी बुद्धि आणि प्रयत्न आज नाहीं उद्या समूळ नाहींसें करतील; आणि भविष्यकाळच्या साम्यवादी समाजव्यवस्थेंत या दुःखाचा मागमूसहि उरणार नाहीं.

पण जगात दुसऱ्या प्रकारचें एक दुःख आहे; आणि जनन-मरणाच्या फेऱ्यात चिरकाल सांपडलेल्या मानवजातीचें हें दुःख मात्र मानवी प्रयत्नाच्या पलीकडचें आहे. काळपुरुषाशीं चाललेला मानवाचा झगडाच घ्या ना. कुणा मानवानें त्यात विजय मिळविला आहे ? भूतकालात सौंदर्यसम्राज्ञी म्हणून गाज-लेल्या क्लिओपात्राच्या मनोहर मुखकमलावर सुरकुत्या पाडून त्याचा चोळामोळा करून टाकायला काळपुरुषानें मागेंपुढें पाहिलें नाहीं. आजकाल जगाला दिपवून टाकणाऱ्या स्वरूपसुंदरीच्या चेहऱ्यावरहि जीर्णत्वाचीं जाळीं विणावयाला तो कमी करणार नाहीं आणि भविष्यकाळातल्या नवयुवतीचा सुकुमार मुखडाहि आपल्या निर्दय नखाचे ओरखडे ओढून तो विद्रूप करणारच ! मानवी जीवनांतलीं हीं आणि अशा प्रकारचीं दुःखें मात्र चिरंतन आहेत. पहिल्या प्रकारच्या कळा आज सोसाव्या लागत आहेत; उद्या सोसाव्या लागणार नाहींत. दुसऱ्या प्रकारच्या कळाना मात्र ना अंत, ना उसंत ! आणि कला हें जीवनाचें प्रतीक असल्यामुळें ज्या दुःखान्तिकेंत या दुसऱ्या प्रकारच्या कळाची अवीट प्रतिभा उभी केलेली असते तीच दुःखान्तिका अमर कलाकृतीच्या रांगेंत जाऊन बसते. अमर कलेंत वर्णिलेल्या कळा या अशा अमर असतात.

• • •

## ४९

## सुखस्वप्नांचे कारखानदार...!

मोठ्या हुद्द्यावर असलेल्या माझ्या एका मित्राला एकदा मी सहज भेटा-वयाला गेलों होतों. त्या वेळेला त्याच्या बरोबरचे दोन-तीन हुद्देदार गृहस्थ, एक बॅरिस्टर, एक प्रख्यात डॉक्टर, वगैरे बरीच मोठमोठी मंडळी त्याच्या-बरोबर बोलत बसली होती. मी आत शिरल्याबरोबर साहजिकच शिष्टाचारा-प्रमाणें माझ्या मित्रानें त्या सर्वांशीं माझी ओळख करून दिली. आणि मोठ्या अभिमानानें माझ्याकडे पाहात तो सांगूं लागला, "हा कविता लिहितो..." हें वाक्य उच्चारल्याबरोबर त्या इतर थोर मंडळींनीं अशा तऱ्हेनें 'हूं' म्हटलें, कीं असली क्षुल्लक गोष्ट तुम्ही सांगता काय आणि आम्हीं ऐकायची काय! नंतर चहापाण्याच्या, जमीनजुमल्याच्या खरेदीच्या वगैरे महत्त्वपूर्ण गोष्टी सुरू झाल्या. मी मात्र अगदीं शरमल्यासारखा झालों. माझा मित्र ती गोष्ट बोलला नसता तर बरें झालें असतें, असें मला वाटलें. मी स्वतःच्या मनाची खात्री करून देऊं लागलों, कीं कविता करतों त्यात लाज वाटण्यासारखें काय आहे? माझ्या मित्रानें मी कोणाच्या मुंड्या मुरगळतों किंवा खिसे कातरतों, असें थोडेंच सांगितलें? कवि म्हणवून घेण्यात लाज कसली आली आहे! शेक्सपीअर, शेले, कालिदास, कलापी यांच्याच जातीचा प्राणी मी ठरत नाहीं का? ही कल्पना आल्याबरोबर माझें मलाच हंसूं आलें. एखाद्या ब्राह्मण पाणक्यानें किंवा आचाऱ्यानें सबंध हिंदुस्थानवर सत्ता गाज-

विणाऱ्या पेशव्यासारखाच मी सुद्धा चित्पावन ब्राह्मण आहें, अशी हास्यास्पद तुलना करण्यासारखीच माझी वरील कल्पना होती !

थोडा खोल विचार करता मला त्या मंडळींनीं दाखविलेल्या कवीच्या किंवा लेखकाच्या बाबतींतल्या उपेक्षावृत्तीचें विशेष आश्चर्य वाटलें नाहीं. पण मी त्या वेळेला शरमल्यासारखा झालों, या गोष्टीची मात्र मला राहून राहून शरम वाटूं लागली. समाजाच्या या मजबूत आधारस्तंभासमोर समाजाचा आपण एक अगदींच अनुपयुक्त घटक आहोंत, अशी भावना क्षणभर का होईना, पण माझ्या मनाला चाटून गेली असावी, हीच गोष्ट माझ्या त्या शरमण्याच्या मुळाशीं असावी, असें मला वाटतें. कवीला अगर लेखकाला शरमिंधे होण्याचा प्रसंग येतो, तो समाजाच्या इतर घटकाप्रमाणें त्याला स्वतः-च्या व्यवसायाची दुसऱ्याना आणि केव्हा केव्हा स्वतःलासुद्धा उपयुक्तता पटवून देता येत नाहीं म्हणूनच. कलेकरिता कलेचा कुणी कितीहि आक्रोश करो, उप-युक्तता हीच मानवी जीवनात कुठल्याहि गोष्टीची अंतिम कसोटी होय.

अशा अस्वस्थ मनःस्थितींत असतानाच एका तरुण अमेरिकन लेखकाची एक कादंबरी मीं वाचायला घेतली. प्रस्तावनेंत त्यानें स्वतःविषयीं सांगितलेली एक गोष्ट वाचून माझा हर्ष गगनांत मावेना. त्याच्यावरहि माझ्यासारखाच एक शरमण्याचा प्रसंग आला होता. एखाद्या नापास झालेल्या मुलाला आपल्या बरोबरीचे दोघे-तिघे मित्रहि नापास झाले आहेत, हें कळल्यावर जसा आनंद होतो, तसाच तो प्रसंग वाचून मलाहि आनंद झाला. असल्या आनंदात काहीं दुष्टपणा असतो, असें मला वाटत नाहीं पण मानवी मनाचा हा एक दुबळे-पणा आहे खरा. त्या लेखकाला एका गृहस्थानें सहज विचारलें, " की कादंबऱ्या लिहिण्याचा स्वतःचा व्यवसाय आहे हें सांगावयाला तुला लाज वाटत नाहीं का ?"

तो तरुण लेखक क्षणभर गोंधळून गेला. पण नंतर त्यानें दिलेलें उत्तर मात्र त्या गृहस्थाला निरुत्तर करून टाकणारें होतें. तो लेखक म्हणाला, " तुम्ही काय धंदा करता ? "

" मी ॲस्पिरीनच्या गोळ्या विकतों. " त्या गृहस्थानें उत्तर दिलें.

" मग ॲस्पिरीन विकण्याच्या धंद्याची तुम्हाला लाज वाटते काय ? "

" छे, छे ! लाज कसली ? माणसाना अत्यंत उपयुक्त अशा एका पदार्थाचा मी पुरवठा करतों, याचा मला अभिमान वाटतो. " तो गृहस्थ उत्तरला.

" अस्सं ! मग मानवाला अत्यत जरूर असलेल्या सुखस्वप्नाचा मी पुरवठा करतों, आणि त्याचा मला तुमच्यापेक्षांहि अभिमान वाटतो; " तो लेखक म्हणाला, " कारण, एक वेळ ॲस्पिरीनच्या गोळ्याशिवाय माणसाचें चालेल, पण माणसांत व इतर जनावरात फरक हाच, कीं इतर प्राण्यांप्रमाणें माणूस खातो, पितो, औषधें घेतो; पण इतर प्राण्यांपेक्षा त्याला आणखी एका गोष्टीची अत्यंत जरूर भासते आणि याचमुळें तो इतर प्राण्यांपेक्षा श्रेष्ठ ठरतो. मानवी प्राण्यांला केव्हा केव्हा सुखस्वप्नांत रंगून जावेंसें वाटतें. तुमच्या व्यापारी भाषेंत सांगावयाचें म्हणजे त्या सुखस्वप्नाचा मी कारखानदार आहें, समजला ? "

त्या लेखकाचें उत्तर मोठें खोंचदार आणि व्यवहारकुशल आहे, यात शंका नाहीं. पण मला त्या लेखकाच्याहि पुढें जावेंसें वाटतें. ललित लेखकानें निर्माण केलेलीं आणि पुस्तकाच्या दोन पुठ्यात धरून ठेवलेलीं रंगीत सुखस्वप्नें मानवी मनाला क्षणभर गुंगवून विरंगुळा देण्याइतकेंच कार्य करतात का ? कल्पनेच्या कुंचल्यानें रंगविलेल्या आणि फक्त मनाच्या डोळ्याना दिसणाऱ्या क्षणजीवि सामान्य सुखस्वप्नात आणि ललित लेखकाच्या अंतःकरणात स्फुरलेल्या आणि त्याच्या लेखणीनें चितारलेल्या चिरंतन सुखस्वप्नात तुलनाच नाहीं. क्षणभंगुर सुखस्वप्नाचें गुंगवून टाकणारें तरल सौंदर्य ललितकृतींत असतेंच असतें, पण अगम्य मानवी जीवनाचा प्रतिभेच्या प्रकाशानें सुगम्य केलेला एक जिवंत खंड तिच्यात असतो. ललितकृति म्हणजे जीवनांतला जिवंत धगधगीतपणा, पण त्यातली अगम्यता नाहीं; आणि सुखस्वप्नांतलें तरल सौंदर्य, पण त्यांतली क्षणभंगुरता नाहीं ! कागदाच्या कपट्यावर कायम ठसविलेलीं हीं सुखस्वप्नें आजच्याच मानवानें नव्हे, तर उद्यांच्या मानवानेंहि वाटेल तेव्हां मन मानेल तशीं अवलोकावीं आणि आपलें अपुरें मानवी जीवन पूर्णांशानें जगावें. उपयुक्तता हीच जर मानवी व्यवहारांत अंतिम कसोटी असेल तर ललित लेखकाला स्वतःची लाज वाटायला तर नकोच नको, पण अवनितलावर कुठेंहि ताठ मान करून चालावयाचा अधिकांत अधिक अधिकार त्यालाच आहे !

● ● ●

## ५०

## पुरुषांचा स्वभाव...

मी आणि गणूकाका एकदा असेच ट्राममधून चाललों होतों. ट्राम अगदीं गच्च भरून गेली होती. कितीतरी लोक जागा नाहीं म्हणून तसेच उभे राहून प्रवास करीत होते. इतक्यांत एक तरुण स्त्री ट्राममध्यें चढली. बसावयाला जागा नाहीं असें पाहून ती तशीच उभी राहिली. तिला तशी उभी राहिलेली पाहून एका व्यवस्थित कपडे केलेल्या गृहस्थानें उठून तिला आपली जागा देऊं केली.

" छे, छे; मला नको जागा. तुम्ही बसा. " असें म्हणून त्या बाईनें त्या सभ्य गृहस्थाच्या औदार्याची बोळवण केली.

खजील होऊन तो बिचारा आपल्या जागेवर बसला. मला त्या बाईचा राग आला. पण गणूकाका मात्र अगदीं खूष झाले होते.

" खोड मोडली, लेकाची ! " आसुरी आनंदानें काका उद्‌गारले, " हल्लींच्या तुम्हां लोकांना बायकांना अगदीं डोक्यावर घ्यायला पाहिजे. ती उभी राहिली असती तर काय पाय मोडले असते तिचे ? उगाच बायकाना चढवायचं ! "

" अहो काका, बायकांना चढवून ठेवण्याचा प्रश्न नव्हे हा. साधा सभ्यपणा-सुद्धां दाखवूं नये का बायकांना ! " मी म्हणालों.

" स्त्रियांना समान हक्क देतां ना रे, तुम्ही ? " काका मला विचारूं लागले,

" मग तुम्हाला उभं राहावं लागलं तर स्त्रिया देतात तुम्हाला उठून जागा ? नाहीं ना ? मग तुमचाच काय एवढा सभ्यपणा उतूं जातो ?"

काकांच्या या समान हक्काच्या मुद्द्यानें मात्र मी गोंधळलों. कारण काकांनीं या बाबतींत बायकांना पुरुषांइतकेच काय पण पुरुषांपेक्षांहि अधिक हक्क दिले होते. पुरुष नेहमीं स्वतःला अडचणीची जागा घेऊन बायकांना चागली देतात ना ? घोड्याच्या गाडींतून जातांना काका नेहमीं गाडीच्या मोठ्या थोरल्या मागच्या जागेवर बसतात. आणि पुढच्या म्हणजे गाडीवाल्याच्या बैठकीखालच्या छोट्या जागेवर काकूंना बसवतात. त्याचप्रमाणें कोठें बाहेरगांवीं जावयाचें असल्यास बोरीबंदर स्टेशनवर गाडींतून उतरल्यावर इल्लींचे पुरुष स्वतः गांठोडीं उचलतो, किंवा हमाल करतो; त्याप्रमाणें न करता पुरुषांइतकाच गांठोडीं उचलण्याचा हक्क स्त्रीजातीला देण्याकरितां गांठोडीं वगैरे दरवाजापासून प्लॅटफॉर्मपर्यंत ते काकूंनाच न्यावयाला लावतात. बाकी आम्ही नवे लोक याबाबतींत ढिले खरे ! तत्त्वनिष्ठा आणि अर्थप्राप्ति याचा सुंदर मिलाफ करणें शिकावयाचें असल्यास हे जुने लोकच आदर्श होत ! स्त्रियाना समान हक्क देऊन त्यावर आणखी हमालाला द्यावयाच्या एका आण्याची ते बचत करतात.

काकाच्या त्या समान हक्काच्या मुद्द्यानें मी चीत झालों खरा, पण एक गोष्ट मात्र राहून राहून माझ्या मनाला डाचत होती. खरोखरच त्या बाईला दुसऱ्याना त्रास द्यावयाची इच्छा नव्हती, कीं स्त्रियाच्या समान हक्काची जागती जाणीव असलेली ती एक तेजस्विनी असून, पुरुषांकडून कोणत्याहि प्रकारें उपकृत करून घेतल्यास आपल्या स्त्रैण स्वाभिमानाचा पायमल्ली झाल्यासारखें होईल, म्हणून तिनें त्या गृहस्थाच्या स्त्रीदाक्षिण्याचा अव्हेर केला ?

एखादा गृहस्थ जेव्हा स्त्रीदाक्षिण्य दाखवितो, तेव्हा केवळ आपण पुरुष असून स्त्रियांपेक्षा श्रेष्ठ आहोंत या भावनेनें प्रेरित होऊन स्त्रीला तिच्या दुर्बलतेची किंवा अगतिकेची जाणीव करून देण्याकरितां तो तसें करतो, असें मला मुळींच वाटत नाहीं. अर्थात् काहीं स्त्रीलोलुप पुरुष आपल्याकडे स्त्रियांचीं मनें आकर्षिण्याकरितां दाक्षिण्याचा आव आणतात किंवा 'ताई' 'माई' म्हणून स्त्रियांभोंवतीं गोंडा घोळतात, हें मला माहीत आहे. घरांतल्या स्वतःच्या बहिणींकडे ढुंकूनहि न पाहतां इतर लोकांच्या बहिणींवर भ्रातृप्रेमाचा वर्षाव

करणाऱ्या या थोर महात्म्याच्या उदात्त हेतूंना संशय घेणें रास्त नव्हे; पण माझ्यासारख्या सामान्य माणसाला या उदारमतवाद्याच्या उदार हेतूंची उदात्तता काहीं केल्या पटत नाहीं, त्याला माझा इलाज नाहीं.

या असल्या पुरुषांचें स्त्रीदाक्षिण्य एकवार दृष्टिआड केलें, तर स्त्रियांच्या बाबतींत मार्दव किंवा दाक्षिण्य दाखविणाऱ्या सर्वच पुरुषाचा हेतु स्त्रियाना बरोबरीच्या न समजता त्याना कमी लेखण्याचा असतो, याची मला खात्री पटत नाहीं.

पुरुषाच्या स्त्रीदाक्षिण्याच्या मुळाशीं काहींतरी उदात्त भावना असावी अशी माझी कल्पना आहे. पुरुष स्त्रियाना समान हक्क देवोत किंवा अधिक हक्क देवोत, एक गोष्ट निर्विवाद आहे. निसर्गानें मात्र स्त्रियाना समान हक्क दिलेले नाहींत. काहीं अधिक दिले आहेत, काहीं कमी दिले आहेत; पण समान मात्र खास नाहींत. मानवी जीवनाचें सातत्य राखण्याची मानाची पण भयंकर जबाबदारी स्त्रीच्या अंगावर टाकून तिच्या जीवनाची एक बाजू निसर्गानें कायमची पांगळी करून टाकली आहे. आगामी जीवनाच्या जोपासनेकरिता स्वतःच्या जीवनातल्या कितीतरी सुखावर पाणी सोडून. आणि केव्हा केव्हा स्वतःच्या प्राणाचेंहि मोल देऊन निसर्गानें तिच्यावर टाकलेली ही असामान्य जबाबदारी ती पार पाडीत असते. तिच्या या निःस्वार्थी कार्याबद्दल – महनीय मातृपदाबद्दल – अंतर्मनात नकळत दबा धरून बसलेला उदात्त आदर हाच पुरुषाकडून स्त्रियांच्या बाबतींत दाखविल्या जाणाऱ्या मार्दवाच्या मुळाशी असावा, असें मला वाटतें. पुरुषाच्या स्वभावाचें हें पृथक्करण कुणाला पटो अगर न पटो, मला तें पटवून घ्यावेंसें वाटते.

● ❀ ●

५१

## अपवादांचे उपयोग

'गलिव्हरचा प्रवास' हें पुस्तक ज्यानें लहानपणीं वाचलें नसेल असा एक तरी मनुष्य मिळेल कीं नाहीं याची मला शंका वाटते. या पुस्तकाचा लेखक डीन् स्विफ्ट याचें चरित्र मी काहीं दिवसांपूर्वी वाचीत होतों. 'गलिव्हरच्या प्रवासा'इतकेंच त्याच्या लेखकाचेंहि चरित्र मनोरंजक आहे.

लिलिपुट् देशात गलिव्हर गेला, तेव्हा माणसाच्या आंगठ्याएवढे त्या देशातले रहिवाशी त्याच्या हातापायावर खेळूं लागले, किंवा तो ब्रॉब्डिग्नॅग शहरात गेला तेव्हा तिथले अजस्र नागरिक गलिव्हरलाच अक्षरशः हाताच्या बोटावर खेळवूं लागले, हीं वर्णनें वाचताना लहानपणीं आपणाला खूपच खूप गमत वाटत असे. पण या गमतीदार वर्णनातून डीन् स्विफ्टनें एकंदर मानवी मनाच्या मूर्खपणावर आणि लहानसहान क्षुद्रपणावर अत्यंत तिखट आणि उपरोधपूर्ण टीका करून मानवावर मर्मभेदक कोरडे ओढले आहेत, हें आपणापैकीं किती जणाच्या लक्षात आलें असेल ?

डीन् स्विफ्टचें चरित्र वाचताना जीवनातल्या कटु अनुभवानीं त्याची लेखणी जितकी जहरून गेली होती, तितकेंच त्याचें अंतःकरणहि कडवटून गेलें होतें, ही गोष्ट ताबडतोब ध्यानांत येते. त्याच्या काळच्या लोकांत तो एक अत्यंत माणूसघाण्या आणि एकलकोंडा गृहस्थ म्हणून ओळखला जात असे. तो सदैव

दुर्मुखलेला असून एखाद्या जखमी जनावराप्रमाणें स्वतःला एकान्तवासात कोंडून घेत असे. या थोर लेखकाचें सर्वच कांहीं लोकविलक्षण होतें, पण एका गोष्टी-मुळें त्याचे समकालीन त्याला कमालीचा विक्षिप्त समजत. इतर लोक आपला जन्मदिवस इष्टमित्रांना मेजवान्या देऊन मोठ्या आनंदानें साजरा करतात. डीन् स्विफ्ट आपल्या जन्मतिथीच्या दिवशीं सुतक्यासारखे काळे कपडे घालून तो दिवस शोकदिन म्हणून पाळीत असे !

लोक त्याला एक विक्षिप्त आणि अपवादात्मक मनुष्य म्हणोत, पण त्याच्या या कृत्यामुळें मला तो एक खराखुरा तत्त्ववेत्ता आणि द्रष्टा वाटतो. खऱ्या तत्त्ववेत्त्याच्या दृष्टीनें पाहिल्यास आपला प्रत्येक जन्मदिवस म्हणजे आपलें एकंदर आयुष्य एका वर्षानें कमी झालें, हें दाखविणारा आयुःपथावरील स्मारकस्तंभच नाहीं काय ? न चुकता एका एका वर्षानें मृत्यूच्या जवळ्याजवळ अधिकाधिक नेणारा जन्मदिवस हा विचारी मनाला शोकदिन वाटल्यास नवल काय ?

माझें असें मुळींच म्हणणें नाहीं, कीं दिवसेंदिवस आपण मृत्यूच्या अधिका-धिक जवळ जात आहोंत म्हणून प्रत्येक माणसानें सदैव सुतक्यासारखें दुर्मुखलेलें राहून आपला प्रत्येक जन्मदिवस मरणतिथीसारखा पाळावा; मला तर उलट असें वाटतें, कीं या सुंदर जगात आपणाला मोजकेच दिवस काढावयाचे आहेत या तीव्र जाणिवेनें ते जितके कमी होत जातील तितकें आपण शक्य तेवढा या जगातला अधिकच आनंद लुटण्याचा प्रयत्न करून आपलें परिमित आयुष्य पूर्णत्वानें जगण्याचा प्रयत्न केला पाहिजे. हा नियम स्विफ्टसारख्या एखाद्या अपवादामुळें अधिकच सिद्ध होतो.

अपवादामुळें नियम सिद्ध होतो, हा शोध लावणारा माणूस मला खरोखरच कमालीचा शहाणा वाटतो. अपवादांचा उपयोग काय, असें जर मला कुणीं विचारलें तर मी त्याला चटदिशीं उत्तर देतों, कीं अतिपरिचित नियमाच्या अंधारकोठडींत खितपत पडलेलें सत्य अपवादाच्या चिमुकल्या झरोक्यांतूनच दृष्टीला पडतें. दर वाढदिवसाला आपण अधिकाधिकच जगतों आहोंत या आनंदानें आपण तो दिवस साजरा करतों; आणि त्यात वाईट किंवा चुकीचें असें काहींच नाहीं. पण आपण जगतों आहोंत, म्हणजे मरतों आहोंत; क्षणा-क्षणाला श्वास सोडतों आहोंत म्हणजे खरोखर श्वासाश्वासाबरोबर आपण

काळाच्या जबड्यांत खालीं खालीं सरकत आहोंत, हें विरोधात्मक सत्य डीन् स्विफ्टसारख्या एखाद्या अपवादामुळेंच आपल्या डोळ्यासमोर उभें राहत नाहीं काय ?

प्रतिभा नेहमींच अपवादात्मक असते. इतरेजनांना जें दिसत नाहीं तें प्रतिभा-संपन्न मानवाला दिसतें. स्विफ्ट हा एक प्रतिभावान् लेखक होता. इतरांच्या डोळ्याना न दिसणारें एक कठोर सत्य त्याच्या प्रखर प्रतिभेला दिसलें आणि दारुण दुःखानें त्या कलावंताचें अंतःकरण करपून गेलें. या थोर लेखकाला विक्षिप्त म्हणून हंसावयाचें, कीं एका भव्य सत्याचें यथार्थदर्शन दिल्याबद्दल मनःपूर्वक कृतज्ञता व्यक्त करावयाची ?



## ५२

## " थापा " ...

एकदा एक मजेदार गोष्ट माझ्या एका मित्राला मी सांगत होतों. सांगण्याच्या मी अगदीं रंगात आलों असता मला एकदम अडवून तो म्हणाला, " काय थाप मारतोस काहींतरी! खोटं बोलूं नकोस! " त्याचे ते शब्द ऐकून मला वाईट वाटलें आणि खूप रागहि आला. राग यावयाचें कारण असें कीं, थापा मारणें आणि खोटें बोलणें, यात जमीनअस्मानाचा फरक आहे. थापा मारणारा कुठें, आणि खोटें बोलणारा कुठें! थापा मारणें ही एक ललितकला आहे; आणि खोटें बोलणें, म्हणजे काय? बोलून चालून एक गुन्हाच तो!

मी कबूल करतों कीं मी सांगत होतों ती थाप होती; आणि मला वाईट वाटलें त्याचें कारणहि तेंच. कलेचें मर्म हेंच कीं कलेच्या अस्तित्वाचा मागमूसहि पाहणाराला किंवा ऐकणाराला लागता कामा नये. आणि मीं मारलेली थाप, थाप आहे हें जर माझ्या मित्राला कळलें, तर मग माझी कला राहिली कुठें?

हें सर्व जरी खरें असलें, तरी थापा मारणाराला कुणीं खोटें बोलणारा म्हटलें तर तें मी कधींहि ऐकून घेणार नाहीं. कारण थापा मारणारा हा कांहीं झालें तरी कलावंत आहे. खोटें बोलणारा माणूस स्वतःचा काहींतरी स्वार्थ साधण्याकरिता खोटें बोलत असतो. थापा मारण्याचें तसें नसतें. दुसऱ्याचें मनोरंजन करण्याकरिता जी गोष्ट घडलीच नाहीं, ती घडली असें समजून मोठ्या खुला-

वटीनें सागणें म्हणजेच थापा मारणें, असें मला वाटतें. आता प्रत्येक कलेचा दुरुपयोग करता येतो, त्याप्रमाणें या कलेचाहि दुरुपयोग करणारे पुष्कळ आहेत. दुसऱ्याचें मनोरंजन करण्यापेक्षां स्वतःचा बडेजाव मिरविण्याकरिता हे लोक थापा मारतात. पण या थापाना मी मुळीं थापाच म्हणावयाला कबूल नाहीं. या थापा कसल्या ? हें झालें खोटें बोलणें. जातिवंत थापाड्या असें कधींच करणार नाहीं.

थापा मारण्याच्या कलेची मुख्य मख्खी ही कीं जी न घडलेली गोष्ट आपण घडली म्हणून मोठ्या रंगदारपणें सागत असतों, ती घडलीच नाहीं किंवा घडणें शक्यच नाहीं, असा ऐकणाराला नुसता संशयसुद्धा येता कामा नये; त्याचप्रमाणें या कलेच्या सेवकानीं हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे, कीं स्वतःचा मोठेपणा दाखविण्याकरिता किंवा असाच दुसरा काहींतरी स्वार्थी हेतु साधण्याकरिता थापा मारणें हें खऱ्या थापाड्याला शोभत नाही.

म्हणूनच माझ्या मतें कवि, कादंबरीकार, नाटककार हे खरे थापाडे होत. आपण त्याना थोर थापाडे म्हणूं पाहिजे तर. मोठ्या प्रमाणावर मारलेल्या प्रतिभाचतुर थापा, म्हणजेच ललित वाङ्मय असें मला वाटतें. अर्थात् हे शब्द वाचून साहित्यिकानीं माझ्यावर रागावूं नये. कारण त्याना कोणत्याहि प्रकारें कमीपणा आणण्याकरिता मीं हे शब्द वापरलेले नाहींत. माझा हेतु फार उदात्त आहे. थापा मारणारानीं आपल्या कलेची जर मनःपूर्वक जोपासना केली, तर ते कुठच्या दर्जाला जाऊन पोहोंचूं शकतील हेंच त्याना मला दाखवून द्यावयाचें आहे

मला खरोखरच प्रामाणिकपणें वाटतें कीं, माणसामध्यें थापा मारण्याची जी प्रवृत्ति असते तिला आपण उत्तेजन द्यावें. थाप मारण्याची इच्छा तरी का होते, याचा सूक्ष्म विचार करता मला असें वाटतें, कीं प्रत्येक मनुष्याच्या डोळ्यासमोर त्याच्या अगदीं जिव्हाळ्याचें असें कांहींतरी एक ध्येय असतें, आणि बहुधा तें साधणें शक्य नसतें. तेव्हा तें साधल्यानंतर जो आनंद मिळणार असतो तो उपभोगण्याकरिता सत्यसृष्टींत तें साधत नाहीं तर नाहीं, निदान कल्पनासृष्टींत तरी तें साधावें, आणि खरोखरच सत्यसृष्टींत तें साधलें आहे असें लोकाना सांगून तो लोभनीय आनंद उपभोगावा, हाच निरागस हेतु थाप मारणाऱ्याचा असतो, असा माझा तर्क आहे. आमचे गणूकाकाच

घ्या ना. आपला अगदीं करडा स्वभाव असावा आणि घरातल्या व बाहेरच्या लोकानीं आपणाला जमदग्नीचा अवतार समजावें हें आमच्या गणूकाकांचें अगदीं जिव्हाळ्याचें ध्येय आहे. आपण आपल्या बायकोला आणि मुलाना किती भयंकर दराऱ्यांत ठेवलें आहेत, हें जेव्हा ते मला मोठ्या आवेशानें सांगत असतात, तेव्हा ते उघड उघड थाप मारताहेत याची मला जाणीव असते. कारण काकूंच्या समोर काका नुसते गोगलगाय होतात, हें मला पक्कें ठाऊक आहे. पण मी मनाशीं म्हणतों, कीं आपण भयंकर दरारा गाजविणारा उग्र पुरुष आहोंत अशी थाप मला मारून स्वतःचें प्राणप्रिय ध्येय साधल्याचा थोडाबहुत आनंद जर काकाना चाखता आला, तर तो त्याना कां न चाखूं द्यावा ?



## ५३

## तत्त्वज्ञानाचा पराभव

प्रेमव्यवहारांत जो एक प्रकारचा चोरटेपणा असतो, त्याचीं अनेक कारणें मीं आतापर्यंत ऐकलीं होतीं, वाचलीं होतीं आणि अनुभवलींहि होतीं. पण तरुण-तरुणींना आपण एकमेकांवर प्रेम करतों, हें जाहीरपणें कबूल करायला जी एक प्रकारची लाज वाटते तिचें एक नवीनच अजब कारण नुकतेंच माझ्या वाचण्यात आलें. प्रसिद्ध नैराश्यवादी ( Pessimist ) तत्त्ववेत्ता शोपेनहॉर याचें कांहीं लिखाण मी वाचीत होतों. त्यात स्त्री-पुरुषामधल्या आकर्षणाची आणि एकंदर प्रेमव्यवहाराची मीमासा करताना तो म्हणतो, कीं " स्त्री-पुरुषाना आपल्या एकंदर प्रेमव्यवहाराची लाज वाटते याचें कारण असें, कीं आपल्या या आनंद-दायक आकर्षणाचें पर्यवसान विवाहांत होऊन आपण एका नवीन जीवाची पुढें-मागें या दुःखपूर्ण जगात दुःखें भोगण्याकरिता भर घालणार, हें लाजिरवाणें सत्य त्यांच्या मनाला सारखें टोंचत असतें ! "

दुःख आणि निराशा यांशिवाय जगात दुसरें कांहींच नाहीं, असें प्रति-पादन करणाऱ्या शोपेनहॉरच्या दृष्टीनें प्रेमाच्या चोरटेपणाची ही मीमांसा बरो-बरच आहे; कारण जगांतल्या नाना दुःखाच्या खाईत स्वतः पिचत असता मनुष्यप्राणी जगात जगण्याकरिता जर आणखी नवीन मनुष्यप्राणी निर्माण करूं लागला तर त्याच्या त्या कृत्यासारखें लाजिरवाणें आणि दुष्टपणाचें दुसरें कोणतें कृत्य असणार ?

हें सर्व जरी खरें असलें, तरी मला गंमत वाटली ती शोपेनहॉरचें तत्त्वज्ञान आणि त्याचें जीवित याची तुलना करतांना. शोपेनहॉरचें म्हणणें असें, की " जगणें हें इतकें दुःखपूर्ण असूनहि मनुष्य जगूं इच्छितो याचें कारण सर्व मनुष्याच्या अंतःकरणात जगण्याची इच्छा ( Will to live ) ही अत्यंत प्रबळ प्रेरणा आहे. " सर्व दुःखांतून मुक्त व्हावयाचा उपाय म्हणजे ही प्रेरणाच खच्ची करून टाकणें, किंवा थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे आत्महत्या करणें ! मात्र स्वतः शोपेनहॉर बहात्तर वर्षे जगला. इतकेंच नव्हे, तर स्वतःविषयीं वर्तमानपत्रात कुठेंहि चार स्तुतीचे शब्द आलेले असले तर लगेच तेवढा कागद कापून ठेवायचा त्याला म्हातारपणींहि भारी नाद होता !

शोपेनहॉरचें हें तत्त्वज्ञान आणि जीवन पाहून मला एका प्रेमात पडलेल्या तरुणाची कहाणी सांगितल्याशिवाय राहवत नाहीं. या प्रेमवेड्यानें आपल्या प्रियकरणीला एक लाबलचक प्रेमपत्र लिहिलें. त्यात त्यानें आपल्या वल्लभेला लिहिलें होतें, की " तुझ्यासाठी मी जिवाचें रान करीन, सात समुद्र ओलांडावयाला मागें-पुढें पाहणार नाहीं, वाटेल ते कष्ट करीन, उपास-तापास साहीन " वगैरे वगैरे; आणि पत्राच्या शेवटीं त्यानें एक ' ताजा कलम ' टाकला होता; त्यात " किंचित् पडसें झाल्यामुळें आज संध्याकाळीं तुला भेटायला येणें मला शक्य होणार नाहीं; तरी तू क्षमा करशील अशी आशा आहे. " असा मजकूर लिहिला होता !

आत्महत्येच्या संप्रदायाचा प्रसार करूं पाहणारा नैराश्यवादी तत्त्ववेत्ता बहात्तर वर्षें जगतो आणि शांतपणें बिछान्यात मरतो, हाच माझ्या मतें नैराश्यवादी तत्त्वज्ञानाचा पुरेसा पराभव आहे. आणि तत्त्वज्ञान निराशावादी असो किंवा आशावादी असो, जीवनापुढें त्याचा नेहमींच पराभव होतो. अर्थात्, त्यात नवल वाटण्यासारखें कांहींच नाहीं. कारण तत्त्वज्ञानाशिवाय जीवन असूं शकतें; पण जीवन नसतें तर तत्त्वज्ञान अस्तित्वांतहि येऊं शकलें नसतें.

• • •

## ५४

## कलेचा परीस

काहीं दिवसांपूर्वी एका मित्राशीं माझा मोटा कडाक्याचा वादविवाद झाला. अर्थात् त्याला वादविवाद म्हणण्यापेक्षा वितंडवाद म्हणणेंच अधिक शोभेल. आमच्या वादाचा विषय काय, तर रवींद्रनाथ टागोर मोठे कीं लोकमान्य टिळक मोठे! खरें पाहूं गेल्यास हीं दोनहि माणसें आपापल्या क्षेत्रात आपापल्यापरीनें मोठीं आहेत, आणि हा भलताच वितंडवाद करणारे आम्ही दोघेहि महामूर्ख होतों. पण असला मूर्खपणा आपण कितीतरी वेळां करतों आम्ही अगदीं हमरीतुमरी-वर आलों होतों. माझा मित्र माझ्या अंगावर ओरडून म्हणाला, "अरे, तुझ्या टागोराना आमच्या टिळकांवर काव्यं लिहावीं लागतील!"

"टागोर एखाद्या उंदराच्या पिल्लावरसुद्धां सुंदर काव्य लिहितील. म्हणजे कांहीं उंदराचें पिल्लू टागोरांपेक्षा श्रेष्ठ ठरत नाहीं!" मीं त्याला शातपणें उत्तर दिलें, "टिळकांचा अपमान करण्याचा माझा उद्देश नाही. पण कवीपेक्षा काव्याचा विषय अधिक मोठा ठरूं लागला, तर दगडाच्या मूर्ति घडविणाऱ्या कलावंतापेक्षा दगडच श्रेष्ठ ठरावयाचा!"

माझें हें उत्तर ऐकून माझा मित्र थिजूनच गेला.

आमचा हा वाद मूर्खपणाचा होता, यांत शंकाच नाहीं. वाङ्मयक्षेत्रांत टागोर ही जेवढी श्रेष्ठ व्यक्ति आहे तेवढीच राजकारणांत टिळक ही थोर विभूति आहे.

पण या वादाचा शेवट करतांना मीं वर जो युक्तिवाद केला त्यामुळें एक नवीनच विचार माझ्या मनांत आला. टागोर परमेश्वरावर जितक्या सफाईनें एखादी कविता लिहितील, तितक्याच सफाईनें एखाद्या उंदराच्या पिल्लावरहि कविता लिहूं शकतील, ही गोष्ट अगदीं खरी आहे. इतकेंच नव्हे, तर या दोन्ही कविता श्रेष्ठ दर्जाच्या कलाकृति ठरूं शकतील. एक कविता उंदरासारख्या क्षुल्लक प्राण्यावर आहे म्हणून ती कमी दर्जाची आणि दुसरी प्रत्यक्ष परमेश्वरावर आहे म्हणून ती उच्च दर्जाची असें मुळींच होणार नाहीं. मला मौज वाटली ती याच गोष्टीची कीं कलेच्या राज्यात उंदीर आणि परमेश्वर एकाच दर्जाचे !

मला वाटतें, कला ही परीसासारखी आहे. ज्याप्रमाणें परीसानें लोखंडाला स्पर्श केला कीं त्याचें सोनें होतें, त्याचप्रमाणें विषय क्षुद्र असो अगर महान् असो, श्लील असो अगर अश्लील असो, कलेनें त्याला स्पर्श केला, कीं सौंदर्याची निर्मिती झालीच पाहिजे.

म्हणूनच अश्लील कला किंवा अश्लील वाङ्मय हा शब्दप्रयोगच मला चुकीचा वाटतो. अश्लील म्हणजे असुंदर; आणि जी कला सौंदर्य निर्माण करीत नाहीं ती कलाच नव्हे. अर्थात् ती कला अश्लील असेल तर कलाच होऊं शकत नाहीं; आणि कला असेल ती अश्लील होऊं शकत नाहीं !

एखाद्या कलाकृतीवर किंवा वाङ्मयकृतीवर 'अश्लील' म्हणून छाप मारणारे निर्बुद्ध टीकाकार चूक करतात ती हीच. विषय अश्लील असला कीं याच्या मतें ती कृति अश्लील झाली. जीवनात अश्लील किंवा असुंदर गोष्टी खूप असतील, पण कलेच्या राज्यात त्याचा प्रवेश झाला कीं त्या सुंदर होतात, एवढीच गोष्ट हे लोक अचूक विसरतात. एखाद्या कादंबरीकारानें शहराच्या गलिच्छ भागाचें यथातथ्य वर्णन केलेलें असलें तर तें वर्णन घाणेरडें आहे, आणि एखाद्या फुलबागेचें वर्णन केलेलें असलें तर तें सुंदर आहे, असें आपण म्हणत नाहीं. दोन्हीं वर्णनाना तीं कलापूर्ण असतील तर आपण सुंदरच म्हणतों. हीच गोष्ट अश्लीलतेची. एखाद्या गोष्टींत शरीराच्या अश्लील गणल्या जाणाऱ्या एखाद्या भागाचें वर्णन आहे म्हणून केवळ ती गोष्ट अश्लील ठरणार नाहीं. ती जर कलापूर्ण, म्हणजे डोळयांना दिसणारें म्हणा अगर मनाला प्रतीत होणारें म्हणा, कसलेंहि सौंदर्य-निर्माण करणारी असेल, तर ती सुंदर म्हणजे श्लील ठरणार.

एखाद्या स्त्रीच्या उरोभागाचें एखाद्यानें विनाकारण पाल्हाळिक वर्णन केलें तर तें अश्लील ठरेल, पण तेंच मॅक्झिम् गॉर्कीसारख्या एखाद्या कलावंतानें उदात्त अगर सुंदर भावना निर्माण करण्याकरिता केलें तर त्याला कोण अश्लील म्हणेल ? आपल्या एका लघुकथेंत गॉर्कीनें एका भिकारणीच्या उरोभागाचें अत्यंत सूक्ष्म आणि तपशीलवार वर्णन केलेलें मला आठवतें. त्या भिकारणीच्या हीन, दीन परिस्थितीचें करुणाजनक चित्र रंगविताना तिच्या फाटक्या लक्तरातून ती आपला स्तन लपविण्याचा प्रयत्न करीत असताहि लपविल्या न जाणाऱ्या तिच्या शुष्क स्तनाग्राचें समर्पक वर्णन करून, तिचें भुकेनें व्याकुळ झालेलें अर्भक त्या स्तनाकडे पाहून पाहून रडतें आहे; आणि तो दुग्धहीन, शुष्क स्तन आपल्या बाळाला दिसून त्यानें अधिक रडूं नये म्हणून तो लपविण्याचे त्या गरीब बाईचे केविलवाणे प्रयत्न चालले आहेत, असें अत्यंत हृदयविदारक चित्र गॉर्कीनें रेखाटलें आहे. अश्लीलतेच्या लोखंडाला कलेच्या परीसानें स्पर्श केला कीं सौंदर्यरूपी सोनें निर्माण होतें तें असें.



## ५५

### स्वतःचा विचार

स्वतःला विद्वान् समजणाऱ्या एका शाळा-मास्तराची एक मजेदार गोष्ट सांगतात. कोणतीहि आधुनिक कविता त्याच्या हातात दिली, कीं तिच्यातले शब्द तो सरळ गद्यात मांडतो आणि वाचून पाहतो. अशा तऱ्हेनें वाचल्या-नंतर त्या कवितेंत काहींतरी नवीन सांगितलें आहे असें त्याला दिसलें, तरच त्या कवितेंत काहींतरी तथ्य आहे असें त्याला वाटतें; नाहीं तर ती कविता तो टाकाऊ ठरवितो. या शाळा-मास्तराच्या कानांची लांबी आणि पायांची संख्या विचारण्याचा मोह मला अनिवार होतो. गद्यांत सांगतां येण्यासारखी काहींतरी नवीनच गोष्ट सांगणें एवढाच जर काव्याचा हेतु असता, तर नादमधुर, अर्थ-गंभीर शब्द, छंदोमय रचना, गानक्षमता इत्यादि इत्यादि काव्य ज्यामुळें काव्य होतें, अशा गोष्टींचे उपद्व्याप करण्याची कुणाहि कवीला जरूरच पडली नसती. पृथगात्म कविता लिहिणाऱ्या कुणाहि कवीच्या काव्यांत नवीन असें काहींच सांगितलेलें नसतें, किंवा त्याची विशिष्ट नादमधुर शब्दरचना अथवा भाषा-शैली यातच त्याचें नावीन्य अथवा पृथगात्मता असते, असें माझें मुळींच म्हणणें नाहीं. पण नावीन्य किंवा मौलिकता ( Originality ) म्हणजे काय, याची वरील तऱ्हेच्या टीकाकारांना कल्पनाच नसते.

तसें पाहूं गेल्यास डान्टे, कालिदास, शेक्स्पीअरपासून तों अगदीं आज-

कालच्या रूपर्ट ब्रूक्, बालकवि, माधव ज्यूलियनपर्यंतच्या सर्व कवींनीं प्रेमकाव्यें लिहिलीं आहेत. एक कुणीतरी सुंदर, तरुण स्त्री असणें; कवीनें तिच्यावर प्रेम करणें, तिनें हंसणें, रुसणें, कवीच्या गळ्यांत पडणें आणि कवीचे स्वर्गाला हात लागणें; तिला दुखणें येणें, तिनें मरणें किंवा दुसऱ्या कुणा पुरुषाच्या तिनें नादीं लागणें आणि कवीवर आकाशातली कुऱ्हाड कोसळणें, हाच एक विषय घेऊन जाऊन या सर्व प्राचीन, अर्वाचीन, लहान-थोर कवींनीं निरनिराळ्या सुरांत आळविला आहे. त्या शाळा-मास्तरानें जर गद्यात मांडून या कवीच्या कविता वाचल्या, तर त्यात त्याला या एका गोष्टीखेरीज दुसरें कांहींएक अपूर्व असें सांपडणार नाहीं. मला त्या शाळा-मास्तराची दया येते. पण जगांत जें कधीं झालेंच नाहीं, किंवा आतांपर्यंत कुणीं कधीं केलेंच नाहीं तें करणें म्हणजे मौलिकता, अशी वस्तुस्थिति नाहीं, त्याला माझा इलाज नाहीं.

जगात अगणित माणसें आहेत. प्रत्येक माणूस दुसऱ्या प्रत्येक माणसाहून निराळा आहे. पण तो निराळा आहे म्हणजे त्याला चार डोळे किंवा पांच पाय आहेत, असा त्याचा अर्थ नव्हे. सर्व माणसाना दोन डोळे आणि दोनच पाय आहेत. सर्वांचे नाक, डोळे, कान सारखेच आहेत; पण प्रत्येक चेहऱ्यात या सर्व अवयवाची मांडणी अशा काहीं वेगवेगळ्या तऱ्हांनीं केली आहे, कीं प्रत्येक चेहरा इतर चेहऱ्याहून निराळा आणि नवीन वाटतो. प्रेम हा एकच विषय शेक्सपीअरनें हाताळला आहे, आणि शेलेनेंहि हाताळला आहे; प्रेम या एकाच भावनेची तार कलापीनें छेडली आहे आणि केशवसुतांनीहि छेडली आहे. पण शेलेचें व्यक्तित्व आणि प्रेमभावना या दोहोंच्या संयोगामुळें जा एक नवीनच पदार्थ निर्माण झाला तो साऱ्या जगात एक आणि एकच. तसा दुसरा पदार्थ जगात झाला नाहीं आणि होणार नाहीं. जगात प्रेम कितीतरी ठिकाणीं सापडेल, पण ' शेले अधिक प्रेम ' हें समीकरण एकमेवच राहणार. तसेंच एकमेव ' शेक्सपीअर आणि प्रेम ' हें समीकरण. कवीनें किंवा लेखकानें काय नवीन सांगितलें आहे यांत त्याची मौलिकता नसते. सर्वांनीं सागितलें आहे तेंच तो सांगेल; पण तें त्यानें — त्या विशिष्ट व्यक्तीनें — सांगितलें आहे, यांतच त्याची अपूर्वाई. अपूर्व वस्तु निर्माण करण्याची शक्ति म्हणजे प्रतिभा हें खरें, पण अपूर्व म्हणजे ' जें झालेंचि नाहीं, तें निर्माण करावें काई ! ' नव्हे;

तर पूर्वी असलेल्याच दोन वस्तु, पण त्यांचा कधीं न घडलेला संयोग झाल्या-मुळें निर्माण झालेली तिसरीच नवीन वस्तु. पिवळा रंग जगांत असतो आणि निळाहि असतो; पण हे दोन रंग एकमेकात मिसळले, कीं अगदीं अपूर्व असा तिसराच हिरवा रंग निर्माण होतो. तोच प्रकार वाङ्मयात. प्रेम हा विषय अनादिकालापासून जगांत आहे. त्यांत शेलेचें व्यक्तित्व मिसळलें, कीं शेलेचें अपूर्व प्रेमकाव्य निर्माण होतें; त्यात केशवसुताचें व्यक्तित्व मिळवलें, कीं केशवसुताचें मौलिक प्रणयगीत जन्माला येतें. कुणींसें म्हटलें आहे तेंच मला खरें वाटतें, कीं "मौलिकता म्हणजे इतरांहून कांहीं निराळाच विचार करणें नव्हे, तर स्वतःचा विचार स्वतःच करणें."



## ५६

### ' नीति आणि अनीति...'

पॉन्टियस् पायलेट्नें ' सत्य म्हणजे काय ? ' हा प्रश्न जितक्या साळसूद-पणानें विचारला होता, तितक्याच साळसूदपणानें ' नीति म्हणजे काय ! ' हा प्रश्न मला विचारावासा वाटतो ! याचा अर्थ असा नव्हे, कीं मला अनीति आवडते. माझ्यापुढें हा प्रश्न उभा राहतो तो मी जेव्हा नीति-अनीतीच्या कल्पनाच्या इतिहासाकडे सूक्ष्म दृष्टीनें पाहतों तेव्हां.

परवा असाच एक प्रसंग घडला. धान्य लबाडीनें सांठवून ठेवून सरकारला फसविण्याबद्दल रशियामधल्या न्यायकोर्टानें कांहीं शेतकऱ्यांना मृत्यूच्या शिक्षा फर्माविल्या. एवढ्याशा अपराधासाठीं देहान्त शिक्षा दिल्या म्हणून रशियन कम्यूनिस्ट किती दुष्ट दैत्य आहेत, असा भांडवलदाराच्या वर्तमानपत्रांनीं जगभर डांगोरा पिटावयाला सुरुवात केली. खरोखरच भांडवलशाहीला पोषक अशा समाजरचनेंत ज्याला ' नीति ' ' नीति ' म्हणतात त्या दृष्टीनें तो कांहीं मोठासा गुन्हा नव्हताच. कारण लाखों बेकार लोक भाकरीच्या तुकड्याकरितां उपाशी मरत असतांना, जिला ' भांडवलशाहीचा स्वर्ग ' म्हणतात त्या अमे-रिकेमध्यें गव्हाचे भाव चढवून, स्वतःच्या तुंबड्या भरण्याकरितां गव्हाचीं कोठारेंच्या कोठारें तिकडचे भांडवलदार जाळून भस्मसात् करतात ! आणि तो मुळींच गुन्हा समजला जात नाहीं. कारण खासगी मालमत्ता वाढविण्या-

करितां जें जें करावें लागतें, तें तें भांडवलदारी समाजव्यवस्थेंत महान् नीतितत्त्व म्हणून समजलें पाहिजे! पण रशियाची गोष्ट वेगळी आहे. समाजाच्या सामुदायिक हिताकरिता — सत्ताधारी वर्गाच्या खासगी तिजोऱ्या भरण्याकरिता नव्हे — रशियाची समाजव्यवस्था आहे. आणि समाजस्वास्थ्याला धोका पोहोंचेल अशी एखादी गोष्ट जर कुणी केली, तर ती भयंकर अनीतिकारक समजली जाऊन त्या समाजकंटक गुन्हेगाराला कडक शासन केलें जातें. लोक अन्नान्न करीत असता धान्य साठवून ठेवणें, हा रशियांत खरोखरच अक्षम्य गुन्हा समजला जातो. आणि याच गुन्ह्याला भांडवलशाहींत भांडवलदारांचा जन्मसिद्ध नैतिक हक्क समजला जातो!

खरी गंमत अशी आहे, कीं विशिष्ट समाजव्यवस्थेंत जो वर्ग सत्ताधीश असेल, तो आपल्या वर्गहिताला ज्या ज्या गोष्टी पोषक त्या त्या नीतिकारक व ज्या ज्या स्वहितविरोधी त्या त्या अनीतिकारक, असें ठरवून टाकतो. मनुस्मृतीचा काळ घ्या — ब्राह्मणाला चारहि वर्णांपैकीं खालच्या कुठल्याहि वर्णातल्या स्त्रीशीं विवाह करावयाला मोकळीक! ब्राह्मणानें शूद्र स्त्रीशी व्यभिचार केला तर त्याला थोड्याशा मोहरा दंड; पण शूद्रानें ब्राह्मणीशीं व्यभिचार केला, तर हालहाल करून त्याला ठार करावयाचा! ब्राह्मणानें शूद्राला शिवी दिली तर विशेष कांहीं नाहीं; पण शूद्रानें जर का ब्राह्मणाला शिवी दिली, तर लोखंडाचा खिळा तांबडा लाल तापवून दहा आंगळें त्याच्या तोंडांत खुपसावा, असें आमचे पूज्य पूर्वज मनुराज सांगतात! वर्गहितसंरक्षणाचा इतका किळसवाणा कळस जगाच्या इतिहासांत दुसरीकडे कुठें सांपडेल किंवा नाहीं, याची मला शंका वाटते.

आणि नीतितत्त्वांच्या ऐतिहासिक उगमाच्या गहन गोष्टी थोडा वेळ बाजूला ठेवून, आजच्या नीति-अनीतीच्या आहेत त्या कल्पनासुद्धा क्षणभर बरोबर आहेत असें धरून चाललों, तरीसुद्धां 'नीति' 'नीति' म्हणजे काय, असा प्रश्न मला विचारावासा वाटतो. कारण 'नीतिमान्' 'नीतिमान्' म्हणून मिरवणारे बरेचसे लोक, ज्याना अनीतीनें वागावयाची कधी संधीच मिळत नाहीं, असे असतात! निःस्त्रीक अशा बेटावर तीन-चार वर्षें अडकून पडलेल्या रॉबिन्सन क्रूसोनें 'मी चार वर्षें कडकडीत ब्रह्मचर्य पाळलें', म्हणून जर फुशारकी मारली तर तो जितका नीतिमान् ठरला असता तितकेच नीतिमान् बहुतेक लोक

असतात. मला तर वाटतें कीं, पुण्यशील कृत्य करणाऱ्यापेक्षां प्रचंड पाप करणाऱ्या माणसालाच अधिक नीतिधैर्य लागतें. कारण पुण्य करणाराला ‘ उदो ’ ‘ उदो ’ करून सर्व जग आपणाला डोक्यावर घेणार ही स्वार्थी आशा तरी असते; पण पाप करणाराला चारहि बाजूंनी भयंकर निंदा आणि प्रखर वाग्बाण सहन करण्याची तयारी करावी लागते !



## ५७

## " कांहीं उपयोगी प्राणी... "

नुकताच कुठल्याशा एका अमेरिकन मासिकांत काहीं राजकीय विषयावर चाललेला वाद मी वाचीत होतों. एका गृहस्थानें काहीं एक विधान केलें होतें, आणि त्यावर त्याच्या प्रतिपक्षीयानीं जोराचा हल्ला चढविला होता. बऱ्याचशा प्रतिपक्षीयाचा हल्ला न्याय्य आणि चिकित्सक बुद्धीनें केलेला होता. पण कांहीं प्रतिपक्षीयाची टीका कमालीची वैयक्तिक आणि कुत्सित स्वरूपाची होती. दुसऱ्या तऱ्हेची टीका करणाऱ्यांचें व त्या गृहस्थाचें काहीं खासगी वैर असावें, असा तो वाद वाचणाऱ्या माझ्या बऱ्याचशा मित्रानीं तर्क केला.

" त्याचें खासगी वैर असलेंच पाहिजे, असें मला काहीं वाटत नाहीं " असें मीं म्हणतांच, माझ्या मित्राना मोठें आश्चर्य वाटलें.

मला या लोकाच्या आश्चर्याचें आश्चर्य वाटतें ! सर्प विषारी दंश कां करतो किंवा कावळा घाणींतच चोंच कां खुपसतो, याचें आपणाला आश्चर्य वाटतें का ? बुल्बुलाच्या गोड गाण्यास निसर्ग जितका जबाबदार आहे, तितकाच सर्पाच्या विषारी दंशालाहि तोच जबाबदार आहे. दुग्धजलाच्या मिश्रणांतून फक्त दूध प्राशन करणें हें हंसाला जितकें नैसर्गिक तितकेंच चांगल्या आणि घाणेरड्या वस्तूंतून नेमकी घाणेरडी वस्तु लांबविणें हें कावळ्याच्या बाबतींत नैसर्गिक. या सर्व गोष्टी नैसर्गिक असल्यामुळें त्याबद्दल आश्चर्य व्यक्त करणें किंवा त्या प्राण्यांवर

दोषारोप करणें हें योग्य आहे, असें मला वाटत नाहीं. सर्पाला दुष्ट किंवा कावळ्याला घाणेरडा म्हणणाऱ्यांचा मला खरोखरच संताप येतो. काळ्या माणसाला 'काळा' म्हणून हिणवणें किंवा ठेंगण्या माणसाला 'बुटका' म्हणून हंसणें, हें जितकें असभ्य, तितकेंच सर्पाला 'दुष्ट' किंवा कावळ्याला 'घाणेरडा' म्हणणें, हें असभ्य आहे, असें माझें प्राजळ मत आहे. इतकेंच नव्हे तर या दोन्ही प्राण्यांचा जगाला इतका उपयोग आहे, कीं त्याबद्दल आपण त्याचे आभारच मानले पाहिजेत.

भौतिक जगात या दोन प्राण्यांचा जितका उपयोग आहे तितकाच उपयाग वाङ्मयसृष्टींत वैयक्तिक, कुत्सित टीका करणाऱ्या टिकाकाराचा आहे, असें मला वाटतें. इकडे तिकडे पडलेल्या घाणीचें उच्चाटण करून कावळा ज्याप्रमाणें शहराच्या आरोग्याला मदत करतो, त्याप्रमाणें एखाद्या लेखकात थोड्याबहुत मिळालेल्या यशानें जर अहंतेची घाण साचली असेल, तर वरील तऱ्हेच्या टीकाकाराच्या विषारी टीकेनें ती खात्रीनें साफ होते. आणि असल्या टीकाकारांचा दुसरा एक फारच मोठा उपयोग होतो. निसर्गशास्त्रवेत्ते सांगतात कीं सर्प, वाघ, सिंह इत्यादि मानवांची मृत्युसंख्या वाढविणारे प्राणी निर्माण करण्यात जगाची लोकसंख्या योग्य मर्यादेंत राहावी, असा एक निसर्गाचा हेतु आहे. रोगाच्या सांथी, धरणीकंप, अतिवृष्टि इत्यादि निसर्गाच्या अनेक साधनापैकीं हिंस्र प्राणी हेंहि एक त्याचें साधन आहे. मला वाटतें, वाङ्मयसृष्टींतहि हाच नियम लागू आहे. वाङ्मयाच्या बेफाट पैदाशीला कांहींतरी आळा बसावा म्हणून उपरिनिर्दिष्ट मनोवृत्तीचे टीकाकार जन्माला येत असावेत. उगाच लिहावयाचें म्हणून कांहींतरी दुबळें लिखाण लिहिणाऱ्या बऱ्याच लेखकांच्या लेखण्या असल्या टीकाकाराच्या कुत्सापूर्ण विषारी टीकेनें मृतप्राय होत असल्या पाहिजेत. मी तरी याबद्दल या टीकाकारांना दोष देणार नाहीं. जगण्याचा अंगात जोम नाहीं, तर जगाच कशाला ?

हे लोक वैयक्तिक द्वेषानें लिहीत असतील, हें मुळीं मला खरेंच वाटत नाहीं. एखाद्या लेखकाचा वैयक्तिक द्वेष करून टीकाकाराला मिळणार काय ? मला वाटतें, कुठल्याहि लिखाणांतली चांगली गोष्ट ग्रहण करून आनंद अनुभवण्याची शक्तिच या लोकांत नसावी. आंधळ्याला सुंदर वस्तु दिसत नाहींत म्हणून, किंवा बहिऱ्याला मधुर नाद श्रवण करतां येत नाहींत म्हणून त्यांची

लोक दया करतात; आणि वाङ्मयातला आनंद अनुभवण्याची शक्ति अजीबात नसलेल्या वरील तऱ्हेच्या दुर्दैवी टीकाकारांवर मात्र आग पाखडतात, हें माझ्या मतें भयंकर अन्याय्य आहे. अंधपणाचें, बहिरेपणाचें किंवा असेंच दुसरें एखादें शारीरिक व्यंग असलेला दुःखीकष्टी मनुष्य ज्याप्रमाणें जगावर नेहमीं कातावतो, आणि त्याच्या तोंडातून अकारण कटु शब्द बाहेर पडतात, त्याचप्रमाणें वाङ्मयांतील विशुद्ध आनंद चाखण्याचें ज्याला इंद्रियच नाहीं, अशा माणसाच्या लेखणींतून कुत्सापूर्ण विषारी शब्द बाहेर पडतात. मग अशा प्राण्यावर गहजब करावयाचा कीं त्याची कींव करावयाची ?



## ५८

### " प्रेमांत पडणें !...... "

दीड-दोन वर्षांपूर्वी माझ्या एका मित्राचा प्रेमभंग झाला. सुस्कान्याचे झंझावात सुटले. अश्रूंचा पाऊस पडला. वगैरे वगैरे सर्व प्रकार यथाविधि, यथासाग झाले. खरोखर तीन-चार महिने तो बिचारा अगदीं पिसाटासारखा होऊन खचून गेला होता. यापुढें आपल्या आयुष्यात सुखाचा सूर्य कधींच उगवणार नाहीं, आपलें जीवन म्हणजे औदासीन्याची कधींहि न संपणारी एकच एक अशी काळोखी रात्र होणार वगैरे वगैरे उद्गार त्यानें आमच्या-समोर काढले. आणि त्याची ती स्थिति पाहून आमच्याहि डोळ्यांना पाणी आलें.

या प्रेमभंगाचें कारण अर्थात् नेहमींचें आणि ठराविक होतें. त्याच्या प्रेम-देवतेच्या आईबापांनीं — विशेषतः बापानें — त्या लग्नाला विरोध केला, आणि हें लग्न झाल्यास प्राण सोडूं असा धाक घातला. ती मुलगी होती आर्य स्त्री. आणि आर्य स्त्री ही लग्नानंतर जितकी पतिव्रता असते, तितकीच लग्नापूर्वी पितृनिष्ठ असल्यामुळें त्या मुलीनें कढत कढत अश्रूंचें सिंचन करीत आणि आपल्या बापासाठीं आपण उदात्त आत्मत्याग करीत आहोंत, अशा हुतात्म्या-च्या आविर्भावानें, ज्याच्या संसाराचे सारे बोटावर मोजण्याइतके दिवस उरले होते अशा म्हाताऱ्या बापासाठीं, संसाराला नुकतीच कुठें सुरुवात होणार

होती, अशा आमच्या तरुण मित्राचा त्याग केला! अर्थात् आपल्या मुलीनें आपल्या मनाविरुद्ध लग्न केल्यामुळें एखाद्या बापानें प्राण सोडल्याचें उदाहरण माझ्या तरी अजून ऐकिवात नाहीं. उलट असल्या लग्नानंतर कांहीं दिवस गेल्यावर नातू कधीं होतो याची वाट पाहात बसणारे आईबापच बरेचसे माझ्या दृष्टीला पडले आहेत. पण हें तत्त्व मला पटलें तरी बऱ्याच मुलींना अजून पटावयाचें आहे! तरुण प्रेमिकानीं धीर खचू न देता स्त्री-वर्गात या तत्त्वाचा जारीनें प्रचार करावा!

पण मला या सर्व प्रकरणात गंमत वाटली ती यानंतर झालेल्या प्रकाराची. पुढें कांहीं दिवसांनीं आमच्या त्या मित्राची आणि एका मुलीची ओळख झाली. ओळखींतून दाट मैत्री, आणि दाट मैत्रींतून प्रेमाचा उद्भव झाला. आणि तो पहिल्याइतकाच, किंवा त्याहून थोडा अधिकच आनंदी, सुखी आहे त्या सुस्काऱ्याची, त्या अश्रुसिंचनाची, त्या काळोख्या रात्रीची त्याला आठवणसुद्धां आहे असें दिसत नाहीं. त्याच्या चंचलपणाबद्दल त्याला हिणवून काहीं लोक त्याला हंसतात. पण मला मात्र त्याच्या निरोगी मनोवृत्तीबद्दल त्याचें मनःपूर्वक अभिनंदन करावेंसें वाटतें. त्याच्या वृत्ती मला अत्यंत नैसर्गिक आणि योग्य वाटतात. निसर्गाला कसल्याहि पोकळीचा अत्यंत तिटकारा आहे. ' Nature abhors vacuum ' हा सिद्धान्त सुप्रसिद्ध आहे. मग हृदयाची पोकळी तरी या सिद्धान्ताला अपवाद का असावी!

एकनिष्ठ प्रेम, याचा अर्थ एका वेळीं एखाद्या स्त्रीनें एकाच पुरुषावर प्रेम करणें, किंवा एखाद्या पुरुषानें एका वेळीं एकाच स्त्रीवर प्रेम करणें, असा असेल, तर त्यात काहीं तरी अर्थ आहे. कारण एका वेळीं दोन स्त्रियावर किंवा दोन पुरुषावर एकदम प्रेम करणें पुरुषाला किंवा स्त्रीला बहुधा अशक्य असतें, आणि शक्य असलें तरी तसली भानगड अनर्थावह होते. पण एकनिष्ठ प्रेमाचा वेळीं अवेळीं ' उदो ' ' उदो ' करणाऱ्यांच्या एकनिष्ठतेच्या कल्पना कांहीं और आहेत! त्यांचें म्हणणें असें, कीं स्त्रीपुरुषांमधलें प्रेम नाहींसें झालें किंवा कांहीं कारणामुळें तीं दोघें एकमेकांना पारखीं झालीं तर त्यांनीं यावज्जीव दुसऱ्या एखाद्या व्यक्तीवर पुन्हा प्रेम म्हणून करूं नये! उदात्त एकनिष्ठता म्हणजे हृदयाला झालेली जखम कधींहि भरूं न देतां ती तशीच वाहात राहण्याची सदा

सर्वकाळ खटपट करीत राहणें ! असल्या रोगट मनोवृत्तींनाच जर अलौकिक एकनिष्ठता म्हणावयाचें असेल, तर त्यापेक्षां आरोग्यदायक अशी रंगेल चंचलता शतपटीनें बरी, असें माझें प्रांजळ मत आहे !

पण कवींनीं आणि कादंबरीकारांनीं हृदयाच्या जखमा अश्रुसिंचनानें जन्मभर ओल्या ठेवणाऱ्या रोगी रडतराउतानाच नायक करून घोड्यावर बसविल्यामुळें एकनिष्ठतेच्या या खोट्या कल्पनाचा फार फैलाव झाला आहे. खरें पाहूं गेल्यास प्रेमभंगामुळें हृदय भग्न झालें तर तें जन्मभर तसेंच ठेवण्यात मोठेपणा कसला ? प्रेमात पडणें, ही एक नैसर्गिक सहजप्रवृत्ति आहे. त्याचप्रमाणें प्रेमभंग होणें, ही एक नैसर्गिक आपत्ति आहे. त्या आपत्तींत लोळत राहण्याचा आग्रह धरणें म्हणजे ताप आलेल्या माणसानें तापातच राहण्याची खटपट करण्यासारखें आहे ! त्यात मोठेपणा तर कांहीं नाहींच नाहीं; पण उलट तें एक शरीरविकृतीचें लक्षण आहे. नैसर्गिक आपत्तींवर विजय मिळविणें यातच मनुष्याचा मनुष्यपणा आहे. मानवी सुधारणेचा इतिहास म्हणजे काय, असें जर मला कुणीं विचारलें, तर "मानवी सुधारणेचा इतिहास म्हणजे मानवानें निसर्गावर एकामागून एक मिळविलेल्या अभिमानास्पद विजयाचा माला", हेंच उत्तर मी त्याला देईन.

आणि म्हणूनच प्रेमात '**पडण्याच्या**' मी विरुद्ध आहें. मानवी मनाचा आता इतका विकास झाला आहे कीं, त्याला आता बावळटासारखा प्रेमांत 'पडण्याचा' प्रसंग खास येऊं नये. प्रेम ही एक मानवी जीवनाला आवश्यक वस्तु आहे, हें एकदा निश्चित झालें, आणि निष्प्रेम आयुष्य कंठणें हें अशक्य आहे, आणि शक्य असलें तरी तें अनैसर्गिक अतएव चागलें नाहीं, याची एकदां खात्री झाल्यावर, ही गोष्ट व्यवस्थितपणें आणि कमी त्रासांत कशी करतां येईल या उद्योगाला लागणें, हें मनुष्याचें कर्तव्य होय. म्हणूनच मी म्हणतों, प्रेमात 'पडूं' नये, प्रेम करावें ! माझ्या म्हणण्याचा अर्थ इतकाच, कीं 'पडणें' ही नामुष्कीची गोष्ट आहे. एखादी गोष्ट डोळे उघडे ठेवून जाणून-बुजून करणें, यांतच प्राणिश्रेष्ठ मानवाचा मर्दपणा आहे. एखादा मनुष्य खड्डयांत पडला तर त्याची नुसती फजिती होते, इतकेंच नव्हे तर सर्वच शरीर ठेंचाळून त्याला दुःखहि होतें. पण तेंच त्यानें एखाद्या कितीहि खोल खड्डयांत जाणून-बुजून, तयारी करून जर उडी मारली तर त्याला लागत तर

नाहींच, पण उलट त्याचा आत्मविश्वास वाढतो. प्रेम ही एक नैसर्गिक आवश्यक गोष्ट आहे, याचें संपूर्ण ज्ञान झाल्यावर यापुढें माणसांनीं डोळे बंद करून प्रेमांत 'पडावें' कां !

प्रेम आंधळें आहे ही जुनाट कल्पना आता फेकून देण्याची वेळ आली आहे, असें मला वाटतें. आणि आंधळें होऊन असहायपणें प्रेमांत 'पडण्या'पेक्षां अगदीं डोळसपणें आपला जोडीदार अगर जोडीदारीण पाहून त्याच्यावर अगर तिच्यावर ज्या दिवसापासून हिंमतपूर्वक मानवप्राणी प्रेम करावयाला लागेल, त्या दिवशीं तो निसर्गावर आणखी एक विजय मिळवील आणि मानवी सुधारणेची आणखी एक विजयपताका फडकवील, यांत शंका नाहीं.



५९

## " कांहींतरी... "

माझ्या ओळखीचे एक वृद्ध गृहस्थ आहेत. त्यांना जर कधीं आपण सहज विचारलें, " काय हो, काय चाललं आहे अलीकडे ? " तर त्याचें या प्रश्नाला उत्तर ठरलेलें आहे, " काहीं नाहीं. करतों आहें कांहींतरी. " आणि या कांहींतरीचा तुम्हाला कधींच उलगडा होत नाहीं. या गृहस्थांचें हें नेहमींचेंच आहे. पण त्यात त्याना आपण विशेष हंसण्यासारखें काहीं आहे, असें मला वाटत नाहीं. आपणापैकीं बहुतेक जण कितीतरी वेळा अशींच उत्तरें देतात. एकदा तर गणूकाकांशीं या ' काहींतरी ' वरून माझें कडाक्याचें भांडण झालें.

कुणातरी प्रख्यात राजकीय पुढाऱ्याच्या कार्यक्रमावर मीं सडकून टीका केली, आणि त्याला खूप शिव्या हांसडल्या. गणूकाका पडले त्या देशभक्ताचे परमभक्त. संतापून त्यानीं माझ्यावर उलट हल्ला चढविला.

" त्यांच्या कार्यक्रमात असतील दोष. पण तुम्ही कांहींच करीत नाहीं त्यापेक्षा तर तो ' काहींतरी ' करतो आहे देशासाठीं. " गणूकाका ओरडले '

" खरं आहे, " मी म्हणालों, " आम्ही देशाचं बरं वाईट कांहींच करीत नाहीं. तो काहींतरी म्हणजे थोडं कां होईना, पण देशाचं नुकसान करतो आहे ! काहींच न करण्यापेक्षां नुकसान केलेलं काय वाईट, असंच का नाहीं, काका ? "

या ' कांहींतरी 'ची मला फार चीड येते. एखाद्या गोष्टीची नीटशी स्पष्ट कल्पना नसली, डोक्यांत कसला तरी घोटाळा उडालेला असला, कीं तो घोटाळा लपविण्याकरितां या ' कांहींतरी 'चा ढालेसारखा उपयोग करण्यांत

येतो, असें मला वाटतें. पुष्कळ लोक माझ्याकडे केव्हां केव्हां लेख मागावयाला येतात. साहजिकच मी त्याना पहिला प्रश्न असा विचारतों, "कोणत्या विषयावर लेख पाहिजे बुवा तुम्हांला ?"

ते मोठया गंभीरपणाचा आव आणून शांतपणानें मला उत्तर देतात, "तसं काहीं नाहीं. 'कांहींतरी' लेख द्या तुम्ही लिहून!"

स्वतःला काय पाहिजे हें याना स्वतःलाच जर माहीत नसतें, तर लेख जमविण्याच्या आणि ते छापण्याच्या भानगडींत हे लोक पडतात तरी कशाला ? स्वतःच्या डोक्यांतला गोंधळ झाकण्याकरिता या 'कांहींतरी'चा उपयोग केला, तर मी म्हणतों तें एक वेळ क्षम्य आहे, पण काहीं लोक स्वतःचा गोंधळ लपवून वर आणखी दुसरा मनुष्य गोंधळलेला गद्धा आहे हें सिद्ध करण्याकरिता जेव्हां या 'काहींतरी'चा उपयोग करतात, तेव्हा मात्र मला मनुष्यस्वभावाचा मोठा अचंबा वाटतो.

आमच्या गणूकाकाचा मुलगा बरेच दिवस नोकरीशिवाय घरीं रिकामा बसलेला आहे. काहींना कांहीं काढून गणूकाका त्याच्यावर नेहमीं रागवतात. एकदां अगदीं त्रासून गणूकाका मला सांगूं लागले, "काय बावळट पोरगा आहे हा! मी त्याला सांगतों आहें, अरे 'काहींतरी' उद्योग कर. पण म्हणतो, काहीं सुचतच नाहीं. आता काय करावं याला ?"

"तुमचं म्हणण काय ? त्यानें काय उद्योग करावा ?" मी म्हणालों.

"अरे, अमुकच कर असं मी तरी कुठें म्हणतोंय! माझं म्हणणं एवढंच कीं स्वस्थ बसण्यापेक्षां आपलं 'काहींतरी' करावं!"

मला हंसू आवरेना. त्याला कांहीं सुचत नाहीं म्हणून काका त्याला बावळट म्हणत होते. आणि त्यानें काय करावें म्हणून मीं विचारतां त्यानें 'कांहींतरी' करावें असें मोठ्या पोक्तपणानें काका मला बेधडक सागत होते. माझ्या मतें 'कांहींतरी' ही मनुष्याच्या हतबुद्धतेची फडकणारी पताका आहे. हंसू येतें तें मनुष्य ही पताका विजयपताका म्हणून खाद्यावर घेऊन मिरवतो त्याचें. आणि आतां अगदीं माझी स्वतःची 'अंदर की बात' सागायची म्हणजे आज जेव्हां मला लिहावयाला कांहींच सुचेना तेव्हां मीं विचार केला, कीं या 'काहींतरी'च्या सोयिस्कर पांघरुणाखालीं आपण आपली हतबुद्धता खुशाल झांकावी!

● ● ●

६०

## धांवती गाडी

परवाच एक दूरचा आगगाडीचा प्रवास करून मी परत आलों. त्या प्रवासातल्या एका गमतीची आठवण झाली की मला अजूनही हंसू कोसळतें. गाडी स्टेशनांत उभी असता एक म्हातारे गृहस्थ आपला प्रातर्विधी उरकण्याकरिता गाडींतल्याच शौचकूपात गेले होते. ते शौचकूपातून बाहेर यायला आणि भोंगा वाजून गाडी स्टेशनच्या बाहेर हालायला एकच गाठ पडली. कपडे सावरता सावरता गाडी सुटलेली पाहून एकदम मोठ्या सुटकेचा श्वास टाकून ते गृहस्थ आजूबाजूच्या लोकाकडे पाहून शहाणपणानें म्हणाले, 'वेळेवरच बाहेर आलों म्हणायचा! नाहींतर मी आपला आंत राह्यलों असतों, आणि गाडी सुटून गेली असती!'

त्याचे हे उद्गार ऐकून सर्व मंडळी पोट धरून हंसूं लागली. जेव्हा त्यांच्या ध्यानात आलें, की आपण गाडींतल्याच शौचकूपांत गेलों होतों आणि गाडी सुटली असती तरी आपण गाडींतच राहिलों असतों, तेव्हां तेही आमच्याबरोबर हंसूं लागले!

चालत्या गाडीच्या शौचकूपातून बाहेर आल्याबरोबर सुटल्यासारखें वाटणें ही गोष्ट हास्यास्पद तर खरीच; पण अशा हास्यास्पद गोष्टी आपण थोड्या का करतों? तत्त्वज्ञानाचा आव आणून आपण या गोष्टी जरा मोठ्या प्रमाणावर

करतों इतकेंच; आणि मग मात्र आपणाला त्या हास्यास्पद वाटत नाहींत. जगाचा काहीं कारणानें कंटाळा आला म्हणजे कांहीं लोक 'कंटाळलों बुवा ह्या जगाला; आपण कुठं तरी दूर निघून जाणार !' असें म्हणून खरोखरच कुठें तरी दूर निघून जातात. ते फक्त एवढेंच विसरतात, कीं आपण कितीही दूर निघून गेलों तरी जगांतच असतों, आणि जे व्याप चुकवण्याकरिता आपण जगातून दूर निघून जातों ते व्याप जगात आपण कुठेंही गेलों तरी मागें लागतातच. माझ्या ओळखीच्या एका गृहस्थाचें असेंच झालें. हिंदुस्थानात प्रेमभंग झाल्यामुळें तो अगदीं मनापासून विटला, आणि स्त्रीचें पुन्हा नाव नको असा निश्चय करून सापडली ती नोकरी धरून आफ्रिकेला निघून गेला. थोड्याच दिवसांनीं मला बातमी मिळाली कीं तिकडल्या ऑफिसात काम करीत असलेल्या एका सुंदर टायपिस्ट मुलीशीं त्याचा विवाह झाला म्हणून ! आणि तो स्त्रीचें पुन्हा नावही घेणार नव्हता !

जीवनाच्या धकाधकींतून अशा तऱ्हेनें पळून जाण्याचा प्रयत्न करणें, म्हणजे धावत्या गाडींतल्या मागल्या डब्यात बसलेल्या माणसानें गाडींतून सुटून जाण्याकरिता पळत पळत पुढल्या डब्यात जाण्यासारखें आहे !

धावत्या गाडींतून अजिबात सुटून जाण्याचा मार्ग म्हणजे गाडींतून बाहेर उडी टाकणें, किंवा सरळ बोलायचें म्हणजे आत्महत्या करणें. आणि जीवनाच्या धावत्या गाडींतून सुटून जाण्याकरिता बरेच लोक हा आततायी मार्ग स्वीकारतातही. हा मार्ग आततायीपणाचा असेल, फार काय, तो भ्याडपणाचाही असेल; पण चालत्या गाडींतून सुटून जाण्याचा तो एकमेव मार्ग आहे यात मात्र शंका नाहीं. या लोकांवर भ्याडपणाचा किंवा आततायीपणाचा आरोप करतां येईल. पण मागल्या डब्यांतून पुढल्या डब्यात जाऊन, किंवा जगाच्या एका भागांतून दूर कुठेंतरी दुसऱ्या भागांत जाऊन 'सुटलों' म्हणून स्वतःची फसवणूक करून घेणाऱ्या हास्यास्पद लोकांप्रमाणें वेडगळपणाचा आरोप मात्र त्याच्यावर मुळींच करतां येणार नाहीं. आपला मार्ग अचूक पाहण्याची कुशाग्र बुद्धि आणि तीक्ष्ण दृष्टि त्याच्याजवळ असते खास.

आणि मानवी जीवन धांवत्या गाडीसारखेंच आहे, नाहीं तर काय ? या गाडींतले आम्ही प्रवासी एकमेकापेक्षां स्वतःला मोटे समजतों, आणि मनांत

मोठी ईर्ष्या धरून मागल्या डब्यातून पुढल्या डब्याकडे पळत पळत एकमेकाच्या पुढें जाण्याचा प्रयत्न करतों ! पुढें गेलेला स्वतःला मोठा वीर समजतो, आणि मागल्याकडे पाहून तुच्छतेनें हंसतो ! पण आपण सर्वजण एकाच गाडींतून चाललों आहोंत आणि ही गाडी कुठें चालली आहे हें कुणालाच माहीत नाहीं याची या वीराला यत्किंचितही जाणीव नसते ! हे असे काहींतरी विचार मनात आले कीं मला अगदीं उदासवाणें वाटतें, आणि मी निराशावादी होतों. खरंच, हे विचार मनात येऊं देता कामा नयेत. पण अशा विचारांना टाळण्याचा प्रयत्न करणें म्हणजेसुद्धा तिकीट इन्स्पेक्टरला चुकविण्याकरिता चालत्या गाडींतल्या एका डब्यातून दुसऱ्या डब्यांत जाऊन बसण्यासारखें आहे हें मी विसरलोंच !



## ६१

## एक आणि एक तीन !

त्या दिवशीं स्वतःवर आणि यच्चयावत् जगावर मी अगदीं खूश होतों. सर्व गोष्टी माझ्या मनासारख्या झाल्या होत्या, आणि जगात उणीव म्हणून मला कसली भासत नव्हती. मला वाटतें, स्वतःशीं हंसत हंसत मी शीळसुद्धा घालीत होतों. असेन ! ट्राममध्यें बसून सकाळच्या प्रहरीं मी कुठेंतरी जात होतों. इतक्यांत दुःखीकष्टी चेहऱ्याच्या एका भिकाऱ्यानें आर्त स्वरात माझ्याकडे भीक मागितली. ताबडतोब मीं खिशात हात घातला, आणि त्या भिकाऱ्याला एक संबंध पैसा देऊन टाकला ! परोपकारी म्हणून माझी कधींच ख्याति नव्हती. पण त्या दिवशीं सकाळीं माझें मन इतक्या उदात्त वातावरणांत वावरत होतें कीं कल-लाही विसंवादी सूर म्हणून मला जगांत नको होता. तो पैसा दिल्यावर तर मला माझें मन अधिकच उंच गेल्यासारखें वाटलें. श्रीकृष्ण परमात्मा किंवा भगवान् बुद्ध यांच्या चित्रांत त्यांच्या डोक्यांभोंवतीं जसें एक तेजोवलय असतें तसलेंच तेजोवलय माझ्याही डोक्याभोंवतीं त्या क्षणीं तरळत असावें असें मला वाटलें, आणि ट्राममधले सगळे लोक सकौतुक आदरानें माझ्या डोक्याकडे पाहात असतील म्हणून हंसतमुखानें मीं आजूबाजूला पाहिलें ! मला या क्षणाला जसें वाटतें आहे तसेंच कायमचें वाटणें म्हणजे मनाचा मोठेपणा किंवा महात्मे-पणा, असें मला वाटलें. एखाद्या महात्म्याला 'तुला नेहमीं असेंच वाटतें

काय ? ' असा प्रश्न जाऊन विचारावा असाही विचार माझ्या मनात आला. पण या प्रश्नाचें उत्तर देईल तो महात्मा कसला ? स्वतःच्या मोठेपणाची जाणीव असणें हा मुळीं मोठेपणाच नव्हे !

सामान्य माणसें आणि मोठीं माणसें यांतला फरक हाच कीं आमच्या मनात केव्हांतरी चुकून असे क्षण उद्भवतात, आणि मोठ्या माणसांचीं मनें चोवीस तास या उंच पातळीवर तरळत असतात ! मीं मनाशीं निश्चय केला, कीं बस्स, आतां या क्षणाला माझें मन ज्या उदात्त भूमिकेवर आहे तिच्यावरून त्याला खालीं म्हणून येऊं द्यायचें नाहीं. मला वाटतें, माझ्या डोक्याभोंवतालचें तें तेजोवलय या क्षणाला अधिकच उजळलें असावें ! इतक्यांत ट्रामचा कंडक्टर तिकीट मागायला आला, आणि तिकिटाकरितां त्याला मीं दिलेला आणा थोडा गुळगुळीत आहे म्हणून माझ्याशीं हुज्जत घालूं लागला. मीं चिडून खूप वाद-विवाद केला, पण तो दाडगट माणूस दुसरा आणा घेतल्याशिवाय तेथून हालेना. शेवटीं मनातून असंख्य शिव्या मोजीत मीं त्याला दुसरा आणा दिला. तें तेजोवलय, तें उदात्त वातावरण पार पळालें होतें ! क्षुद्र बाजारी वृत्तींनीं माझें मन भरून गेलें होतें. एक आणा फुकट गेला म्हणून माझा जीव बेचैन झाला होता. आपला उदात्त निश्चय एका क्षणात खालीं कोसळलेला पाहून मला आश्चर्य वाटलें; आणि माझें मलाच हंसू आलें. तेव्हापासून मीं निश्चय केला, कीं कसला निश्चय म्हणून करायचा नाहीं ! आपणाला कांहीं महात्मा होणें शक्य नाहीं !

आम्ही सारे आयुष्याचें वेळापत्रक तयार करतों. पण आमच्या स्वतःच्या मनाचासुद्धा आम्हाला थाग नसतो ! आणि त्या वेळापत्रकाचा असा हा विचका होतो ! मानवानें आतांपर्यंत निसर्गावर अनेक विजय मिळविले आहेत. पण त्याच्या स्वतःच्या मनोविश्वात आणि बाहेरल्या भौतिक विश्वात इतक्या अज्ञात पण प्रभावशाली अशा शक्ति अजूनही वावरत आहेत, कीं त्यानें मोठ्या काळजी-पूर्वक रचलेले निश्चयाच्या पत्त्यांचे बंगले त्या एका फुंकरीनें ढासळून टाकतात ! यावर मला कुणी म्हणेल, कीं स्वतःच्या असहाय्यतेची इतक्या तीव्रतेनें जाणीव करून देणाऱ्या तुमच्या या दैववादी तत्त्वज्ञानाप्रमाणें माणसें जर चालायला लागलीं, तर जगांत कांहीं करायलाच नको. कुठल्या क्षणाला मृत्यु येईल याचा

नेम नसल्यामुळें उद्या काय करायचें तेंसुद्धां माणसानें ठरवूं नये कीं काय? किंवा अचानकपणें धरणीकंप होतो म्हणून कुणीं घरेंच बांधूं नयेत कीं काय? या आरोपांचा मी जोरानें इन्कार करतों. माझें असें मुळींच म्हणणें नाहीं, कीं 'होणारें न चुकेल होइल जरी ब्रह्मा तया आडवा' या महामंत्राचा जप करीत माणसानें कांहीं न करता भवितव्याची वाट पाहात स्वस्थ बसावें. आणि माझ्या-सारख्यानें कितीही सांगितलें तरी मनुष्यप्राणी असला उपदेश थोडाच ऐकणार आहे? तसें असतें तर मानवजातीची आतांपर्यंत झाली आहे ही प्रगति झालीच नसती. मनुष्य जंगलात उड्या मारणारा माकडच राहिला असता!

माझें म्हणणें इतकेंच कीं उथळ उत्साहाच्या आहारीं जाऊन आपण स्वतः-विषयीं आणि जगाविषयीं भलत्याच अपेक्षा करतों — कांहींतरी अवास्तव निश्चय करून आंखीव आडाखे बाधतों. आणि एक नी एक दोन, बे दुणे चार या गणिती नियमानीं बाधलेले जीवनासंबंधाचे आमचे आडाखे खरे झाले नाहींत, कीं मग तोंड कडू करून आम्ही भयंकर निराशावादी होतों. अशा तऱ्हेच्या उथळ उत्साहानें वाहवणारा माणूस पहिल्यादा जितका कट्टा कर्मयोगी असतो तितकाच नंतर दुबळा दैववादी होतो. अज्ञात शक्तीसमोर असहाय्य होणाऱ्या मानवाच्या मी ज्या गोष्टी सागतों तो या उथळ उत्साहाला ताळ्यावर आणण्याकरिता — क्रियेची प्रतिक्रिया होऊन माणूस दुबळा दैववादी होऊं नये म्हणून. आपल्या अंतिम असहाय्यतेची जाणीव ठेवून काम करणारा माणूसच खरा कर्मयोगी होतो. कारण त्याची निराशा कधींच होत नाहीं! गणितशास्त्राच्या निर्जीव नियमानीं निश्चयाचे मनोरे बाधण्यांत काय हंशील? गणितात एक आणि एक मिळून दोन होत असतील, तर जीवनांत एक आणि एक मिळून तीन होतात!

● ● ●

# ६२

## सद्गुणांचा अतिरेक

गणूकाकाच्या त्या वागणुकीचा मला अर्थच समजेना. चागले अर्धा-पाऊण तास माझ्याबरोबर मोठ्या मजेंत बोलत बसले होते आणि उठून जाताना ते असें काय करतात याचा मला उलगडा होईना. ' जातों ' म्हणून सागून ते बाहेर पडले. मीही त्यांना पोंचवायला गॅलरीपर्यंत गेलों. बाहेर दाडीवर वाळत असलेल्या माझ्या कपड्याकडे त्याचें सहज लक्ष गेलें, आणि एकदम रागीट चेहरा करून त्यानीं त्यातले एक-दोन टॉवेल्स नी सदरे ओढून घेतले आणि ते काखेंत मारून तडक चालायला लागले !

' अहो गणूकाका, माझे कपडे काय म्हणून पळवता ? ' मी ओरडलों.

' पळवतों काय ? तूं चोरी करून नेतोस त्यापेक्षा मी तुझ्या डोळ्यासमोर नेतोंय् तें काहीं वाईट नाहीं. माझ्या वस्तूबरोबर तुझ्याही एक-दोन नेल्याशिवाय तूं वठणीवर यायचा नाहींस ! ' माझ्यावर एकदम उलटून काका म्हणाले.

' म्हणजे ! ' मी स्तंभित होऊन उद्गारलों, ' काय, झालं काय ? '

' झालं काय ? त्या दिवशीं पुण्याला आमच्याकडे येऊन उतरलास आणि जाताना आपल्या कपड्याबरोबर माझाही एक टॉवेल गुंडाळून नेलास ! अरे, चागला वाटला तर मागून न्यायचा. अशी चोरी का ? '

काकांचे हे शब्द ऐकून तो सर्व प्रकार माझ्या ध्यानात आला. तें असें झालें. स्वतःला लागलेल्या काहीं वाईट संवयी घालवून द्यायचा मी प्रामाणिकपणें प्रयत्न करीत होतों. पण तें हें असें उलटेंच गळ्यांत आलें.

काहीं दिवसांपूर्वी गणूकाका पुण्याला जाऊन महिना पंधरा दिवस राहिले होते. मध्यें एकदा रजा होती म्हणून दोन-तीन दिवस मी त्यांच्याकडे जाऊन राहिलों होतों. कुठेंही गेलों कीं परत येताना काही तरी वस्तु मागें विसरून यायची मला फार वाईट संवय आहे. ती घालवून द्यायचा मी अलीकडे जोरानें प्रयत्न करतों आहें. पुण्याहून परत यायला निघताना माझ्या कपड्याची जेव्हां मी आवराआवर करावयाला लागलों, तेव्हा साधारणपणें माझ्या टॉवेलसारखाच दिसणारा एक टॉवेल माझ्या कपड्यांतून जास्त येतो आहे, असा जबरदस्त संशय मला येत होता. पण शहाणपणानें मी असा विचार केला, कीं एक वेळ दुसऱ्याची एखादी वस्तु आपल्याबरोबर जास्त आली तरी चालेल, पण नेहमींप्रमाणें स्वतःची विसरायला तरी नको! हो, पुढें नक्की खात्री झाली तर दुसऱ्यांची वस्तु परत देता येईल. स्वतःची विसरभोळेपणाची संवय घालविण्याच्या भरात वरीलप्रमाणें मीं मोठा शहाणपणा केला खरा, पण त्याहीपेक्षां भयंकर अशी चोरीची वाईट संवय लावून घेतली!

छे छे! मला वाटतें माणसाला लहानसहान दुर्गुण जरूर असावेत. सद्गुणांचा-सुद्धा अतिरेक चागला नव्हे. फार सद्गुणी व्हायचा प्रयत्न केला कीं माझें जसें झालें त्याप्रमाणें एखादा लहानसा दुर्गुण जायचा, पण त्याहीपेक्षां मोठा दुर्गुण अंगीं जडायचा! माझ्या एका मित्राची अशीच गम्मत झाली. त्याला विडी ओढण्याची संवय होती. त्याच्या बायकोला या घाणेरड्या संवयीचा अतिशय राग येई, आणि दोघांचें कडाक्याचें भाडण होई. शेवटीं तडजोड होऊन विडी सोडून दिल्यास तपकीर ओढण्याची परवानगी त्याच्या बायकोनें त्याला दिली. काहीं दिवसांनीं नासिकारसानें बरबटलेले टॉवेल्स आणि तपकिरीच्या पिवळ्या डागांनीं डागाळलेले सदरे याची साऱ्या घरात इतकी घाण झाली, कीं 'विडी ओढा पण तपकीर सोडा' म्हणून त्याची बायको त्याचे पाय धरून विनवूं लागली!

म्हणूनच मी म्हणतों, कीं फार सद्गुणी होण्यांत अर्थ नाहीं. मला तर अतिसद्गुणी माणसांची भीतिच वाटते. मी त्याच्यापुढें भीतियुक्त आदरानें मान लववीन, पण अंतर्यामींच्या उमाळ्यानें त्यांच्याविषयीं मला प्रेम वाटणार नाहीं. खंबीरपणा आणि दुबळेपणा, सद्गुण आणि दुर्गुण यांचें काटेतोल मिश्रण म्हणजेच मला वाटतें, माणुसकी!

● ● ●

## ६३

### दोनपदरी गोफ !

गणूकाकांच्या त्या प्रश्नांना उत्तरें देणें खरोखरच कठीण होतें. मी म्हणत होतों, कीं इतिहासाच्या सुरुवातीपासून आतापर्यंत अडखळत का होईना, पण जगाची सारखी प्रगति होते आहे — जग सुधारत आहे. गणूकाकाच्या मतें जगाची सारखी परागति होते आहे — जग दिवसेंदिवस वाईट होत चाललें आहे. आणि माझ्या युक्तिवादाला त्यांनीं दिलेलीं उत्तरेंही समर्पक होतीं. मी म्हणालों, ‘ ज्या वेळीं क्षुधाशमनासारखी मामुली गोष्ट करण्यासाठीं मानवप्राणी दिवसरात्र हिंस्र श्वापदाशीं झुंज करून चार कंदमुळं मिळवीत होता, झाडाच्या सालींनीं आपल्या अब्रूचं रक्षण करीत होता, आणि एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं जाण्याकरिता कित्येक दिवस पायानीं रखडत होता, त्या वेळच्या माणसापेक्षां वाटेल तेव्हां वाटेल तिथ बसून चहा-कॉफी पिणारा, तलम रेशमी वस्त्रं परिधान करणारा आणि हजारों मैलांचं अंतर हां हां म्हणता ओलांडून जाणारा आजचा मानव अधिक पुढं गेलेला — सुधारलेला — तुम्हांला वाटत नाहीं काय ? इतकं असूनही जग दिवसेंदिवस मागं जातं आहे — वाईट होतं आहे, असंच तुम्हांला वाटतं ? ’

माझें म्हणणें पुरें करूं देण्याइतकासुद्धा गणूकाकाना धीर नव्हता. मी थांबलों मात्र, आणि गणूकाकांनीं आपली सरबत्ती सुरू केली, ‘ तुझं म्हणणं सगळं

ठीक आहे,' ते म्हणाले, 'पण सर्व प्रगतीचा—सुधारणेचा हेतु काय? माणसाचं सुख हाच ना? तुझ्या सुधारणेबरोबर माणसांचीं दुःखंही शतपटीनं वाढलीं आहेत. पूर्वी आगगाड्या आणि मोटारी नव्हत्या, पण त्यामुळं माणूस अधिक सुखी होता. तुमच्या मोटारींनीं तुम्ही हा हा म्हणता इकडून तिकडे जाता खरे, पण तुझ्या मुंबई शहरातच रोज शेंकडों माणसं मोटारखालीं सापडून मरतात! पूर्वींचीं माणसं कंदमुळावर भूक भागवीत होतीं आणि वल्कलानीं अब्रू झाकीत होतीं हें खरं आहे; पण चहा आणि कॉफी यथेच्छ पिऊन नतर अमक्याचं फ्रूट-सॉल्ट आणि तमक्याच्या लिव्हर-पिल्स घेत डॉक्टराचे उंबरठे झिजविणाऱ्या तुम्हा लोकांपेक्षा तीं सुखी होतीं खास!'

सुखाचीच कसोटी सुधारणेला लावावयाची—आणि तीच लावणें योग्य आहे—तर काकाच्या या भडिमारानें मी थोडा वेळ सर्द झालों हें कबूल केलेंच पाहिजे. पण थोडा वेळच. तेव्हा मोटारी आणि यांत्रिक सुधारणा नसल्यामुळें अपघात होत नव्हते आणि म्हणून त्या वेळचे लोक सुखी होते, आणि आज यांत्रिक सुधारणेच्या काळात शेंकडों लोक हरघडी मोटारखालीं सापडून चिरडले जातात म्हणून आजचे लोक दुःखी आहेत, हें म्हणणें प्रतिपक्षाला क्षणभर निरुत्तर करून टाकणारें असलें, तरी नुसत्या गणिती हिशेबानेंसुद्धा तें अजिबात फोल आहे हें दाखवून देता येईल. फार काय, पण त्या वेळच्या सुखदुःखाची वजाबाकी करून उरलेल्या सुखापेक्षा आजच्या सुखातून दुःख वजा जाता उरलेलें सुख कदाचित् काकणभर अधिकच भरेल हेंही सिद्ध करणें कठीण नाहीं. त्या वेळीं मोटारींचे अपघात नव्हते, पण हिंस्र श्वापदानीं गजबजलेल्या मार्गांनीं एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं जाताना किंवा नुसती रोजची भूक भागविण्याकरिता भयंकर जंगलातून कंदमुळें धुंडाळताना किती माणसें मृत्युमुखीं पडत होतीं असतील! आणि कंदमुळावर राहिल्यामुळें त्याना लिव्हर-पिल्स किंवा फ्रूट-सॉल्टची जरूर भासत नव्हती असेल. पण जर का एखादी विकृति शरीरात उद्भवली तर योग्य औषधांच्या किंवा शस्त्रक्रियेच्या अभावीं किती लोक असह्य वेदनांनीं व्याकुळ होत प्राण सोडीत असतील!

गणूकाकाना गप्प करायला हा आकडेवारी हिशेब खूप झाला, पण माझें स्वतःचेंच त्यानें तितकेंसें समाधान होत नाहीं. टोपलींतल्या आंब्यांप्रमाणें किंवा

गोणींतल्या तादळाप्रमाणें सुखदुःखाचें मोजमाप थोडेंच करतां येतें! मग उगाच वजाबाक्या करण्यात अर्थ काय? मानवी सुधारणेच्या इतिहासांत सुखा-बरोबर दुःखाची वाढ झाली आहे हें कबूल; पण गणूकाकासारख्यांचें तोंड बंद करायचें म्हणजे, त्याच्या म्हणण्याचा अर्थ खरा आहे असें धरून चालल्यास त्यापासून अनर्थ कसा होतो हें दाखवून देऊन. सुखाबरोबर दुःखें वाढलीं म्हणून सुधारणेला जर कुधारणा म्हणून हंसायचें, किंवा प्रगतीची परागति म्हणून हेटाळणी करावयाची; तर डोंगरमाथ्यावरून उषःकाल पाहणाऱ्या माणसाची खालीं पायथ्याकडे काळोखात उभ्या राहिलेल्या माणसानें कींव करायला हरकत नाहीं! तो मनुष्य अभिमानानें म्हणू शकेल, कीं 'या डोंगरमाथ्यावरल्या माण-साचा पाय घसरला तर खालीं कोसळून त्याला किती भयंकर मृत्यु येण्याचा संभव आहे! मला तसली काहींच भीति नाहीं — मी खबीर जमिनीवर उभा आहें!' किंवा क्लिओपात्रासारख्या त्रैलोक्यसुंदरीच्या प्रेमाची माधुरी चाखून भग्नहृदय झालेल्या सीझरसारख्या पुरुषश्रेष्ठाला एखादा सामान्य कारकूनसुद्धा छाती फुगवून सांगूं शकेल, कीं 'मी किती सुखी आहें पाहा! तुझ्यासारखी तळमळ आणि तडफड मला माहीतसुद्धा नाहीं; कारण प्रेम आणि प्रणय असल्या भानगडींत मी कधीं पडलोंच नाहीं!' आणि याच हिशेबानें माणसापेक्षां दगड अत्यंत सुखी ठरेल! — कारण त्याला भूक नाहीं, तहान नाहीं, रोग नाहीं कीं राई नाहीं, ताणाताण नाहीं कीं कसली यातायात नाहीं, कसला लढा नाहीं कीं झगडा नाहीं!

सुखाच्या कल्पना करताना आम्ही विसरतों तें हेंच, की जीवन म्हणजे झगडा. जीवन म्हणजे काहीं सारखी लांबत जाणारी एकपदरी माळ नव्हे,— जीवन म्हणजे परस्परविरुद्ध प्रवृत्तींचा ना आदि ना अंत असा दोनपदरी गोफ! प्रगत जीवन — मोठें जीवन म्हणजे लढा — तीव्र झगडा. मोठया लढ्यांत जखमा मोठ्याच होणार. पण या लढ्यातला विजयही मोठा. आणि त्या विजयाचें सुखही मोठेंच नाहीं काय? पूर्वीच्या मानवापेक्षां आम्हां आजच्या मानवाना मोठया दुःखाशीं लढण्याचा मोठा मान मिळाला आहे. झालें तर. हीच आमची प्रगति!

● ● ●

## ६४

## डोंबाऱ्यांचा खेळ !

हें असें कां होतें तेंच मला कळत नाहीं. या लेखाचीच गोष्ट घ्या ना. सकाळींच लिहून टाकीन म्हणत होतों, पण अजूनपर्यंत लिहिण्याची सुरुवातच करवेना. सकाळीं लिहायला टेबलाकडे गेलों तों समोरच्या आरशात स्वतःचा चेहरा दिसला, आणि डोक्यावरले केंस फारच वाढले आहेत असें दिसून आलें. छे, केंस कापून घेतलेच पाहिजेत. ताबडतोब कोट चढवून बाहेर गेलों आणि तास दीड तासानें केंस कापून घेऊन परत आलों. आता लिहिण्यास बसायला कांहींच हरकत नव्हती.

इतक्यांत एक-दोन मित्र आले. ' तुझं कांहीं काम असलं तर आम्ही परत जातों. पुन्हा येऊं उद्यां-परवा. तसं आमचं विशेष काहींच काम नाहीं. ' ते म्हणाले.

' बसा रे, थोडा वेळ. मला थोडंस लिहायचं आहे. टाकीन लिहून नंतर ', असें म्हणून मीं त्यांना बसवून घेतलें. सौजन्याचे सर्व नियम मला त्या वेळीं आठवले ! खरें म्हटलें तर मी त्यांना ' जा ' म्हणून सांगितलें असतें तर त्यांना मुळींच वाईट वाटलें नसतें. पण दारावर आलेल्यांना परत कसें घालवायाचें, असा मोठा पोक्त सल्ला माझ्या तक्रारी मनाला मीं दिला. ते जाईपर्यंत दहा-अकरा वाजले होते.

आता आघोळ करून जेवावें आणि नंतरच शातपणें लिहीत बसावें असा शहाणपणाचा विचार मीं केला आणि स्नानभोजनादिकाच्या उद्योगाला लागलों. जेवण झाल्यावर डोळ्यावर थोडी गुंगी आली. तेव्हा आळसटपणें लिहिल्यास नीटसें लिहून होत नाहीं असें म्हणून फार नाहीं, थोडाच वेळ झोंपण्याचा — किंवा जरा पडण्याचा म्हणा, विचार केला. अर्धा-पाऊण तास चागली झोंप घेतली, आणि ताजातवाना होऊन उठलों.

दुपारचा एक वाजला होता. आता लिहिलेंच पाहिजे. कागद, पेन्सिली, चाकू वगैरे सर्व साहित्य टेबलावर जमा केलें. इतक्यात आठवण झाली, कीं आतां दुपार झाली आहे तेव्हा चहा घेऊनच लिहायला बसावें. हो, म्हणजे लिहायला-सुद्धा चागला जोर येईल, आणि लिहितां लिहिता मध्येंच चहाकरिता उठायला नको. अगदीं मनापासून ही कल्पना मला पटली ! ताबडतोब स्टोव्ह पेटवला आणि चांगला एक-दोन कप चहा करून गरम गरम प्यायलों. आता मात्र लिहिण्याखेरीज गत्यंतर नव्हतें. मला वाटतें, मीं खूप डोकें खाजवून पाहिलें; पण काहीं सबब उरलीच नव्हती ! शेवटीं मनाचा धडा करून पेन्सिल हातांत घेतली, आणि लिहायला बसलों !

राहून राहून माझ्या मनात विचार येतो तो हाच, कीं स्वतःची ही फसवणूक कशासाठीं ? स्वतःच्याच मनाशीं हा इतका अटीतटीचा झगडा का ? ' लिहा ' म्हणून आमच्या मानेवर कुणींच गोणी ठेवलेल्या नाहींत. बरें, हें लिहिण्यापासून तसे काहीं पैसे मिळायचे आहेत, किंवा स्वतःचा फायदा व्हायचा आहे असेंही नाहीं. मग ही धडपड का ? तें काहींही असो; असें होतें खरें. एक प्रवृत्ति मनाला म्हणते, ' बस स्वस्थ, घे विश्रांति, हवी कशाला धडपड लिहिण्याची नी खरडण्याची ! ' दुसरी प्रवृत्ति दुसऱ्या बाजूला ओढते आणि सागते, ' लिही, काम कर, कांहींतरी करून दाखव ! '

प्रवृत्ति-निवृत्तीच्या या रस्सीखेंचींत मनाची त्रेधातिरपीट उडते, आणि केव्हां केव्हां जीव बेजार होतो.

पण या रस्सीखेंचींत स्वतःचे पाय चळूं न देता ते ताठ उभे ठेवण्यांतच— या तारेवरल्या नाचांत स्वतःचा तोल ढळूं न देता तो कुशलतेनें संभाळण्यांतच — जीवनाचा जीव आणि जगण्याची मजा आहे, असें सूज्ञ म्हणतात ! तोल

सुटला कीं झालेंच. नेहमींच्या अनुभवांतली कुठलीही गोष्ट घ्या. परस्परविरुद्ध प्रवृत्तींच्या या द्वंद्वातून आपण काहीं सुटत नाहीं. झोंपून राहा, मेदोवृद्धि होऊन लठ्ठंभारती व्हाल! जाग्रणें करा, खंगत जाल नी अस्थिपंजर व्हाल! काम न करतां स्वस्थ पडून राहा — विश्रांति घ्या. ती विश्राति भयंकर वाटेल — जीव बेचैन होईल. पुरे ही विश्राति म्हणून कामाला लागा, आणि काम करून पुन्हा विश्राति घ्या — तीच विश्राति आनंददायक वाटेल. आणि ती तशीच चालू ठेवलीत कीं ती पुन्हा भयंकर वाटेल — जीव बेचैन होईल! हें रहाटगाडगें सदासर्वकाळ असेंच चालायचें — हा तारेवरला नाच अविरत असाच चालू! हेंच जगणें. हें नको असेल तर मरा! विजयी वीर तोच, कीं जो या तारेवर तोल संभाळतो! आणि ही तार तरी कसली? ती कुठून आली आणि कुठें गेली, तें कुणालाच माहीत नाहीं! कुणीतरी अवचितपणें आम्हाला या तारेवर आणून उभे करतो. मोठ्या अक्कलहुशारीनें तोल संभाळीत आम्ही पुढें जातों; आणि मग तितक्याच अवचितपणें जसे आलों तसे आम्ही नाहींसे होतों! किती सुंदर डोंबाऱ्याचा खेळ हा!



## ६५

## सामान्यांचें असामान्यत्व !

काहीं काहीं लोकाची संगत मी तास-तास, दोन-दोन तास कशी सहन करूं शकतों, याचें माझ्या एका हुशार आणि बुद्धिमान् मित्राला आश्चर्य वाटतें. परवा तर त्यानें तसें स्पष्ट बोलून दाखविलें. निळ्या-काळ्या शाईच्या पुड्या विकून उदरनिर्वाह चालविणारा एक माणूस माझ्या ओळखीचा आहे. तो केव्हा केव्हा माझ्याकडे येऊन गप्पा मारीत बसतो. परवा सकाळीं तो असाच माझ्या-कडे तासभर येऊन बसला होता. माझ्या शेजारींच राहणारा माझा हुशार आणि बुद्धिमान् मित्र तो असताना दोन-तीनदां माझ्या खोलींत डोकावून गेला. तो शाईवाला निघून गेल्यावर तो आत आला आणि मोठ्यांदा हंसून म्हणाला, ' कमाल आहे बुवा तुझी ! या शाईवाल्याच्या गप्पासुद्धा तूं तास-तास कशा सहन करूं शकतोस तें मला समजत नाहीं. भिडस्तपणाला काहीं मर्यादा असाव्या. तो आला कीं त्याला तूं ताबडतोब घालवून कां देत नाहींस ! '

' दारावर आलेल्या माणसाला तडकाफडकीं घालवून देण्याचं शौर्य तुम्हा लोकात आहे याबद्दल मला तुमचा हेवा वाटतो. ' मी म्हणालों, ' आणि माझ्यांत तितकं शौर्य नाहीं हें मी कबूल करतों. पण केवळ भिडस्तपणामुळं या लोकाना मी जवळ करतों, असं मात्र तूं समजूं नकोस. खरोखरच केव्हां केव्हा बुद्धिमान् आणि हुशार माणसांच्या संगतीपेक्षा या सामान्य लोकांचा सहवासच मला मना-पासून आवडतो ! '

या उत्तरानें माझ्या मित्राची विशेषशी खात्री पटली नाहीं. पण तो गप्प बसला, हें मात्र खरें. माझ्या या भिडस्तपणाकडे किंवा सामान्य माणसाविषयीं मला वाटणाऱ्या आपलेपणाकडे माझा हा मित्र निदान सहानुभूतीच्या दृष्टीनें तरी पाहतो. पण माझ्या ओळखीचे दुसरे एक अतिहुशार गृहस्थ आहेत, त्यांचा माझ्यावर निराळाच आरोप आहे. त्यांच्या मतें निर्बुद्ध, सामान्य लोकांचा घोळका माझ्याभोंवतीं जमवतों याचें कारण हे लोक माझे चाहते किंवा स्तुतिपाठक असतात, आणि त्यांच्यामुळें माझी अनायासें गावभर जाहिरातही होते! त्याशिवाय स्वतःची स्तुतिस्तोत्रेंही ऐकण्याचा मला आनंद मिळतो तो वेगळाच! हे गृहस्थ एक प्रथित-यश लेखक आहेत, आणि राजहंस ज्याप्रमाणें फक्त मोत्यांच्या चाऱ्यावर जगतो त्याप्रमाणें हे गृहस्थ आपला सारा फुरसतीचा वेळ बहुधा आपल्यासारख्याच निवडक बुद्धिवंतांच्या संगतीत काव्यशास्त्रविनोद करीत घालवीत असावेत — सामान्यांच्या वाऱ्यालासुद्धा ते उभे राहात नसावेत! त्याचप्रमाणें यांच्या स्तुतीचा कुणीं चुकून जरी शब्द उच्चारला तर ते कानात घट्ट दट्टे घालीत असावेत! या थोर माणसाची बरोबरी करण्याची मला मुळींच महत्त्वाकांक्षा नाहीं. स्वतःची स्तुति ऐकली कीं सर्वसाधारण माणसाच्या अंतःकरणाला गुदगुल्या होतात. आणि मलाही माझी कुणीं स्तुति केली कीं आवडते, हें मी कबूल करतों. उपरोक्त महात्म्यानासुद्धा स्वतःची स्तुति आवडत नाहीं असें नाहीं! स्वतःच्या चार ओळींबद्दल कुणीं स्तुतिपर उद्गार काढले कीं हे गृहस्थ ती बातमी गावभर स्वतःच सांगत फिरतात. मग माझ्यावर किंवा इतर कांहीं साहित्यिकावर या गृहस्थांचा असा आरोप कां? द्राक्षें आवाक्याबाहेर असलीं कीं तीं कोल्ह्याला आंबट वाटतात, त्यातला तर हा प्रकार नाहीं ना? मीं एकदां त्याना तसें म्हटलें सुद्धां.

'काय हो,' मीं म्हटलें, 'तुमच्याभोंवतीं आमच्याकडे येतात त्याप्रमाणं निर्बुद्धच काय, पण कुणीसुद्धा येत नाहींत याचा विषाद तर तुम्हाला वाटत नाहीं ना?'

त्यावर ते चिडून म्हणाले, 'तुमच्यासारखा वाटेल त्याला मी जवळ करीत नाहीं. मी फक्त बुद्धिवंतांशींच मैत्री करतों!' या कबुलीजबाबानें आमच्यापेक्षांही आपण खरे पटाईत जाहिरातबाज आहोंत हें त्यानीं नकळत पण आपोआपच कबूल केलें! कारण, बुद्धिवान् आणि प्रथितयश लोकांच्याच हातीं जाहिरातीची

अधिक साधनें असतात; आणि त्यांच्याशीं मैत्री करूनच स्वतःची जाहिरात करून घेण्याची अधिक शक्यता असते. सामान्य किंवा निर्बुद्ध लोकानीं केलेल्या स्तुतीनें किंवा जाहिरातीनें स्वतःचा फायदा होण्यापेक्षा तोटाच अधिक होतो हें समजण्याइतकी अक्कल या गृहस्थाना जितकी आहे तितकीच, किंबहुना त्यापेक्षां किंचित् अधिक मला किंवा ज्या इतर साहित्यिकावर हे गृहस्थ वरच्यासारखे आरोप करतात त्यांना खास आहे आपली जाहिरात व्हावी या हेतूनें कुणी निर्बुद्ध माणसाना जवळ करील असें मला वाटत नाहीं.

पण सुदैवानें माझ्याकडे येणाऱ्या लोकात माझी जाहिरात करूं शकतील असे सुबुद्ध किंवा निर्बुद्ध साहित्यसेवी बहुधा कुणी नसताતच मुळीं. माझ्याकडे येणारे आणि मला मनापासून आवडणारे म्हणजे त्या शाईविक्यासारखे सामान्य लोक. बुद्धिवैभवानें ते तळपत नाहींत किंवा वाङ्मयाची ते चिकित्सा करूं शकत नाहींत हें खरें आहे. पण जीवनावरल्या पुस्तकासंबंधीं बोलण्यापेक्षा ते प्रत्यक्ष जीवनासंबंधींच बोलतात, आणि म्हणूनच ते मला आवडतात. तसें बुद्धीचे महत्त्व मला कळतें; आणि माणसाला आपल्या बुद्धीचा थोडा-बहुत अहंकार असावा हेंही मला मान्य आहे. पण बुद्धीपेक्षाही खरी मानवता अंतःकरणातच दिसून येते. आणि काय असेल तें असो, ज्याप्रमाणें एखाद्याला दृष्टि नसली म्हणजे त्याचें स्पर्शेंद्रिय अधिक तीव्र असतें, किंवा वाचा नसणाराचें घ्राणेंद्रिय तीक्ष्ण असतें त्याप्रमाणेंच बुद्धि कमी असणाराचें अंतःकरण बहुधा मोठें असतें, असा माझा अनुभव आहे. बुद्धिवंतांच्या संगतींत क्षणभर आपले डोळे दिपून जातील, आणि जीवनाचें पृथक्करण करून त्यानें शोधून काढलेले रुक्ष पण भव्य सिद्धान्त आपल्याला चकितही करून टाकतील. पण सामान्य माणसाच्या संगतींत मिळणारा जीवनाचा एखादा अपूर्व अनुभव किंवा दृष्टोत्पत्तीला येणारें जीवनाचें एखादें नवीन स्वरूप इतकें अमोल असतें, कीं प्रत्यक्ष जीवनाच्या निर्मल झऱ्यांतच बुडी मारल्याचा अवर्णनीय आनंद आपणाला होतो. आम्ही बुद्धिवान् लोक अपत्यवात्सल्याविषयीं रसाळ कविता लिहूं किंवा मित्रप्रेमावर एखादा फर्डा लेखही खरडूं; पण आमचा मित्र आजारी पडला असता इकडची काडी तिकडे करण्याचें कांहीं आम्हांला जमणार नाहीं ! पण तेंच एखादा सामान्य माणूस आपल्या स्नेह्याच्या आजारांत त्याची शुश्रूषा करण्याचें आणि घाण उपसण्याचें काम आमच्या-

पेक्षा शतपट अधिक चोखपणें करतो. सामान्यांतच असामान्य माणुसकी असते, असें मला वाटतें. आणि बुद्धीपेक्षां मला माणुसकीची किंमत अधिक वाटत असल्या-मुळें सामान्याचीच संगत मी अधिक पसंत करणार !



## ६६

### प्रगतीची किल्ली

अलीकडे गणूकाकाना माझा राग येऊं लागला आहे. एक-दोन दिवसांपूर्वी कसल्या तरी तत्त्वज्ञानाच्या गोष्टी करीत मी आणि माझा एक मित्र बसलों होतों. इतक्यांत गणूकाका तेथें आले. आमच्या गोष्टी त्यांच्या कानावर पडल्याबरोबर इतके दिवस मनात धुमसत असलेला राग बोलून दाखवायला त्याना चागलीच संधि मिळाली. मला मध्येंच थांबवून ते म्हणाले,

' अलीकडे तूं फारच शहाणपणा दाखवूं लागला आहेस! कांहीं तरी एखादी क्षुल्लक गोष्ट ध्यायची, किंवा मी चुकून बोललेला एखादा शब्द धरायचा आणि त्यातून मोठं कांहीं तरी तत्त्वज्ञानाचं अवडंबर काढायचं! तूं तोडलेले अकलेचे तारे गेले कित्येक दिवस वाचतोंय मी. मला त्यांत काहीं तथ्य वाटत नाहीं. हो, स्पष्ट सांगतों—'

' अहो पण, काका, ' मी माझी बाजू मांडण्याकरितां त्याना थांबवून बोलायचा प्रयत्न करूं लागलों.

' तें काहीं सांगूं नकोस मला. ' आपला आवाज अधिकच चढवून काका ओरडले, ' तुम्ही अलीकडचे लोक स्वतःच्या फायद्याकरिता केलेली एखादी बारीकसारीक गोष्टसुद्धां केवढी फुगवून, जणूं काय जगाच्या कल्याणाकरितां ती केली आहे, असं भासवतां! इकडचीं तिकडचीं इंग्रजी पुस्तकं वाचता, आणि

त्यांत सांपडलेल्या मोठमोठ्या जाडजूड शब्दाचा भडिमार करून आम्हा लोकांना चकित करून सोडता. आम्हाला तें काहीं जमत नाहीं. आम्ही आपले सरळमार्गी लोक. आम्हाला आमच्या तरुणपणीं एखादी चांगली मुलगी दिसली तर आम्ही आमच्या आईबापाना सांगत असूं, कीं मुलगी चांगली आहे. इच्याशीं लग्न करून मला संसार करायचा आहे नी चार पोराचा धनी व्हायचं आहे! तुम्ही एखादी सुंदर पोरगी पाहिलीत कीं काय शब्दाचं वादळ उठवतां! दिव्य प्रेम काय, अमरज्योति काय नी काय काय! आणि इतकं करून शेवटीं आम्ही केलं तेंच करता! — '

'मीं असं केलं तरी काय, काका?' मी म्हणालों.

'सांगतों, धीर धर.' काका म्हणाले, 'परवा तूं तें एका लेखात लिहिलंस, कीं लिहा म्हणून आमच्या मानेवर कुणीं गोणी ठेवलेल्या नाहींत, कीं या लेखाबद्दल चार पैसेसुद्धां मिळणार नाहींत. तरीपण लिहिल्याशिवाय राहवतच नाहीं. का? तर म्हणे, प्रवृत्ति-निवृत्तीची रस्सीखेंच, यंव आणि त्यंव! अरे, लेखक म्हणून तुम्हाला मिरवायला पाहिजे, कीर्तीची हाव आहे, चार लोकांनीं बरं म्हटलेलं तुम्हाला हवं आहे! कसली रस्सीखेंच नी कसलं काय!'

'अस्सं, अस्सं.' मी म्हणालों, 'चांगलाच सूड घेतलात काका, तुमच्या नांवावर तत्त्वज्ञानाचा बकवा केल्याबद्दल!'

'याची गोष्ट एक सोडून द्या, काका.' माझा मित्र म्हणाला, 'हा असेल आपमतलबी तुम्ही म्हणता तसा. पण मोठमोठे शास्त्रज्ञ, संशोधक, राजकारणी पुरुष, स्वतःच्या जीवाची पर्वा न करतां जें कार्य करून ठेवतात, तें काय कीर्तीच्या स्वार्थी आशेनं? देशकार्यासाठीं ऐहिक सुखावर लाथ मारणारे स्वातंत्र्यवीर, किंवा मानव-जातीच्या सुखांत भर घालणारा एखादा शोध लावण्यासाठीं सर्वस्वाचीच नव्हे, तर स्वतःच्या जीवाचीही राखरागोळी करायला मागं-पुढं न पाहणारे शास्त्रज्ञ, हे कुठलंही कार्य केवळ स्वार्थी हेतूनं करतात, असं मला नाहीं वाटत. साहित्यिकाची साहित्य-निर्मिती किंवा शास्त्रज्ञाचं संशोधन कीर्ति किंवा नाव मिळविण्याच्या स्वार्थी लालसेनं केलीं जातात असं तुम्हांला वाटतं, तर तारे तोडणाऱ्या आमच्या या दोस्ताला

काहींतरी करावंसं वाटणं आणि काहीं करूं नयेस वाटणं, ही एक प्रवृत्ति-निवृत्तींची हेतुशून्य रस्सीखेंच, किंवा जीवन म्हणजे एक अर्थविहीन डोंबाऱ्याचा खेळ वाटतो. मला वाटतं, मानवी अंतःकरणांत जगण्याची जशी एक प्रबळ इच्छा निसर्गानं ठेवून दिली आहे, तशीच निर्मितीची—स्वतःचं असं काहीं तरी जगात करून दाखविण्याची—बलवत्तर आवड उपजतच तिथं आहे. स्त्री-पुरुषांमधल्या आकर्षणाचा निसर्ग ज्याप्रमाणें मानव जातीचं सातत्य राखण्याकरितां उपयोग करून घेतो, त्याचप्रमाणं मला वाटतं, या निर्मितीच्या आवडीचा फायदा घेऊन तो मानवी प्रगतीचं गाडं चालू ठेवतो ! स्वतःच्या सुखासाठीं म्हणून या आकर्षणामुळं स्त्री-पुरुष एकत्र येत असतील, पण मृत्यूमुळं मानव-जातींत पडणारी तूट जन्मानं भरून काढण्याचं कार्य निसर्ग परस्पर त्यांच्याकडून करून घेत असतो ! त्याच-प्रमाणं शास्त्रज्ञ किंवा साहित्यिक या निर्मितीच्या नादानं कीर्तीसाठीं जिवापाड झटत असतील, पण मानवी सुधारणेंत, संस्कृतींत किंवा प्रगतींत अविरत भर घालण्याचं काम निसर्ग त्यांच्या हातून साधतो. या निर्मितीच्या नादातच प्रगतीची किल्ली आहे. '

माझ्या मित्राचें हें जोरदार व्याख्यान ऐकून गणूकाका तर सर्दच झाले. पण मीही बराच चमकलों. मात्र त्याच्या म्हणण्यांत बरेंच तथ्य आहे असें मला वाटतें. कीर्तीच्याच आशेनें मनुष्य एखादें चांगलें कार्य करतो असें म्हणता येणार नाहीं. आपल्या कार्याचा किंवा आपल्या नांवाचा जगाला मागमूसही लागणार नाहीं, हें माहीत असूनही सत्कार्य करीत राहणारे अज्ञात वीर काय थोडे आहेत ? पेटलेल्या खाईवर देहाचा पूल करून शिवाजीला पुढें जाऊं देणाऱ्या स्वामिनिष्ठ मावळ्यानीं तें वीरकृत्य काय कीर्तीच्या आशेनें केलें ? कांहीं तरी चांगलें कार्य करण्याची अनावर इच्छा—निर्मितीचा नाद—हेंच त्याचें खरें कारण. यावरही कदाचित् गणूकाका म्हणतील, कीं असलें कार्य करतांना होणाऱ्या आनंदाच्या स्वार्थी हेतूनें हे लोक असलीं कार्यें करीत असतील ! या प्रश्नाला मात्र माझ्याजवळ उत्तर नाहीं !

●●●

## ६७

### यथेच्छ झोंपा !

अनेकांना अनेक कारणासाठीं नेपोलियन आवडतो. कुणाला तो एक अद्वितीय योद्धा म्हणून आवडतो, तर कुणाला एक मोठा देशभक्त म्हणून त्याच्याविषयीं आदर वाटतो. मला मात्र तो एका निराळ्याच कारणामुळें आवडतो नेपोलियनविषयीं असें सांगतात, कीं त्याला वाटेल तेव्हां वाटेल तिथें झोंप येत असे. त्याची झोंप हुकमी होती. रणांगणावर शत्रूशीं तुंबळ युद्ध जुंपलेलें असतानासुद्धां तो मध्येंच घोड्यावर बसल्या बसल्या पांच-दहा मिनिटें झोंप काढून ताजातवाना होऊं शकत असे. खरोखरच नेपोलियनचा मला हेवा वाटतो ! आणि यामुळेंच तो मला फार आवडतो. योद्धे आणि वीरपुरुष, देशभक्त आणि जगज्जेते हवे तितके मिळतील, पण असा खंदा निद्रावीर कुठें मिळेल !

नेपोलियनविषयीं मला कमालीचा आदर कां वाटतो हें जेव्हां मीं गणू काकांना सांगितलें, तेव्हां क्षणभर ते स्तंभितच झाले, आणि नंतर रागानें दांत-ओंठ खात म्हणाले, ‘ मूर्खा, स्वतःच्या आळसावर पांघरूण घालायला एका इतिहासप्रसिद्ध पुरुषाच्या मागं लपायला पाहतोस काय ? आधींच मनुष्यमात्राचं निम्मं आयुष्य झोंपेंत फुकट जातं. त्यांत दिवसा, रात्रीं वाटेल तेव्हां झोंपा काढून तूं आपलं नव्वद टक्के आयुष्य वाया घालावतोस. आणखी

उरलेलं दहा टक्के कांहीं तरी उपयुक्त किंवा चागलं काम करीत घालवण्याऐवजीं नेपोलियनसारख्या थोर पुरुषाच्या आयुष्यातल्या इतर सगळ्या चागल्या गोष्टी सोडून देऊन त्याच्या झोपेचं उदाहरण डोळ्यापुढं ठेवतोस काय ? नेपोलियन वाटेल तेव्हां झोपूं शकत असे, हें तुझ्या मतें त्याचं मोठेपण ! लाज नाहीं वाटत सांगायला तुला ? '

गणूकाकांनीं शिव्यांचा कितीही वर्षाव केला, तरी मला नाहीं पटत त्याचें म्हणणें. झोपेंत गेलेलें आयुष्य फुकट जातें असें मला वाटतच नाहीं मुळीं. उलट, माझ्या मतें जागेपणातल्या जीवनापेक्षाही झोपेंतलें जीवन किती तरी अधिक महत्त्वाचें नी अधिक सुंदर असतें. फार काय, पण जागेपणीं जें कधींच शक्य नाहीं असें सुंदर जीवन झोपेंतच जगता येतें ! झोपेंत दिसणारीं गोड आणि सर्वांगसुंदर स्वप्नें जागेपणीं तुम्हाला कधींतरी दिसतील काय ? प्रत्येक मानवी अंतःकरणाच्या गाभ्यात अगदीं खोल दडून राहिलेली एखादी तरी अशक्य कोटींतली – वेडगळपणाची पण अत्यंत प्रिय अशी इच्छा असते. जागृत जीवनात या इच्छेची पूर्तता तर दूरच राहो, पण ती नुसती बाहेर बोलून दाखविली, तरीसुद्धा लोक तुम्हाला वेड्यांत काढतील. या असल्या वेड्याबगड्या इच्छांच्या सफलतेचा लोकोत्तर आनंद स्वप्नसृष्टींत नेऊन सोडणाऱ्या झोपेंतच तुम्हांला मिळेल.

इतरांच्या अशा काय इच्छा असतील कुणाला ठाऊक, पण सर्वजण मला हंसतील याची पूर्ण जाणीव असूनही माझ्या एका असल्याच वेड्या इच्छेचें उदाहरण मला सांगितल्याशिवाय राहवत नाहीं. लहानपणापासून ही इच्छा माझ्या मनात दबा धरून बसलेली आहे. आणि अजूनही ती तिथें जशीच्या तशी आहे. या इच्छेच्या पूर्णतेचा अवर्णनीय आनंद मीं अनेक वेळा झोपेंत चाखला आहे, आणि पुढेंही अनेक वेळा चाखीन अशी आशा आहे. हें स्वप्न गेल्या कित्येक वर्षांत मीं पुन्हा पुन्हा पाहिलें आहे,– किंवा अधिक समर्पक भाषेंत बोलायचें म्हणजे हें स्वप्न मी ' जगलों ' आहें. पक्ष्यासारखे आपणाला उडतां यावें, अशी तीव्र इच्छा लहानपणापासून माझ्या मनात आहे ! विमानांत बसून किंवा यंत्राच्या सहाय्यानें वर उडण्यात मला विशेष मजा नाहीं वाटत. आपल्या बाहूंत आणि पायांत विजेसारखी कांहींतरी अद्भुत शक्ति

स्फुरित व्हावी आणि स्वतःच्या जोरावर मन मानेल तसें हवेंत तरंगत फिरावें, ही माझी खरी इच्छा.

लहानपणीं तर अरबी भाषेंतल्या सुरस आणि चमत्कारिक गोष्टी किंवा पुराणातले मारुतीचे पराक्रम वाचले, कीं मला विलक्षण उत्साह आणि आशा वाटे. घरातलीं माणसें बाहेर गेली आहेत, असें पाहून किती तरी वेळां दारें बंद करून घेऊन मी सुपाची जोडी किंवा फाटक्या चादरीचे तुकडे दोघांच्या सहाय्यानें हाताना आणि पायाना बांधले आहेत, आणि खादे दुखून येईपर्यंत फडफाड करून वर उडण्याचा प्रयत्न केला आहे ! अलीकडे तसा प्रयत्न मीं केला नाहीं, पण स्वप्नात मात्र माझा हा प्रयत्न संपूर्ण यशस्वी झाला आहे ! एक अफाट, क्षितिजापर्यंत पसरलेलें सपाट मैदान मला स्वप्नांत दिसतें. त्या मैदानात एखाद्या शर्यतीत धावावें त्याप्रमाणें धावायला मी सुरुवात करतों. धांवता धावता एकदम माझे दोन्ही पाय जमिनीपासून उचलले जातात, आणि मग झालेंच. कमरेवर हात ठेवून वाटेल तसा, वाटेल त्या वेगानें मी तरंगत पुढें जाऊं शकतों. झोंपाळ्यावर बसून झोंके घेतांना ज्याप्रमाणें आपण जमिनीवर जोरानें पाय दाबतों म्हणजे झोंका उंच जातो त्याप्रमाणेंच हवेंत जितक्या जोरानें पाय दाबावे तितक्या अधिक वेगानें मी पुढें जातों ! हें स्वप्न अनेक वेळा मीं पाहिलें आहे,— किंवा अधिक खरें बोलायचें म्हणजे अगदीं वास्तवपणें हें स्वप्न मी अनेक वेळ ‘ जगलों ’ आहें. इतक्या खरेपणानें जगलों आहें, कीं स्वप्नातून जागा झाल्यानंतरसुद्धां एक क्षण, दोन क्षण त्या अद्भुत अनुभवाची गोड भिरभिरी माझ्या पायात भिरभिरत राहिली आहे. आणि आतां एका क्षणापूर्वी आपण जें सहजपणें केलें तें जागेपणीं कां करतां येऊं नये, अशी वेडी आशा माझ्या मनांत कैक वेळां डोकावून गेली आहे.

इहलोकात ज्याची भेट आपणाला पुन्हा कधींच होणार नाहीं अशा आपणाला सोडून गेलेल्या प्रियजनांची काहीं क्षणापुरती कां होईना, पण जवळ जवळ जिवंत भेट एक काय ती झोंपेंतली स्वप्नसृष्टीच करूं जाणे. जगाच्या दुःखांतून सुटून जाण्याकरितां मृत्यु हा एकच उपाय आहे, असें कांहीं लोक सागतात. त्यांना मी सांगेन, कीं ‘ बाबांनो, हा शेवटचा उपाय अमलांत आण-

ण्यापूर्वी दुसरा एक उपाय करून पाहा. मृत्यूचे सर्व फायदे ज्यांत आहेत, पण तोटा मात्र एकही नाहीं अशी एक गोष्ट जगांत आहे; ती म्हणजे झोंप !'

गणूकाका आणि त्यांच्यासारखे इतर शहाणे लोक डोळ्याला डोळा लागूं न देतां अहर्निश काम करूं द्यात आणि नांवलौकिक, मोठेपणा मिळवूं द्यात. मी मात्र मिळेल तेव्हा आणि मिळेल तिथें उशींत डोकें खुपसणार आणि शक्य तितकें झोंपून घेणार !



## ६८

### ज्योति आणि ज्वाला !

नुकतीच एक मोठी मजेदार गोष्ट मीं वाचली. एका महत्त्वाकांक्षी मनुष्याला लोकामध्यें आपणाला काहींतरी अद्वितीय स्थान प्राप्त व्हावें,– एक कुणी तरी भलताच मोठा माणूस म्हणून जगानें आपणाकडे पाहावें, अशी तीव्र इच्छा झाली. त्यानें हर उपायांनी सैतानाला प्रसन्न केला; आणि त्याच्याकडून असा वर मागून घेतला, कीं इतर माणसाना जशी सावली किंवा छाया असते तशी आपणाला असूं नये ! सैतानानें त्याला तो वर खुशीनें दिला. त्या माणसाला वाटलें, सांवली नसलेला एकमेव प्राणी म्हणून सारें जग आतां आपणाला मान देणार. पण परिणाम मात्र उलटाच झाला. हें कुणी तरी भूतपिशाच्च आहे म्हणून सारा समाज त्याच्यापासून दूर दूर पळूं लागला. त्याची बायको, त्याचीं मुलेंसुद्धा त्याला जवळ उभा करीनात. सर्व लोकांनीं ठरविलें, कीं याला मारून टाकला पाहिजे ! शेवटीं हा सर्व प्रकार असह्य होऊन त्या बिचाऱ्याला आत्महत्या करावी लागली.

वेल्स या सुप्रसिद्ध लेखकाची अशीच एक गोष्ट आहे. साऱ्या जगाला दांतीं तृण धरून आपल्या पायांशीं यायला लावीन अशा महत्त्वाकांक्षेनें प्रेरित होऊन एक मनुष्य अदृश्य होण्याची शक्ति संपादन करतो. पण शेवटीं आपल्या जातींतून उठून गेलेल्या एखाद्या पक्ष्याला ज्याप्रमाणें त्या जातीचे सारे पक्षी

टोंचून टोंचून ठार करतात, त्याप्रमाणें सारीं माणसें एक होऊन त्या अदृश्य होऊं शकणाऱ्या इसमाला 'दे माय धरणी ठाय' करतात, आणि त्याचा मुडदा पाडतात.

या चिमुकल्या गोष्टी चिमुकल्या मुलांचें मनोरंजन करतील अशाच आहेत खऱ्या; पण त्याच्यामागें एक भव्य सत्य लपलें आहे, असें मला वाटतें. स्वतःला मोठेपणा मिळविण्याचा म्हणा, किंवा जगावर कर्तुमकर्तुम् सत्ता गाजविण्याचा म्हणा, कसलाही स्वार्थ जरी तुम्हाला साधायचा असेल, तरीसुद्धा केवळ स्वतःचें वैयक्तिक महत्त्व वाढेल असें कांहीं तरी जगावेगळें चमत्कारिक स्वरूप प्राप्त करून घेणें, किंवा निव्वळ आपला वैयक्तिक फायदा करील अशी एखादी अलौकिक शक्ति मिळविणें, हा त्याला उपाय नव्हे. स्वार्थाकरितां तुम्हांला परमार्थाची कास धरली पाहिजे. नेपोलियन किंवा शिकंदर यानीं जगज्जेते होण्याची स्वार्थी महत्त्वाकांक्षा धरली असेल, पण स्वतःच्या राष्ट्राचें सामर्थ्य वाढविण्याचें किंवा आपल्या देशाचा कीर्तिपरिमल जगभर पसरविण्याचें उच्च ध्येय त्यांनीं डोळ्यांपुढें ठेवलें म्हणूनच त्याना जनतेचा किंवा समाजाचा प्रचंड पाठिंबा मिळाला.

तसा निःस्वार्थी जगात कुणीच नाहीं. एखाद्या देशभक्तानें सोसलेल्या हाल-अपेष्टांचें किंवा त्याच्या स्वार्थत्यागाचें मी वर्णन करूं लागलों, कीं आमचे गणूकाका नेहमीं म्हणतात, 'माहीत आहे रे, या लोकांचा स्वार्थत्याग! पुढारी म्हणून मिरवायचा हवं आणि हजारों लोकाकडून आपला जयजयकार करून घ्यायला हवा म्हणून करतात सगळं झालं!'

यावर गणूकाकाना मी हेंच उत्तर देतों, कीं 'असेल त्याचा स्वार्थी हेतु. वादाकरिता क्षणभर मी 'नाहीं' नाहीं म्हणत. पण कसल्याही हेतूनं का होईना ते आपल्या देशाच्या, आपल्या लोकाच्या चांगल्याकरितां झटताहेत ना? झालं तर.'

म्हणूनच मी म्हणतों, कीं मीं सुरुवातीला सांगितलेल्या दोन गोष्टींचा अर्थ हाच, कीं जगाचें कांहींतरी कल्याण करील, मानवी समाजाच्या कांहीं तरी उपयोगी पडेल अशी शक्ति तुम्हीं मिळविली पाहिजे, किंवा अशी शक्ति तुमच्यात असली तर इतरांच्या कल्याणाकरितां तुम्हीं तिचा उपयोग

केला पाहिजे. त्यांतच तुमचें वैयक्तिक सुख किंवा स्वार्थ आहे. नाहींतर तुमचें अद्वितीयत्व किंवा मुलुखावेगळें व्यक्तित्व तुमच्या दुःखाला आणि नाशालाच कारणीभूत होईल.

व्यक्तीला जर कांहीं किंमत असेल तर ती समाजाचा एक घटक म्हणून. हें ज्या व्यक्तीला समजलें नाहीं ती व्यक्ति सुखी होणें कधींच शक्य नाहीं. स्वतःला सुख पाहिजे असेल तरीसुद्धा दुसऱ्याला सुखी केलें पाहिजे, हेंच माझ्या मतें अंतिम सत्य. आपल्या व्यक्तिजीवनाची इवलीशी ज्योत मोठ्या सायासानें पदराखालीं धरून जगांतल्या सुखःदुखाच्या झंझावातापासून तिला बचावण्याचा केविलवाणा प्रयत्न करीत सारें आयुष्य घालविण्यांत कसलें सुख आणि कसली माणुसकी ? समाजजीवनाच्या ज्वालेंत ही ज्योत मिळविली – एकजीव केली – तर विझण्याची तिला कधींच भीति नाही. माणूस मरतो, पण मानवता जगते; इतकेंच नव्हे तर दिवसेंदिवस ती मोठी होते, तिची प्रगति होते. आपल्या व्यक्तिजीवनाची ज्योत ही त्या दिवसेंदिवस अधिकाधिक तेजस्वी आणि वैभवशाली होत चाललेल्या अमर ज्वालेचाच एक अभेद्य भाग आहे, ही कल्पनाच किती आशादायक आणि उत्साहवर्धक आहे ! ही ज्योत विझली तरी ती ज्वाला सदैव प्रज्वलितच राहते, या अंतिम सत्याची मनोमय जाणीव हाच अमरत्वाचा अनुभव. आणखी अमरत्व, अमरत्व तें कसलें असणार ?



६१

## शत्रु करण्याची कला !

आमच्या गणूकाकाचे पुण्याला एक मित्र आहेत. त्यांचा कुणाशींही कधींच मतभेद होत नाहीं; किंवा, खरें बोलायचें म्हणजे कुणाशीं मतभेद करण्याची त्यांची मुळी इच्छाच नाहीं. परवा पुण्यात स्टेशनच्या बाजूला घाईघाईनें जाताना मला ते दिसले. मीं त्याना सहज म्हटलें, ‘ काय अप्पा, मुंबईला चाललांत वाटतं ? ’ त्यावर अगदीं गोड चेहरा करून ते म्हणाले, ‘ हो, तसं म्हणायला कांहीं हरकत नाहीं. तसा आता एका रेल्वेच्या अधिकाऱ्याला भेटायला चाललोंय्, पण दोन चार दिवसानीं जाणार आहें मुंबईला मी ! ’

म्हणजे त्या वेळेला ते मुंबईला चालले नव्हते. पण माझ्याशीं मतभेद करूं नये या सोज्वळ हेतूनें ते पहिल्यांदा ‘ हो, हो ’ म्हणाले; आणि नंतर हळूच आपण मुंबईला जात नसून रेल्वे अधिकाऱ्याला भेटायला जात आहोंत ही खरी परिस्थिति त्यांनीं भीत भीत मला सांगितली. पण एवढ्याशा मतभेदानेंसुद्धां माझें हळवें मन दुखावलें जाईल म्हणून त्यानीं तीन-चार दिवसानीं आपण मुंबईला जाणार आहोंत असें खात्रीपूर्वक आश्वासन देऊन माझें सांत्वन केलें !

दुसऱ्याशीं सहमत होण्याची ही विलक्षण तत्परता पाहून केव्हां केव्हां हंसतां हंसता पोट दुखूं लागतें. एकदा बोलतां बोलतां गणूकाका रागानें त्यांना म्हणाले, ‘ काय गाढव आहेस तूं, अप्पा ! ’

' हो, ' नाहीं ' नाहीं म्हणत मी; पण इतक्या मोठ्यानं माझ्या अंगावर ओरडूं नकोस बुवा ! ' ते गोरामोरा चेहरा करून म्हणाले.

या गृहस्थाच्या अगदीं उलट माझ्या एका मित्राचा स्वभाव आहे. प्रत्येक गोष्टींत दुसऱ्याशीं मतभेद करणें हें एक त्याला पवित्र कर्तव्य वाटतें. कुणीं जर म्हटलें, कीं अमुक अमुक ठिकाण इथून पाच मिनिटांच्या रस्त्यावर आहे, तर तो ताबडतोब त्या माणसाला सांगेल, ' छे छे, चुकता तुम्ही; तिथं जायला साडेपांच मिनिटं लागतात ! '

कुणाला म्हणून सुखी वाटूं द्यायचं नाहीं असा जणूं काय त्याचा निश्चयच आहे. शत्रु करण्याच्या कलेंत तो इतका तरबेज झाला आहे, कीं हा एक त्याचा आतां स्वभावधर्मच होऊन बसला आहे. दुसऱ्याचीं मनें दुखवण्यात आणि विनाकारण कुणाचीही टोपी उडवण्यात त्याला निरतिशय आनंद वाटतो. आपण दुसऱ्याचीं मनें दुखवतों आणि जिकडे तिकडे शत्रु निर्माण करतों याची मात्र त्याला कल्पनासुद्धा होत नाहीं.

सर्वांच्या टोप्या उडवून वर आणखी आपल्याशीं लोक नीट वागत नाहींत, आपणाला शत्रु फार आहेत, आपणाला कुणी चांगला म्हणत नाहीं, याबद्दल तो कुरकूर करतो. मला त्याच्या या कुरकुरीचें आश्चर्य वाटतें. तसें त्याला मीं स्पष्ट सांगितलेंही. मीं म्हटलें, ' इतरांनीं तुला चांगलं म्हणावं असं तुला वाटतं — दुसऱ्यांनीं चांगलं म्हटलं कीं तुला सुख होतं; मग इतरांनाही तुझ्यासारखंच वाटत असेल याचा मात्र तूं चुकूनसुद्धा विचार का करीत नाहींस ? इतराकडून चांगला म्हणवून घेण्यात तुला जर सुख वाटतं, तर तूंही इतराना चांगलं म्हटलं पाहिजेस. ' त्याला हें पटतें, पण त्याचा स्वभाव काहीं जात नाहीं.

मी या गोष्टींचा विचार करूं लागलों, कीं अप्पाच्या वरवर हास्यास्पद दिसणाऱ्या वागणुकीचें मर्म मला थोडें थोडें कळूं लागतें. आपणाला कुणीं चांगलें म्हटलें नाहीं, किंवा आपणाविषयीं कुणीं वाईट मत प्रदर्शित केलें, कीं त्यांना अत्यंत दुःख होत असावें. तेव्हां आपण कुणाला वाईट म्हणायचें नाहीं म्हणजे लोक आपणाला दुःख देणार नाहींत, या आशेनें सर्वांशीं सहमत होण्याचा आणि दुसऱ्याचीं मनें न दुखविण्याचा त्यांनीं निश्चय केला असावा.

अप्पा किंवा माझा तो मित्र हे माझ्या मतें दोन आत्यंतिक नमुने आहेत. मी या दोहोंमधला सुवर्णमध्य साधायचा प्रयत्न करतों. मला कुणीं चागला म्हटलें कीं बरें वाटतें, आणि वाईट म्हटलें कीं वाईट वाटतें, हें मी माझ्या मनाशीं स्पष्ट केलें आहे. तेव्हां शक्य तों दुसऱ्याना चागलें म्हणायचें, —सहसा कुणाला वाईट म्हणायचें नाहीं, आणि अशा तऱ्हेनें आपणाला वाईट म्हणून आपल्या आयुष्या-तले कांहीं क्षण दुःखीकष्टी करणारे शत्रु निर्माण करायचे नाहींत, असा माझा नियम आहे. कठोरपणें मतभेद व्यक्त केल्यामुळें एखाद्याचें चांगलें होणार असेल, किंवा कटु सत्य स्पष्टपणें न बोलल्यामुळें जगाचा मोठा तोटा होणार असेल तरच एखाद्याचें मन दुखवावें असें मला वाटतें. इतकेंही करून कुणी माझ्याशीं शत्रुत्व करूं लागला तर मात्र सर्व शक्ति एकवटून त्याच्याशीं झटापट करायला आणि शक्य तों त्याला चारही मुंड्या चीत करून विजयोत्साहाचा आनंद उपभोगायला मी मागें-पुढें पाहणार नाहीं !

माझें हें तत्त्वज्ञान मी जेव्हा माझ्या मित्राना सांगतों, तेव्हा त्याच्यापैकीं कांहीं मला चिडविण्याकरिता म्हणतात, ‘ किती थोर मन तुझं ! पुढं-मागं तूं महात्मा होणार ! ’

यावर माझें उत्तर ठरलेलें आहे : ‘ माझ्या या तत्त्वज्ञानात थोरपणा किंवा मनाचा मोठेपणा कांहीं एक नाहीं, हें मी कबूल करतों. माझा हा अगदीं उघडा-नागडा स्वार्थ आहे. मी म्हणतों, उगाच शत्रु निर्माण करून आपल्या आयुष्यातले काहीं क्षण तरी दुःखीकष्टी कां करा ? ’



७०

## पांचामुखीं सैतान!

आधींच मी कांहींतरी कारणामुळें कावल्यासारखा झालों होतों. त्यात आणखी त्यानें ही बातमी सांगितली. त्यामुळें मी खरोखरच चिडलों; आणि माझ्या तोंडून ते बेफाट शब्द निघून गेले. तें असं झालं. त्या दिवशीं माझा एक मित्र मला भेटायला आला होता. आणि आल्याबरोबर पहिलीच बातमी त्यानें ही सागितली —

'अरे,' तो म्हणाला, 'ती अमकी अमकी बाई मला नुकतीच भेटली होती. तिचं तुझ्याविषयीं फार वाईट मत आहे!'

'बेशरम असली पाहिजे ती!' मी चिडून म्हणालों.

माझ्या शब्दांनीं त्याला धक्काच बसला. 'एका सभ्य स्त्रीला फट्दिशीं बेशरम म्हणतोस म्हणजे तुला झालंय तरी काय?' तो आश्चर्यचकित होऊन म्हणाला.

'तिला सभ्य म्हणतोस म्हणजे तूं सुद्धा बेशरम असला पाहिजेस!' मी शांतपणें म्हणालों.

'म्हणजे?'

'म्हणजे असं,' मी म्हणालों, 'कीं ज्या बाईचा शत्रु किंवा मित्र म्हणून माझा कांहींच संबंध आला नाहीं,— जिला माझी कांहींच माहिती नाहीं, तिचं

माझ्याविषयीं फार तर चागलं किंवा वाईट काहींच मत असूं नये; पण ती माझ्याविषयीं विनाकारण आपलं वाईट मत करून घेते; इतकंच नव्हे, तर दुसऱ्याजवळ तें व्यक्त करते! मग मी तिला बेशरम नाहीं तर काय म्हणूं? आणि तुला खरं सागू? अशा वाईट बाईचं माझ्याविषयीं वाईट मत आहे तेंच चागलं; अशा बाईचं माझ्याविषयीं चागलं मत असतं तर मी वाईट ठरलों असतों!'

'हें ठीक आहे तुझं तत्त्वज्ञान,' माझा मित्र म्हणाला, 'पण मला बेशरम म्हणून तूं शिवी कां दिलीस?'

'बेशरम माणसाना तूं सभ्य म्हणालास म्हणून!'

त्या वेळेला चिडून मी माझ्या मित्राला टाकून बोललों खरा, पण आता मला त्या गोष्टीचें वाईट वाटतें. या गोष्टीला बरींच वर्षें होऊन गेली आहेत. आता मी चागलाच कोडगा झालों आहें. स्वतःविषयीं इतक्या भयंकर गोष्टी माझ्या कानावर आल्या आहेत, कीं असल्या गोष्टींचें मला आता काहींच वाटेनासें झालें आहे. पाचामुखीं परमेश्वर असें कुणी म्हणणारे असतील ते म्हणोत. माझा अनुभव 'पाचामुखीं सैतान' असा आहे! आणि या सैतानाच्या शब्दावर जर विश्वास ठेवायचा असेल तर जगात असें एकही भयंकर व्यसन नाहीं कीं जें मला लागलेलें नाहीं!

अलीकडे माझ्या एका तत्त्वज्ञानी मित्राच्या तत्त्वाप्रमाणें चालण्याचा मी प्रयत्न करतों आहें. त्याचें म्हणणें असें, कीं खुनाला जशी केव्हा ना केव्हा तरी वाचा फुटते, तशी सत्यालाही फुटतेच फुटते. म्हणूनच आपली कुणीं बदनामी केली, तर शेवटीं त्या बदनामी करणाराचीच जगात बदनामी होते. कारण, कांहीं दिवसानीं कां होईना, तो खोटें बोलत होता हें जगाला कळल्याशिवाय राहात नाहीं. आपण बदनामीमुळें चिडून जाऊन, किंवा उत्तरें देण्याच्या भानगडींत पडून स्वतःचा वेळ आणि शक्ति फुकट घालवण्यापेक्षा स्वस्थ राहावें हेंच बरें!

हें सर्व ठीक आहे. पण दुसऱ्याची विनाकारण बदनामी करण्याची आणि त्याला दुःख देण्याची कांहीं लोकांना इच्छाच का होते, हें मात्र मानसशास्त्राचें मोठेंच कोडें आहे असें मला वाटतें. भक्तीचा जसा 'विरोधी भक्ति' या नांवाचा एक प्रकार आहे, त्याप्रमाणेंच मनुष्यमात्रांना एकामेकाविषयीं वाटणाऱ्या

बंधुभावाचा हा एक ' विकृत बंधुभाव ' नांवाचा प्रकार असावा ! रामावर रावणाची विरोधी भक्ति होती म्हणून त्याचें वैर संपादन करून त्याच्याशीं रावणानें युद्ध केलें असें म्हणतात. त्याचप्रमाणें दुर्दैवाच्या फेऱ्यांत सांपडल्यामुळें ज्यांचें जीवन दुःखीकष्टी झालें आहे — कडवटून गेलें आहे अशा माणसांना आपल्या जोडीला दुसरेही जितके दुःखीकष्टी असतील तितके बरे, असें वाटून इतरांना अकारण दुःखी करण्याचा त्यांनीं प्रयत्न करणें ही बंधुभावाच्या भावनेचीच एक चमत्कारिक विकृति नसेल ना ? माझें हें निदान अगदींच निराधार नाहीं. प्रत्येक माणसाच्या अंतःकरणांत आपल्याबरोबरच दुसऱ्याचेंही वाईट झालें कीं बरें वाटण्याइतका चोरटा दुष्टपणा खास असतो. आपण नापास झालों, पण आपल्या बरोबरीचा आपला एक हुशार मित्रही नापास झाला, हें त्यांतल्या त्यांत समाधान आहे, असें वाटणारे किती तरी विद्यार्थी मीं पाहिले आहेत. मी त्यांना दुष्ट किंवा मित्रद्रोही मुळींच म्हणणार नाहीं. ही एक अगदीं स्वाभाविक गोष्ट आहे. माझ्या मतें बंधुभावाचेंच हें एक विकृत स्वरूप आहे. सुखांत जशी एक जोडीची ओढ लागते, तशीच दुःखांत लागलेली ही एक जोडीची ओढच म्हणाना !

अर्थात् आपल्याबरोबर दुसऱ्याचें वाईट झालें आहे म्हणून बरें वाटणें, आणि आपण दुर्दैवी आहोंत, — आपलें वाईट झालें आहे म्हणून दुसऱ्याची बदनामी करण्याचा किंवा दुसऱ्याचें वाईट करण्याचा प्रयत्न करणें यांत फरक आहे हें मला कळतें. चांगला मनुष्य असेल, तर तो आपलें वाईट झाल्यास दुसऱ्याचें वाईट करण्याचा प्रयत्न न करतां स्वतःच्या नशिबाला दोष देतो किंवा वाइटांतून चांगलें काढण्याचा प्रयत्न करतो, हें खरें आहे. पण सर्वच असे नसतात. आणि कांहीं दुर्दैवी जीवांना इतरांसंबंधीं अनृतप्रसार करण्यांत आनंद वाटतो, हेंही तितकेंच खरें आहे.

पण या असल्या अनृतप्रसारकांहून निराळा असा दुसरा एक अनृतप्रसारकांचा वर्ग आहे, तो मला अधिक भयंकर वाटतो. दुसऱ्याचें चांगलें बघवत नसल्यामुळें किंवा इतरांचें वाईट करण्याच्या हेतूनेंच या वर्गांतले लोकही अनृतप्रसार करीत असतात; पण ऋतप्रसाराचा सोज्वळ बुरखा पांघरून ऋतप्रसारक किंवा सत्याचे वाली म्हणून हे लोक जनतेंत मिरवत असतात ! पहिल्या प्रकारचे

अनृतप्रसारक बिचारे साधे आणि सरळ. ते सरळ सरळ खोटे बोलत फिरतात; आणि मीं सुरुवातीला म्हटल्याप्रमाणें सत्याला केव्हा तरी वाचा फुटतेच आणि त्याचें स्वरूप उघडकीला येतें. हे लोक स्वतःच्या हातानेंच स्वतःच्या पायावर धोंडा घालून घेतात. पण आमचे दुसऱ्या वर्गांतले अनृतप्रसारक खरे कलावंत ! ते आपल्या अनृतप्रसाराला ऋतप्रसाराचा गोंडस मुलामा देतात ! ॲटलासनें ज्याप्रमाणें पृथ्वीचा प्रचंड गोल आपल्या विशाल पाठीवर तोलून धरला आहे; त्याप्रमाणें या कलियुगांत कोसळत चाललेला सत्याचा डोलारा आपण आपल्या खंबीर खांद्यानें पेलून धरला आहे, असें ते जगाला भासवतात. सत्याचा कसा कुठे अपलाप होईल या भीतीनें त्याना रात्रंदिवस झोंप येत नाहीं ! कुणी कुणाला चागलें म्हटलें, कीं तो वाईट कसा आहे हें सिद्ध करण्याकरिता ते जिवाची आटा-पीट करतात ! कुणी कुणावर उपकार करायला उठला, की तो त्या उपकाराला कसा पात्र नाहीं, हें अजाण जनतेला समजावून देण्याकरिता ते आकात मांडतात ! अर्थात् याचेंही स्वरूप उघडकीला आल्याशिवाय राहात नाहीं. इथेंही सत्याला वाचा फुटतेच. पण ती उशिरां, इतकेंच.

आपण स्वस्थ राहावें आणि सत्याला वाचा फुटूं द्यावी, असें मीं मोठ्या शहाणपणाचा आव आणून म्हटलें खरें; पण तें किती कठीण आहे हें मला पूर्ण माहीत आहे. आपणाला विनाकारण थप्पड मारणाराला एक ठणठणीत ठोसा द्यावा असें प्रत्येकाला वाटतें, आणि मी तसा देतोंही. पण असे ठोसे देत बसायचे तरी किती वेळ, आणि किती जणांना ? पाचामुखीं वसत असलेल्या या सैतानाचें तोंड धरण्याचा किंवा तोंड फोडण्याचा उद्योग करीत बसल्यास सारें आयुष्य पुरायचें नाहीं. म्हणूनच आमच्या तत्त्वज्ञ मित्राच्या ‘ स्वस्थ राहा ’ या सोज्वळ उपदेशाप्रमाणें चालावें असें म्हणण्यापेक्षां चालणें भाग पडतें असेंच म्हणणें बरें !

●●●

## ७१

## दोन चाकं !

पायातली वहाण पायांतच ठेवली पाहिजे, या स्त्रियासंबंधींच्या गणूकाकांच्या तत्त्वज्ञानाचा मला जितका राग येतो, तितकाच, किंबहुना त्याहूनही अधिक स्त्री आणि पुरुष हीं संसार-रथाचीं दोन चाकें आहेत, या शिळ्या आणि बुरसट झालेल्या रूपकाचें चर्वितचर्वण करून स्त्रियांच्या समतेसाठीं आणि स्वातंत्र्यासाठीं कंठशोष करणाऱ्या स्त्री-स्वातंत्र्यवाद्यांचा मला राग येतो अशाच एका स्त्री-स्वातंत्र्यवादिनीबरोबर बोलत असता तिनें आपण काहींतरी आजिबात नवीन आणि गंभीर तत्त्वज्ञान सांगतों आहोंत असा आव आणून मला सांगायला सुरुवात केली, ' स्त्री आणि पुरुष हीं संसार-रथाचीं सारख्या तोलाचीं आणि सारख्या महत्त्वाचीं दोन चाकं आहेत. म्हणून स्त्रियाना पुरुषांनीं समान हक्क दिले पाहिजेत — त्याना आपल्या बरोबरीनं वागवलं पाहिजे —'

' बस—बस ' मी ओरडलों, ' रथ आणि दोन चाकं ही उपमा अजिबात गैरलागू आणि झूट आहे. ज्याच्या दोन चाकांमध्यें रूपाचं आणि आकाराचं कसलंही साम्य नाहीं असा एक तरी रथ तुम्हीं जगांत पाहिला आहे काय ? आणि समजा, एक गोल आणि एक चौकोनी अशा चाकांचा एखादा रथ असला तर तो कधीं तरी चालूं शकेल काय ? आणि दोन चाकं जर सारखींच आहेत, तर तोंड वेंगाडून आम्हांला समान हक्क द्या, आम्हांला बरोबरीनं

वागवा, अशी एका चाकानं दुसऱ्या चाकाकडे भिक्षा मागण्याचं कारण काय ? तुम्ही अशी याचना करतां याचा अर्थच पुरुषांना तुम्ही आपल्यापेक्षां श्रेष्ठ समजतां. श्रेष्ठ किंवा समतोल माणूस कनिष्ठाकडे याचना करीत नाहीं, कनिष्ठ श्रेष्ठाकडे करतो ! '

माझे हे शब्द ऐकून ती स्वातंत्र्यवादिनी संतापानें लाल झाली आणि एकदम उसळून म्हणाली, ' लाज वाटली पाहिजे तुम्हा पुरुषांना असले शब्द उच्चारायला. आम्हांला तुम्ही मुळींच श्रेष्ठ वाटत नाहीं. कोणत्याही बाबतींत आम्ही तुमच्यापेक्षा कमी नाहीं. युगानयुगं तुम्हीं पुरुषांनीं आम्हांला आपल्या सत्तेच्या जोरावर गुलामगिरींत दडपून ठेवलं आहे; आणि आतां आम्ही समानता मागूं लागलों तर आम्हांलाच कनिष्ठ म्हणता ? खासा न्याय ! '

मीं तिला चिडवावयाचें ठरवलें होतें. मी शातपणें म्हणालों, ' युगनयुगं आम्हीं तुम्हाला गुलामगिरींत दडपून ठेवलं आहे हें मी कबूल करतों. पण आम्हीच तुम्हाला दडपूं का शकलों ? तुम्ही आम्हांला दडपूं कां शकला नाहींत ? जगाच्या सुरुवातीला तर दोघांची परिस्थिति सारखीच होती ना ! याचा अर्थच हा, कीं जन्मतःच निसर्गानं तुमच्यांत असे कांहीं दोष ठेवले आहेत, किंवा तुमच्या प्रकृतींत असा काहीं दुबळेपणा ठेवला आहे, कीं तुम्ही आमची बरोबरी करूंच शकत नाहीं. म्हणूनच म्हणतों; पाहिजे तर निसर्गाला दोष द्या; आम्हांला का दोष देता ? '

यावर ती स्वातंत्र्यवादिनी रागानें पाय आपटीत निघून गेली. अर्थात् ही सर्व थट्टा झाली. पण मला खरोखरच रथाच्या दोन चाकांची उपमा चुकीची वाटते. माझ्या मतें घाटावरून खालीं येणाऱ्या आगगाडीचें पुरुष हें पुढलें एंजिन आणि स्त्री हें मागलें एंजिन, हेंच अधिक बरोबर. पुढलेंच एंजिन असेल आणि मागलें नसेल, तर गाडी खालीं कोसळून खड्डयांत पडेल. मागलेंच असलें तर गाडी मागें मागें जाईल, किंवा फार तर जागच्या जागीं उभी राहील ! पुरुष हा स्वतःच कल्पनेच्या आहारीं गेलेला — प्रगतिवादी असतो, आणि स्त्री ही व्यवहारी दृष्टीची — स्थितिवादी असते, असें मला वाटतें. माता म्हणून खडतर कष्ट सोसून ती जगाची निर्मिती करते; या निर्मितीची काळजी घेणें आणि ती टिकवून ठेवणें हें कार्य व्यवहाराचें आहे — कल्पनेचें नाहीं. पण या व्यवहारामुळें वर्तमानांत गुंतून

राहिलेल्या तिच्या स्थितिवादी दृष्टीला रम्यतर भविष्याचा विसर पडण्याचा संभव असतो; आणि याकरितांच पुरुषाच्या कल्पनेची, — त्याच्या स्वैर, प्रगतिवादी प्रवृत्तीची जरूर असते.

प्रतिभावंत प्रियकराला सोडून एखाद्या सामान्य माणसाशीं विवाह करणाऱ्या स्त्रियांचें कांहीं लोकांना आश्चर्य वाटतें. मला मात्र मुळींच वाटत नाहीं. कीट्सला सोडून एका म्हाताऱ्या कर्नलशीं लग्न करणाऱ्या फॅनीला दोष देणारे पुष्कळ आहेत. पण भुकेकंगाल कालिदासाशीं लग्न करून काबाडकष्ट करीत कुत्र्याच्या मोलानें आयुष्य कंटण्यापेक्षा, पंचेचाळीस रुपये नेमानें आणि खात्रीपूर्वक जन्मभर मिळवूं शकणाऱ्या कुशाभाऊ कारकुनाशीं एखाद्या व्यवहारी स्त्रीनें लग्न केलें तर सुरक्षिततेच्या दृष्टीनें तें अधिक शहाणपणाचें नाहीं काय ?

एका सुप्रसिद्ध विद्वान् गृहस्थाची बायको आपल्या मोटार-ड्रायव्हरचा हात धरून पळून गेल्याची हकीकत माझ्या एका स्त्री-द्वेष्ट्या मित्राला मीं नुकतीच सांगितली; तेव्हां तो शांतपणें म्हणाला, ‘ Woman, like water, finds her own level. ( स्त्री पाण्याप्रमाणें आपल्या पातळीकडे धाव घेते ! ) ’

स्त्रियाविषयीं वाटणाऱ्या आत्यंतिक अनादरामुळें त्यानें हे उद्‌गार काढले हें खरें आहे. पण स्थितिवादित्वाच्या किंवा व्यवहारी दृष्टीच्या अतिरेकामुळें उत्पन्न होणाऱ्या काहीं स्त्रियांच्या कल्पनाशून्यत्वावर किंवा ध्येयहीनतेवर ही चांगलीच टीका आहे.

स्त्रिया स्थितिवादी असतात आणि पुरुष प्रगतिवादी असतात. कुणीं कुणाला कमी समजायचें काहींच कारण नाहीं. या दोन परस्परविरुद्ध प्रवृत्तींच्या संघर्षामुळेंच जगाचा तोल राहतो, आणि त्याची प्रगति होते. पण म्हणून या दोघांना कुणी रथाचीं दोन चाकें म्हणेल तर तें मी ऐकणार नाहीं. घसरत्या घाटावरून खालीं येणाऱ्या आगगाडीचीं पुढलीं-मागलीं एंजिनें म्हणा पाहिजे तर त्यांना !

● ● ●

७२

## तत्त्वनिष्ठा आणि तमासगीर !

मुद्देमालासह एखाद्या चोराला पकडताना पोलिसाला जसा आनंद होतो तसा त्या दिवशीं गणूकाकाना झाला. ते माझ्या खोलींत शिरले तेव्हा माझ्या ओळखीचा एक हस्तसामुद्रिक माझा हात पाहात बसला होता. मला चकित करून टाकतील अशा एक दोन गोष्टी त्या सामुद्रिकानें सांगितल्यामुळें मीही त्याचें बोलणें एकाग्र चित्तानें ऐकत होतों. ' आता सापडलास, जातोस कुठें ! ' अशा मुद्रेनें चष्म्याच्या भिंगावरून माझ्याकडे पाहात उंदरावर झडप घालू पाहणाऱ्या बोक्याच्या पावित्र्यात गणूकाका बसले होते. तो सामुद्रिक दाराच्या बाहेर पडला मात्र आणि गणूकाकानी माझ्यावर झडप घातली.

' का हो, भौतिकतावादी, नवमतवादी, पुरोगामी ! तुमचा या शास्त्रावर कधींपासून विश्वास बसला ? आम्ही जुने लोक उघडपणें या शास्त्रावर आमचा विश्वास आहे असं कबूल करतों म्हणून आम्ही चोर, आणि तुम्ही चोरून हात दाखवतां म्हणून तुम्ही साव काय रे ? '

' कोण चोरून हात दाखवतो आहे ? ' मी म्हणालों, ' मी तर उघड्यावर हात दाखवीत बसलों होतों. चोरून दाखवायचा असता तर कडी लावून घेतली असती; आणि तुम्हालासुद्धा आत घेतलं नसतं. आणि पुन्हा असं पाहा. ज्योतिषशास्त्रावर किंवा हस्तसामुद्रिकावर तुमचा विश्वास आहे म्हणून आम्हीं तुम्हांला कधीं चोर म्हटलं होतं, किंवा शिव्या दिल्या होत्या ? '

' पण तुम्ही भौतिकतावादी, पुरोगामी हीं सर्व शास्त्रं झूट आहेत असं म्हणतां ना ? '

' हो. म्हणतों आणि म्हणणार ! ' मी शांतपणें म्हणालों.

' आणि तरीही आपले हात मात्र दाखवणार — ' गणूकाका चिडून ओरडले, ' चोर कुठले ! '

' हें पाहा काका, तुमच्यात आणि आमच्यात फरक हा, ' मी म्हणालों, ' कीं तुम्हाला एखादी गोष्ट नकोशी किंवा अनिष्ट वाटली, की ती जगात नाहींच असं तुम्ही धरून चालतां; तिचा विचारसुद्धा करायला तुम्ही तयार नसतां. शहामृग ज्याप्रमाणें वाळवंटांत आपलं डोकं खुपसतो आणि जग बुडालं असं समजतो तसं तुमचं आहे. आमचं तसं नाहीं. आम्हांला नको असलेल्या — आमच्या विरुद्ध असलेल्या गोष्टीचासुद्धा सर्व बाजूंनीं विचार करायला आणि त्याचा खरेखोटेपणा पडताळून पाहायला आम्ही तयार असतों. तुमचं ज्योतिष-शास्त्र किंवा सामुद्रिकशास्त्र इतर भौतिकशास्त्राप्रमाणं एक शास्त्र आहे असं तुमच्याप्रमाणं आम्हाला वाटत नसेल, पण त्यांतल्या एक-दोन गोष्टी आम्हाला पटल्या तर त्यात तथ्य तरी किती आहे, हें समजावून घ्यायला आम्ही केव्हाही तयार असतों यालाच शास्त्रीय दृष्टिकोन म्हणतात. तो आमच्यात आहे आणि तुमच्यात नाहीं ! '

' निर्लज्ज आहांत तुम्ही लोक ! ' असें काही तरी पुटपुटत गणूकाका निघून गेले !

गणूकाकाच्या पुढें तत्त्ववेत्त्याचा मोटा आव मीं आणला खरा; पण माझ्यावर विनाकारण तत्त्वच्युतीचा आरोप केल्याबद्दल खरोखरच मला त्याचा मनापासून राग आला होता. अर्थात् गणूकाका थोर मनाचे आहेत, आणि केवळ वितंडवाद करीत बसण्याची जन्मजात खोड असल्यामुळें ते माझ्याशीं वाद घालतात ही गोष्ट वेगळी. पण तत्त्वनिष्ठा आणि तत्त्वच्युति याबद्दल ब्याचशा लोकांच्या काहीं तरी चमत्कारिक कल्पना आहेत खऱ्या. त्यांच्या मतें एखाद्यानें भौतिकतावादाचा म्हणा, साम्यवादाचा म्हणा, किंवा कसल्याही तत्त्वज्ञानाचा म्हणा, एकदां स्वीकार केला, कीं दुसऱ्या

कुठल्याही तत्त्वज्ञानाकडे डोळे उघडून पाहता कामा नये, किंवा त्यासंबंधीं कान उघडे ठेवून कांहीं ऐकता कामा नये. अशा तऱ्हेनें ज्ञानसंपादनाचे सर्व मार्ग बंद करून स्वतःचा शिलारिथ बनविणें म्हणजे खरी तत्त्वनिष्ठा! हे लोक एक साधी गोष्ट विसरतात, कीं तत्त्वज्ञानाकरिता कुणी तत्त्वज्ञानाचा स्वीकार करीत नसतो, जीवनांतलें कांहीं तरी उदात्त ध्येय साधण्याकरितां कुणीही एखाद्या तत्त्वज्ञानाचा स्वीकार करतो. तत्त्वज्ञान हें साधन. तें ध्येय हें साध्य. एखादा भौतिकतावादी ज्योतिषशास्त्रावर विसंबून स्वतःच्या आयुष्याचा आराखडा आखील, किंवा दुसऱ्याला आखायला सांगेल, तर तोंडानें भौतिकतावादाच्या गप्पा करीत कृतींत दैववाद आचरल्याबद्दल त्याला तत्त्वच्युत म्हणतां येईल; पण ज्योतिषशास्त्र काय आहे हें समजावून घेण्याचा प्रयत्न करणें, किंवा त्यांतली एखादी गोष्ट पटली तर ती पटली असें कबूल करणें, म्हणजे खास तत्त्वच्युति नव्हे.

एखाद्यानें आपलें साध्य कितपत साधलें आहे हें न पाहता तो आपल्या तत्त्वज्ञानातल्या अक्षराना कितपत चिकटून राहिला आहे हें पाहणाऱ्या टीकाकारांची मनोवृत्ति मात्र मला पूर्णपणें समजते. कुणी पडो अगर कुणी चढो; जगाचें बरें होवो अगर वाईट होवो, आपणाला थोडी गंमत पाहायला मिळते आहे ना, ही तमासगिराची वृत्ति या टीकाकाराची असते. एखाद्या साम्यवाद्यानें विशिष्ट परिस्थितींत एखाद्या भांडवलवाल्याशीं तडजोड केली, कीं हे रिकामटेकडे तमासगीर तो तत्त्वच्युत झाला म्हणून त्याच्याविरुद्ध एकच गिल्ला करतात. साहाजिकच आहे. तडजोड न होतां तो साम्यवादी त्या भांडवलवाल्याकडून हकनाहक चिरडला गेला असता म्हणजे चार दिवस या तमासगिराना मजा पाहता आली असती! अर्थात् तडजोड न केल्यामुळें साम्यवादाचा फायदा होणार असता, किंवा भांडवलशाहीला धक्का बसणार असता तर ती तडजोड करणारावर तत्त्वच्युतीचा आरोप खात्रीनें करतां येईल. पण ज्या तडजोडीमुळें भांडवलवाल्याचा कांहीं एक फायदा न होतां तो साम्यवादी जिवंत राहून त्या भांडवलवाल्याचें अधिक नुकसान करूं शकतो, ती तडजोड तत्त्वनिष्ठेला मुळींच बाधक नाहीं. या तमासगिरांच्या टाळ्या मिळविण्याकरितां किंवा 'हुतात्मा' म्हणून स्वतःचे

जयजयकार करून घेण्याकरिता साध्यावर तिलांजली देऊन शत्रूंच्या जाळ्यांत चालत जाणारे खुळे तत्त्वनिष्ठ पुष्कळ असतात. खऱ्या तत्त्वनिष्ठ माणसानें या तमासगिरांना खूश करण्याच्या भानगडींत न पडतां साध्यावर नजर ठेवून आपल्या तत्त्वाचें पालन करावें हेंच बरें.



## ७३

### आपण कोलंबस !

आज सकाळीं माझा एक मित्र आश्चर्यचकित होऊन माझ्याकडे आला. आमच्या दोघाच्याही एका तरुण मित्रानें एका विशिष्ट मुलीशीं लग्न करायचें नक्की ठरविलें आहे, हें मला सागायला तो आला होता. तो आश्चर्यचकित व्हायचें कारण असें कीं त्या मुलीचा पूर्वेतिहास आम्हा दोघांना चांगलाच माहीत होता; आणि आम्ही दोघांनींही आमच्या त्या तरुण मित्राला शक्य तितक्या स्पष्ट शब्दात धोक्याची सूचना दिली होती. आतांपर्यंत तीन लोकाशीं वचनभंग करून तिनें त्यांच्या आयुष्यातल्या कांहीं वर्षांची नासाडी केली होती. या सर्व गोष्टींचें यथार्थ ज्ञान आम्ही आमच्या मित्राला करून दिलें होतें. आणि तरीही तो तिच्या जाळ्यांत उडी घेत होता. माझ्या खोलींत आल्याबरोबर खुर्चीवर अंग टाकून माझा मित्र उद्गारला, ‘ मला मोठं आश्चर्य वाटतं बुवा मनुष्य-स्वभावाचं ! इतकं सांगून-सवरूनही हा गृहस्थ आपल करायच तें करतो आहे ! ’

त्याची चरफड पाहून मला हंसू आलें.

‘ हंसतोस काय ? ’ तो चिडून म्हणाला, ‘ तूं सुद्धा माझ्याबरोबरच त्याला परोपरीनं समजावून सांगितल होतंस; आणि तुला काहींच कसं वाटत नाहीं ? ’

'मला कांहींच वाटत नाहीं असं नाहीं.' मी म्हणालों, 'पण मला तुझ्याइतकं आश्चर्य नाहीं वाटत. मित्रकर्तव्य म्हणून आपण त्याला सावधगिरीची सूचना दिली खरी, पण तो त्याप्रमाणं वागेलच अशी माझी खात्री नव्हती. पुढच्यास ठेंच आणि मागचा शहाणा, अशी क्रमिक पुस्तकांत म्हण असेल, पण माणूस दुसऱ्याच्या अनुभवानं मुळींच शहाणा होत नाहीं असा माझा अनुभव आहे ! पुढच्याला ठेंच लागली, तर तो पुढें जाणारा माणूसच गाढव होता,—तो नीट खालीं पाहून चालत नव्हता; मी शहाणा आहें,—मी तशी चूक करणार नाहीं, या घमेंडींत मागला पुढें पाऊल टाकतो, आणि ठेंचाळून पडतो ! फार काय, मीं त्याचा एवढा उपदेश केला ना ? पण मीसुद्धां त्या मुलीच्या जाळ्यांत सापडलों असतों. कुणीं सांगावं ?'

'आता कांहीं बोलणंच उरलं नाहीं !' माझा मित्र म्हणाला.

मात्र वस्तुस्थिति अशी असली, तरी या गोष्टीचें मला मुळींच वाईट वाटत नाहीं. एक जर्मन तत्त्वज्ञ माणसांच्या या मठ्ठपणामुळें चिडून म्हणतो, 'इतिहास वाचून माणूस जर काहीं शिकत असेल तर तें हेंच, कीं इतिहास वाचून कुणी शिकत नाहीं !' या तत्त्वज्ञाइतकें निराश व्हायचें मला कांहींच कारण दिसत नाहीं. इतरांच्या अनुभवानें शहाणा न होता, स्वतः अनुभव घेण्याकरितां माणून पुन्हा पहिल्यापासून सर्व काहीं सुरुवात करतो म्हणून जग जिथेंच्या तिथें राहील—माणसांची कांहींच प्रगति होणार नाहीं, असें मला मुळींच वाटत नाहीं. पुढला ठेंचाळणारा मूर्ख होता,—मी शहाणा आहें, या प्रत्येक माणसाला वाटणाऱ्या घमेंडीनच जगाच्या प्रगतीचें बीज आहे असेंच उलट मला वाटतें.

या आत्मविश्वासामुळेंच ज्या परिस्थितीपुढें इतर हातपाय गाळून स्वस्थ बसतात तिच्याशीं झुंज खेळून एखादा वीरमानव तिला आपल्यापुढें वाकवतो. वैयक्तिक आत्मविश्वासापेक्षां वास्तविक परिस्थिति खूपच बलवत्तर असते; आणि तिच्यापुढें बरेचसे ठेंचाळून पडतात हें खरें आहे. पण म्हणून इतरांना ठेंचाळलेले पाहून सर्वच हात जोडून बसतील,—तिच्याशीं झुंज खेळायला कुणीच तयार होणार नाहीं, तर मग माणूस निसर्गाचा कर्मयोगी

विजेता न होता त्याच्या हातचें एक दैववादी खेळणें होईल,– त्याची प्रगति न होतां तो हळूहळू रसातळाला जाईल. त्या मुलीनें तिघाना फसविलें असेल. पण त्राटिकेला नरम आणणाऱ्या प्रतापरावाप्रमाणें आमचा मित्र तिला ताळ्यावर आणणार नाहीं कशावरून? नवे प्रदेश शोधायला बाहेर पडलेले बरेचसे खलाशी पुन्हा कधींच परत आले नाहींत म्हणून कोलंबसानें आपलें गलबत हांकारायचें नाकारलें असतें, तर अमेरिका खंड आमच्या कधींच दृष्टीला पडलें नसतें!



७४

## भावना आणि कला

कला आणि जीवन यांच्या परस्परसंबंधासंबंधीं तुझें काय मत आहे, असें मला एकानें विचारलें असतां त्याला मीं पुढील गोष्ट सांगितली.

एकदां एक तरुण मुलगा आपलें एक प्रेमगीत मला दाखवायला घेऊन आला.

'कशी काय वाटते तुम्हाला ही कविता ?' त्यानें मला विचारलें.

'कविता बरी आहे.' मी म्हणालों, 'पण तिच्यांत हवी होती तितकी भावनाची उत्कटता मुळींच नाहीं. त्यामुळं ती अगदीं मामुली वाटते.'

'काय, म्हणता काय तुम्ही ?' तो पोरगा आश्चर्यानें उद्गारला, 'अहो, मीं ही कविता काहीं नुसती कल्पनेनं लिहिलेली नाहीं. एका मुलीवर माझं खरोखरच अत्यंत उत्कट प्रेम आहे. आणि तुम्ही म्हणतां कवितेंत भावनांची उत्कटता नाहीं ?'

'अरे वेड्या,' मी त्याला म्हणालों, 'तुझं त्या मुलीवर जर इतकं प्रेम आहे तर इकडे कविता खरडीत काय बसलाहेस ? आधीं जा, आणि त्या पोरीला हस्तगत कर. नाहीं तर उत्कट प्रेमानं रसरसून तूं इकडे बसशील कविता लिहीत, आणि कवितेपेक्षा अधिक सरळ मार्गांनीं आपल्या

प्रेमाचं उत्कटत्व व्यक्त करणाऱ्या एखाद्या तरुणाचा हात धरून ती पोरगी जायची निघून ! '

जीवन आणि कला यांचे हे असे संबंध असावेत असें मला वाटतें. प्रथम जीवनाची कला आणि नंतर मग इतर सर्व कला ! तें असो. पण वरील तरुण कवीच्या गोष्टीची आठवण झाली, कीं मला आश्चर्य वाटतें तें कलानिर्मितीविषयीं सर्वसाधारण माणसाच्या ज्या चमत्कारिक कल्पना आहेत त्याचें. एखाद्याचें एखाद्या मुलीवर उत्कट प्रेम असलें म्हणजे तें उत्कटत्व तो आपल्या कवितेंत जसेंच्या तसें आणूं शकतो असें मुळींच नाहीं. त्याचप्रमाणें उत्कट प्रेमाचें उत्कृष्ट प्रेमगीत एखादा लिहूं शकतो म्हणून त्यालाच काय तें उत्कट प्रेम वाटतें आणि इतराना वाटत नाहीं असेंही नाहीं. शेले किंवा कीट्स्, गोविंदाग्रज किंवा माधव ज्यूलियन उत्कृष्ट प्रेमकाव्यें लिहूं शकतात म्हणून त्यानाच तेवढें दयितेविषयीं प्रेम वाटतें,— इतराना वाटत नाहीं, असें थोडेंच आहे ? इतरानाही त्याच्याइतकेंच किंबहुना त्याच्यापेक्षाही अधिक प्रेम वाटत असेल. प्रेम सर्वांनाच वाटतें. पण शब्दांच्या अगर कुंचल्याच्या सहाय्यानें त्याचें जिवंत चित्र एखादाच उभें करूं शकतो. हीच प्रतिभा. हीच कला. इतरात आणि कलावंतात फरक हाच.

पण पुष्कळाना हा फरक कळतच नाहीं. त्यांना वाटतें, एखादा हुशार वकील रंगभूमीवर वकिलाचें काम उत्तम करूं शकेल, किंवा एखादा रागावलेला मनुष्य रागाच्या भरात उत्तम संतापयुक्त लिखाण लिहील. एका इंग्लिश संपादकाची एकदा अशीच गंमत झाली. तो एक उत्तम संपादक होता. पण लिहिण्याचें काम तो स्वतः करीत नसे. महत्त्वाची व मोलाची माहिती मोठ्या कौशल्यानें तो मिळवीत असे, आणि त्याच्या हाताखालचे लोक तिचा उपयोग करून परिणामकारक लेख लिहीत. एकदा काहीं संतापजनक दुष्कृत्य करताना विरुद्ध पक्षाच्या एका पुढाऱ्याला त्यानें पाहिलें. ' आता त्याची चांगलीच रेवडी उडवतों ! ' असा विचार करून तो लगबगीनें कचेरींत आला आणि कागद-पेन्सिल घेऊन एकदम लिहायला बसला ! आज संपादक स्वतः लिहायला बसलेले पाहून त्याच्या हाताखालच्या लोकांना

आश्चर्य वाटलें. दोन-चार ओळी त्यानें रागांत खरडल्या. पण पुढें काही केल्या जमेना. तेव्हां हाताखालच्या माणसाला हाक मारून तो ओरडला, ' काय करूं रे ! असं असं करताना त्याला मीं प्रत्यक्ष पाह्यलं. अशी रेवडी उडवणार होतों त्याची. पण जाऊं द्या. तूंच लिही ! '

आणि त्याच्या उपसंपादकानें नेहमींप्रमाणें सुंदर संतापजनक लेख लिहिला !

मात्र याचा अर्थ असा नव्हे, कीं ज्याला जें वाटतें तें तो व्यक्त करूं शकतोच असें नाहीं, म्हणून जो व्यक्त करूं पाहतो त्याला तसा काहींच अनुभव नसला तरी चालेल. खरोखरीचा राजा रंगभूमीवर राजाचें काम उत्कृष्ट करीलच असें नाहीं हें जितकें खरें, तितकेंच राजा म्हणजे काय याची कल्पनाही नसलेला वाटेल तो कंगाल राजाचें काम करूं शकणार नाहीं, हेंही खरें आहे. एका राजकन्येच्या स्वयंवराला बरेचसे राजे जमले आहेत असा देखावा एका चित्रपटांत एकदां घ्यायचा होता. तेव्हां स्टूडिओं-तल्या सर्व गडी-नोकरांना राजाचे कपडे घालून दिग्दर्शकानें ' सीन 'मध्यें आणलें होतें. एक राजा इकडून तिकडे जातो असें दाखवावयाचें होतें. त्या राजाचें काम करणारा इसम कांहीं केल्या व्यवस्थितपणें चालेना; तेव्हा दिग्दर्शक त्याला म्हणाला, ' अरे, किती वेळां सांगायचं तुला ? जरा राजाच्या रुबाबांत चाल ! '

तेव्हा राजाचें काम करता करता मेटाकुटीला आलेला तो इसम ओरडला, ' पंधरा रुपये पगार ! तो सुद्धा गेल्या चार महिन्यांत तुम्हीं दिलेला नाहीं ! पोटांत नाहीं अन्न गेले चार दिवस; आणि म्हणे राजाचा रुबाब आण ! '

● ● ●

## ८५

### दोन मेणबत्त्या !

स्वाक्षरी घेण्याकरितां म्हणून माझ्याकडे त्या दिवशीं आलेल्या त्या मुलानें मला खरोखरच मोठ्या पेंचात टाकलें. द्यावी स्वाक्षरी आणि एकदा मोकळें व्हावें म्हणून त्याच्या हातातलें पुस्तक घेऊन मी सही करणार तों तो एकदम म्हणाला, 'छे छे, मला नुसती स्वाक्षरी नको. माझा एक प्रश्न आहे, आणि त्याला उत्तर म्हणून पाच-सहा ओळी लिहून नंतर तुम्हीं सही केली पाहिजे.'

'कसला प्रश्न?' मी म्हणालों.

'मनुष्याच्या आयुष्यांतला अत्यंत सुखाचा क्षण कोणता?' तो पोरगा गंभीरपणें उद्गारला, 'या प्रश्नाला एक चार-पाच ओळींचं उत्तर लिहा, आणि नंतर सही करा.'

त्याचा प्रश्न ऐकून मी थक्कच झालों. 'अरे बाबा,' मी म्हणालों, 'ज्या प्रश्नाचं उत्तर देतांना मोठमोठया तत्त्वज्ञान्यांच्यासुद्धा नाकीं नऊ आले, त्या प्रश्नाचं उत्तर तूं माझ्याकडे मागतोस! काय वेड लागलंय तुला! मला नाहीं कांहीं उत्तर देतां येत या प्रश्नाचं. पाहिजे तर सही घे. आणि जा.'

'तत्त्वज्ञान्यांचीं मतं मला नको आहेत.' तो म्हणाला, 'तुमच्या-

सारख्या लोकांचींच हवीं आहेत. तुम्हांला काय वाटेल तें लिहा हीं पाहा, पुष्कळ लोकांनीं या प्रश्नाला उत्तरं लिहिलीं आहेत. '

'मीं नाहीं त्यांच्याइतका शहाणा,' मी त्रासून म्हणालों, 'मला खरंच कांहीं सुचत नाहीं. काय, थट्टा आहे काय अशा प्रश्नाचं ताबडतोब उत्तर द्यायचं म्हणजे?'

'आत्तांच देऊं नका,' तो काकुळतीस येऊन म्हणाला, 'ही चोपडी इथंच राहूं द्या. मी उद्यां येतों. परवां येतों,– तुम्ही सागाल तेव्हां येतों.'

त्या हुशार छोकऱ्याच्या पाणीदार डोळ्यांत इतकी कळकळ दिसत होती, कीं मला नाहीं म्हणवेना. 'बरं बरं, ठेवून दे ती चोपडी इथं,' मी म्हणालों, 'आणि ये उद्या-परवा.'

त्या दिवशीं दुपारपर्यंत मी कामात असल्यामुळें त्याच्या प्रश्नाचा विचार करायला मला वेळच झाला नाहीं. पण त्यानंतर संध्याकाळीं एकामागून एक तीन प्रसंग घडले. ते मात्र माझ्या मनांत घोळत असलेल्या त्या प्रश्नाचें उत्तर देण्याकरितांच घडले असें आतां मला वाटतें. खूप श्रीमन्त असलेल्या माझ्या ओळखीच्या एका गृहस्थाकडे कांहीं कामाकरितां मी गेलों. तो घरीं नव्हता. त्याची बायको चिंतातुर चेहरा करून बसली होती.

'काय हो, कुठं गेले?' मीं विचारलें.

'तो नवीन जर्मन डॉक्टर आला आहे ना, त्याच्याकडे गेलेत. मींच जा म्हणून आग्रह करून पाठवलं त्याना.' ती म्हणाली.

'म्हणजे? झालं काय?' मी म्हणालों.

'अहो, काय नी काय! त्यांच्यामागली एक काळजी जाते तर दुसरी लागते! खडकीच्या बंगल्याची राखण करायला पठाण ठेवला; तो पठाणच चोरी करून पळाला! तें तुम्हांला माहीतच आहे. ती भानगड संपली नाहीं तों आतां इन्कम-टॅक्सची केस उभी राहिली आहे. त्यांना अलीकडे झोंप-सुद्धां कशी ती लागत नाहीं. अन्नपाण्यावर तर वांछाच नाहीं. तेव्हां मीं म्हटलं, निदान त्या नवीन डॉक्टरच्या औषधानं तरी जरा बरं वाटेल.'

'असं होय?' मी म्हणालों.

तिथून निघालों तों आगगाडींत बसून मी घरीं परत येत होतों. मजूर

चळवळींत काम करणारा माझा एक जुना मित्र डब्यांत भेटला. खूप आनंदात होता तो. आपल काम कसं शिस्तींत चाललं आहे आणि चळवळीला कसा जोर वाढतो आहे याचें रसभरीत वर्णन तो करीत असतां त्याच्या डोळ्यात विलक्षण चमक दिसत होती. त्याचे डोळे खोल गेले होते. त्याची दाढीही बोटभर वाढली होती.

'तुझे डोळे किती खोल गेलेत!' मी म्हणालों, 'काय झालंय रे तुला?'

'हट्, ' तो उद्गारला, 'मला काय झालंय! मी चागला मजेंत आहें. डोळे खोल गेले आहेत कीं वर आले आहेत तें मला माहीत नाहीं. गेल्या पंधरा दिवसात आरशांत तोंड पाहायला मला वेळच झाला नाहीं. आता दाढीविषयी म्हणशील तर दाढी करायला सध्या आपल्या खिशांत पैसे नाहींत, बुवा!'

इतक्यात परळ स्टेशन आलें; आणि माझ्याशीं हस्तादोलन करून मोठ्या चैनींत शीळ घालीत तो निघून गेला.

एकामागून एक घडलेल्या या दोन प्रसंगाचें मला मोठें आश्चर्य वाटत होतें. स्वतःच्या अपरंपार सुखात आणखी भर घालण्याकरिता इन्कम-टॅक्स चुकवून पंधरा लाखाचे सोळा लाख करण्याकरिता जीव पाखडणारा, आणि ठिकठिकाणच्या अनेक बंगल्यात हजारों रुपयाचें फर्निचर धूळ खात पडलेले असताना खडकीच्या बंगल्यांतली चार खुर्च्या-टेबलें पठाणानें पळवलीं म्हणून हाय खाणारा आमचा हा श्रीमन्त दोस्त दुःखी आणि चिन्ताग्रस्त! आणि एम. ए. झाल्यावर घरीं चालत आलेल्या लठ्ठ पगाराच्या नोकऱ्या लाथाडणारा, आणि कधीं काळीं दलित जनता स्वतंत्र होऊन सुखी होईल म्हणून स्वतःच्या सुखाची यत्किंचितही पर्वा न करतां इतराच्या सुखासाठीं कधीं उपाशी तर कधीं अर्धपोटीं वणवण फिरणारा हा कॉमरेड मजेंत आणि सुखी!

हे आणि असेच दुसरे विचार करीत मी रात्रीं घरीं परत आलों. आणि तो तिसरा प्रसंग घडला. मला मेणबत्तीच्या थंड प्रकाशांत वाचीत बसणें फार आवडतें. म्हणून खुर्चीवर उभा राहून फळीवरल्या मेणबत्त्या मी शोधूं

लागलों. एक मेणबत्ती सबंध जळून गेलेली होती. मेणबत्ती अशी क्वचितच जळते. तिचें अस्तित्व दाखविण्यापुरता फक्त पैशाएवढा मेणाचा अवशेष शिल्लक होता; दुसरी मेणबत्ती कित्येक दिवस फळीवर धूळ खात पडल्यामुळें मुंग्याझुरळांनीं ती सबंध कुरतडून अजिबात निरुपयोगी केली होती. तशा स्थितींत पडलेल्या त्या दोन मेणबत्त्या पाहून, का कुणास ठाऊक, मला थोडेंसें हंसू आलें; आणि दुसऱ्याच क्षणीं एक चमत्कारिक विचार माझ्या डोक्यात आला. ज्या दोन माणसांचा मी विचार करीत होतों तीं दोन माणसें या दोन मेणबत्त्यासारखीं आहेत ! आपला जीव निर्धोक ठेवण्यांत — स्वतःच्या सुखाची राखण करण्यात गुंतून पडलेल्या एकाचें आयुष्य कुरतडलें जात आहे, आणि इतरांना मंद सुखकर प्रकाश देत असलेल्या दुसऱ्याची जीवनज्योत जळत चालली आहे.

समजा, त्या मेणबत्त्याना जीव असता तर आपला कुणाला कसलाच उपयोग झाला नाहीं — आपलें आयुष्य कुजून गेलें, हा दुःखमय विचार मरता मरतां एकीच्या मनात आला असेल; आणि आपल्या जीवनाचें सार्थक झालें — शेवटच्या घटकेपर्यंत आपण सर्वांना प्रकाश दिला, या सुखदायी तंद्रींत त्या दुसरीच्या आयुष्यांतला शेवटचा क्षण संपला असेल !

मनुष्याच्या आयुष्यातला अत्यंत सुखाचा क्षण कोणता, या प्रश्नाचें उत्तर त्या मुलाला पाहिजे होतें, नाहीं का ? मिळालें मला उत्तर. मनुष्याच्या आयुष्यांतला अत्यंत सुखाचा क्षण, म्हणजे हा अशा प्रकारचा शेवटचा क्षण ! टेबलावर पडलेली त्याची चोपडी मीं घेतली, आणि त्यावर लगेच खरडलें, '... हा खरा सुखाचा क्षण ! स्वतःसाठीं जगलास तर मेलास; दुसऱ्यासाठीं जगलास तरच जगलास ! '



७६

## कानांत आणि मनांत

माणसाच्या मनांत कांहीं विचार असतात; पण केव्हां केव्हा ते त्याचे त्यालाच स्पष्ट झालेले नसतात. मात्र त्यांसंबंधीं दुसऱ्या कुणाबरोबर वाद करण्याचा प्रसंग आला, कीं ते स्पष्टपणें मांडणें त्याला भाग पडतें. आणि मग ते दुसऱ्याला स्पष्ट करून सागण्यापूर्वीं त्याला पहिल्यांदा ते स्वतःशीं स्पष्ट करावे लागतात. वेळीं अवेळीं गणूकाका माझ्याशीं वाद घालतात, त्यामुळें माझा दुसरा कांहीं फायदा होत नसला, तरी एक फायदा मात्र खात्रीनें होतो. माझे स्वतःचेच विचार अधिक स्पष्टपणें माझ्या डोळ्यांपुढें उभे राहतात.

परवा कुणा तरी एका विद्वान् साहित्यिकाचें 'ललित वाङ्मय आणि सामाजिक सुधारणा' या विषयावर एक विद्वत्ताप्रचुर व्याख्यान ऐकून गणूकाका परत आले; आणि तो साहित्यिक त्यांच्या तावडींतून सहीसलामत सुटल्यामुळें त्यांनीं माझ्यावरच प्रश्नांचा मारा सुरू केला!

'मी म्हणतों,' ते जोरजोरानें सांगूं लागले, 'तुमच्या लघुकथा-कादंबऱ्यांनीं कांहीं दगडसुद्धा सामाजिक सुधारणा होत नाहीं. तुमच्या पुनर्विवाहावरल्या कादंबऱ्या वाचून कितीसे पुनर्विवाह झाले? आणि तुमचीं दारूसंबंधीं नाटकें पाहून कितीशा लोकांनीं दारू प्यायची सोडली? थोर

थोर समाज-सुधारक समाज-सुधारणेचं कार्य करून मोठेपणा मिळवतात, म्हणून हे गोष्टी नी कविता खरडणारेही म्हणूं लागले, कीं आम्ही मोठे लोक आहोंत, —आम्हीही समाज-सुधारणा करतों.'

'थोडा वेळ तुमचं म्हणणं खरं आहे असं मी धरून चालतों, काका,' मी म्हणालों, 'पण तुमचे थोर थोर समाज-सुधारक सुधारणेचं कार्य करतात तुम्ही म्हणता, तें ते कसं करतात? मी आपली सहज माहिती विचारतों.'

'भोळेपणाचा आव आणून मला तूं अडवूं शकशील असं समजूं नकोस.' काका म्हणाले, 'तुझ्या याही प्रश्नाचं मी उत्तर देऊं शकेन. व्याख्यानं देऊन किंवा लेख लिहून पुनर्विवाहाचं म्हणा, किंवा दारूबंदीचं म्हणा महत्त्व लोकाना ते पुरेपूर पटवून देतात; आणि त्याशिवाय हें कार्य धडाक्यानं चालवण्याकरिता ते निरनिराळ्या संस्था काढतात ती गोष्ट वेगळीच.'

'म्हणजे, या संस्था काढण्यापूर्वी किंवा काढल्यावरही व्याख्यानानी किंवा लेखानीं, म्हणजे भाषेचं साधन वापरूनच ते काय करायचं तें कार्य करतात.' मी हंसत हंसत म्हणालों, 'मग लेखक आणखी दुसरं काय करतो? पुनर्विवाहावर शोकान्त नाटक लिहून किंवा दारुड्याच्या संसाराचं विदारक चित्र आपल्या कादंबरीत रेखाटून तो याच साधनानं लोकाच्या मनावर हवा तो परिणाम करतो!'

'हीच तर माझी तक्रार आहे.' गणूकाका ओरडले, 'अरे, दारूचे काय भयंकर परिणाम होतात किंवा पुनर्विवाहामुळें समाजाचे किती फायदे होण्याचा संभव आहे हें लोकांना सरळ सरळ सांगणं शक्य असतांना, तुम्ही लोक तेंच सांगण्याकरिता नाटकं लिहून तीं रंगभूमीवर करून दाखवण्याच्या आणि कादंबऱ्या छापून प्रसिद्ध करण्याच्या खर्चाच्या नी त्रासाच्या आडमार्गांत शिरतां!'

गणूकाकांचे शब्द ऐकून कुणालाही असेंच वाटेल, कीं जीवनांतलें एखादें सत्य सरळ सरळ उघडपणें सांगणारा प्रचारक आणि तेंच सत्य सांगण्याकरितां ललितकृतींचें अवडंबर उभें करणारा कलावंत, या दोघामध्यें हा द्राविडी प्राणायाम करणारा कलावंत वेडाच नाहीं तर काय? मलाही क्षणभर तसेंच वाटलें. पण इतक्यांत एका गोष्टीची मला आठवण झाली:

एका सुप्रसिद्ध युरोपियन नटासंबंधीं ती गोष्ट आहे. आपल्या बायकोविषयीं वाईट संशयानें पछाडलेल्या एका हुशार तरुणाची समजूत घालण्याचा नाना प्रकारानीं त्याचे मित्र प्रयत्न करीत होते. जीव तोडून त्या मुलीचें निरपराधित्व ते त्याला पटवून देत होते. पण त्याच्यावर त्याचा कांहीं परिणाम होत नव्हता. एकदां सहज त्याला घेऊन ते एक नाटक पाहायला गेले. असूयेचाच विषय त्या नाटकात रंगविलेला होता. नाटकांत मुख्य काम करणाऱ्या नटाचें काम त्या दिवशीं इतकें उत्कृष्ट झालें, कीं तो तरुण देहभान विसरून रंगभूमीवर धांवत गेला, आणि बायकोचा संशय घेतल्याबद्दल आपणाला मनापासून पश्चात्ताप होतो आहे, असें डोळ्यांत पाणी आणून त्या नटाला सांगूं लागला! कुठल्या तरी रंगभूमीचा इतिहास वाचताना ही गोष्ट खरोखरच घडल्याचें वाचलेलें मला आठवतें.

प्रचारकानें सांगितलेलें सत्य आणि कलावंतानें सांगितलेलें सत्य यातला फरक हाच. प्रचारक जीवनातली एखादी दुःखदायक किंवा संतापजनक घटना पाहतो, आणि त्याला वाटलेलें दुःख किंवा संताप तो आपणाला निवेदन करतो. आणि त्याचें दुःख किंवा संताप पाहून मग आपणाला दुःख होतें किंवा संताप येतो. अशा आडमार्गानें ती घटना आपल्या मनावर परिणाम करते. कलावंत तीच घटना आपल्यापुढें जिवंत उभी करतो. आणि तिच्या प्रत्यक्ष अनुभवानें आपण दुःखित किंवा संतप्त होतों. कलेचा मार्ग हा असा सरळ आहे. जीवनांतलें सत्य प्रचारक तुमच्या कानात सांगतो; कला तेंच तुमच्या मनात फुलवते!





## माणसाचें जग

चराचर सृष्टींत माणसाचें महत्त्व किती आहे यासंबंधीं किंचित् आवेशानें माझ्या एका तत्त्वज्ञ मित्रासमोर मी बोलत होतों. माझें बोलणें संपताच माझी कींव आल्यासारखा चेहरा करून स्मित करीत तो म्हणाला, ' काय वेडगळ लोक आहात तुम्ही ! शेणकिड्याला ज्याप्रमाणं शेणाचा गोळा म्हणजे सारं जग आणि आपण त्या जगाचा राजा असं वाटतं, त्याचप्रमाणं साऱ्या विश्वाचा मध्यबिंदु म्हणजे माणूस असं तुम्हां लोकाना वाटतं. एखाद्या उंच माणसाला आपल्या उंचीची घमेंड वाटते तेव्हा त्याच्या लक्षात येत नाहीं कीं तो उंच म्हणजे इतर माणसापेक्षां उंच; ताडाच्या झाडाशीं तुलना केली तर तो ठेंगूच ! ताडाच्या झाडाला जर बोलता येईल तर या घमेंड-खोराला तें मोठ्यांदा हंसून सागेल, ' क्षुद्र कीटका, किती रे ठेंगणा तूं ! ' चराचर सृष्टींत माणसाला तूं जें महत्त्व देतोस तोही एक यातलाच प्रकार आहे. '

' अहो शहाणे, ' मी माझ्या मित्राला म्हणालों, ' तुमच्या त्या ताडाच्या झाडाला बोलता येईल तेव्हां हंसूं द्या त्याला माणसाला ठेंगू म्हणून; पण तोंपर्यंत माणसांना आपल्या उंचीची घमेंड मिरवायला काहीं हरकत नाहीं. तुझा आइन्स्टीन् आणि त्याचं तें सापेक्षतेचं तत्त्वज्ञान मला कळतं पण आपण माणसं आहोंत तेव्हा माणसांच्याच दृष्टीनं सर्व

गोष्टींचा आपण विचार करावा हें बरं. आपण झाडं किंवा जनावरं झालों, मग त्या दृष्टीनं आपण विचार करूं, हं ! '

माणसाला त्याच्या क्षुद्रपणाची वेळोवेळीं आठवण करून देणाऱ्या या तत्त्ववेत्त्यांचा खरोखरच मला राग येतो. माणसानें माणसाच्या दृष्टीनें प्रत्येक गोष्टीचा विचार केला तर त्यात चुकलें काय ? मात्र अहंपणानें फुगून गेलेल्या एखाद्या ' मी 'ला विश्वाच्या संसारातलें त्याचें योग्य स्थान केव्हा केव्हां दाखवून देणें प्राप्त असतें हें मी कबूल करतों. सबंध देशावर सर्वाधिकारित्व गाजवणाऱ्या एका हुकूमशहानें एकदा एका थोर शास्त्रज्ञाला कांहीं कारणामुळें बंदीखान्यात टाकलें; आणि त्याच्यापुढें छाती काढून उभा राहून तो हुकूमशहा म्हणाला, ' मी कोण हें तुला माहीत आहे ? '

' हो; पूर्णपणें माहीत आहे. ' तो वृद्ध शास्त्रज्ञ शांतपणें म्हणाला, ' ऐक, सांगतों. आपल्या पृथ्वीपेक्षा सहस्र कोटी पटीनं मोठे असे अनेक तारे आणि ग्रहगोल एकंदर विश्वात आहेत. या अगणित गोलांपैकीं पृथ्वी हा एक लहानसा गोल आहे. या गोलाचा एकदशसहस्रांश भाग म्हणजे आपला देश. आपल्या देशांत एकंदर एक कोटी लोक आहेत. या लोकसंख्येचा एककोट्यांश भाग म्हणजे तूं ! किंवा, या साऱ्या विश्वाला जर वाळवंटाची उपमा दिली, तर वाळूंतला एक कण म्हणजे ही पृथ्वी. त्या कणांतल्या सहस्रलक्ष अणूंपैकीं एक अणु आपला देश. आणि या अणूंतल्या एक कोटी परमाणूंपैकीं एक परमाणु तूं ! कळलं तूं कोण आहेस तें ? '

या शास्त्रज्ञाचें म्हणणें अगदीं खरें आहे. आणि तरीही माणसें आहेत म्हणूनच मला जगाची किंमत वाटते. ' तुला तुझा देश प्रिय वाटतो का ? ' असें कांहीं लोक मला विचारतात; तेव्हा ' तो मला अत्यंत प्रिय वाटतो, ' असें मी मोठ्या अभिमानानें सांगतों. पण याचा अर्थ असा नव्हे, कीं हिंदुस्थान या नावाचा जमिनीचा एक भला मोठा त्रिकोणी तुकडा आहे, तो मला अत्यंत प्रिय वाटतो. एवढे किंवा याहूनही मोठे जमिनीचे तुकडे कितीतरी आहेत. मला हिंदुस्थान माझा वाटतो याचें कारण त्यात माझे हिंदी लोक आहेत म्हणून. जमिनीची आणि दगड-धोंडयांची मला मुळींच किंमत वाटत नाहीं.

या दगड-धोंड्याची मला आठवण झाली. इतिहासप्रसिद्ध स्थळें पाहण्याची लहानपणीं मला मोठी हौस होती. अलीकडे मात्र मला तसें मुळींच वाटत नाहीं. आणि त्याला कारणें आहेत. वसईच्या वेढ्याची रोमांचकारी हकीकत लहानपणीं एकदा मीं वाचली. 'किल्ला सर होत नसेल तर तोफेच्या गोळ्यान माझं डोकं उडवा आणि तें किल्ल्यात जाऊन पडेल असं करा,' हे अंतःकरण थरारून टाकणारे चिमाजी अप्पाचे शब्द माझ्या कानात घुमूं लागले; आणि वसईचा किल्ला पाहण्याची अनिवार इच्छा मला झाली. काहीं दिवसानीं खरोखरच तो किल्ला पाहायला मी गेलों. मला आनंद तर झाला नाहींच, उलट गवत वाढलेलें तें ओसाड ठिकाण, ते काळवंडलेले दगड आणि त्या भकाप भिंती पाहून विलक्षण खिन्नता माझ्या मनाला आली. आपल्या देशाच्या गतवैभवाची आठवण होऊन मला दुःख झालें, अशातला मुळीच प्रकार नाहीं. गतवैभवापेक्षाही मोठें वैभव माझ्या देशापुढें वाढून ठेवलें आहे असें मला वाटतें. आपल्या मनांत एखाद्या ऐतिहासिक स्थळाचा जेव्हा विचार येतो तेव्हा पराक्रमी पुरुष आपलीं वीर्यशाली कृत्यें करीत आहेत, असें माणसांनीं गजबजलेलें जिवंत चित्र आपल्या डोळ्यापुढें उभें राहतें. आणि आपण प्रत्यक्ष पाहायला जातों तेव्हा दृष्टीला पडतात हीं काटेरी झुडुपें आणि हे फुटके दगड! अशी दारुण निराशा झाल्यामुळेंच आपल्या मनाला खिन्नता येते. या दगड-धोंड्याना काय पाहायचें? या स्थळांची प्रेक्षणीयता, तीं धिप्पाड माणसं एथें वावरत होतीं तेव्हा.

म्हणूनच अलीकडे मला कुणीं एखादा जुना किल्ला किंवा पुराणा राजवाडा पाहायला बोलावलें कीं मी त्याना स्पष्ट सांगतों, 'ते पडके बुरूज, त्या कोसळणाऱ्या भिंती व कोळिष्टकांनीं भरलेले ते काळोखे कोनाडे पाहून दुःखीकष्टी होऊन परत यावंसं मला वाटत नाहीं. त्यापेक्षां घरच्या घरीं डोळे मिटून स्वस्थ बसण्यात, आणि लाल मुंडाशीं डोक्याला बांधलेले असंख्य मावळे भाले-बरच्या हातांत घेऊन आणि पाठीला ढाली बांधून तोरणा किल्ल्याच्या तटावर चढत आहेत, आणि आपल्या काळ्या घोडीवर स्वार झालेले तरुण, तेजःपुंज शिवाजीराजे विजेसारख्या तळपणाऱ्या आपल्या तलवारीनं त्यांना पुढचा मार्ग दाखवीत आहेत, असं चित्र डोळ्यांपुढं रंगवण्यांत आणि त्यात कांहीं क्षण रंगून जाण्यांतच मला अधिक मौज वाटते.'

छे छे दगड-धोंड्यांचें जग मला नको. ज्यांच्यावर मी प्रेम करूं शकतों किंवा ज्यांचा मी द्वेष करतों अशीं का होईनात, पण हाडामांसाचीं, गरम रक्ताचीं माणसें ज्यांत आहेत, ज्यात एकमेकांचे रसरशीत हात आम्ही हातांत घेऊं शकतों, एकमेकांचे काळे-गोरे, कुरूप-सुरूप चेहरे पाहून दुःखी किंवा सुखी होतों, आणि जिथें माणसांच्या उष्ण श्वासानीं गरम झालेल्या वातावरणांत आम्ही श्वासोच्छ्वास करूं शकतों असेंच जग मला हवें.



## ७८

### काळ !

गणूकाकांच्या घरीं त्यांच्याबरोबर मी बोलत बसलों होतों. इतक्यात शेजारचा एक मुलगा आला आणि म्हणाला, ‘ काका, काळ म्हणजे वेळ हें मला माहीत आहे; पण काळ या शब्दाचा आणखी एक दुसरा अर्थ लिहून आणा म्हणून मास्तरनीं सांगितलं आहे. काळ म्हणजे आणखीन् काय हो ? ’

‘ अरे वेड्या, काळ म्हणजे मृत्यु ! ’ काका हंसत म्हणाले. त्या मुलाचें समाधान झालें आणि तो निघून गेला.

‘ काळ म्हणजे जीवन, काका. ’ मी म्हणालों.

‘ हो, बरोबर आहे ’ काका कृत्रिम गंभीरपणा धारण करून म्हणाले, ‘ मी काळ म्हणजे मृत्यु म्हणालों ना ? मग तूं काळ म्हणजे जीवन म्हटलंच पाहिजेस ! अरे, फार काय, मी जर उद्या कावळा काळा आहे असं म्हणालों, तर कावळा दुधासारखा पांढरा असतो हें तूं सिद्ध करशील ! ’

‘ अहो पण, काका, माझं जरा ऐकून तर घ्या. ’ मी म्हणालों.

‘ मला ऐकायला आतां मुळींच वेळ नाहीं. मला बाहेर जायचं आहे. ’ असें म्हणून काका डोक्यावर रुमाल ठेवून बाहेर निघून गेले देखील !

काकाची केवळ अडवणूक करायची म्हणून खरोखरच मी तसें म्हणालों नाहीं. काळ ही चीज आहे तरी काय, याचा गेले कित्येक दिवस मी विचार करतों आहें.

मी जितका जितका विचार करतों तितके नवीन नवीन पण चमत्कारिक विचार माझ्या डोक्यांत येतात. काळ मोजण्याकरिता आम्हीं घड्याळें आणि घटिका-यंत्रें शोधून काढलीं आहेत; आणि काटा अमुक अंतर पुढें गेला कीं अमुक काळ झाला असें आम्हीं म्हणतों. पण काळ म्हणजे काय ? तो डोळ्यांना दिसत नाहीं; हाताना लागत नाहीं; फार काय, त्याच्या स्वरूपाची आपण कल्पनाही करूं शकत नाहीं. काळाला आपण मृत्यु म्हणतों, कारण कांहीं काळ गेला कीं माणूस मरतो; आणि माणूस मेला तरी काळ तसाच पुढें जात असतो. माणसावर काळ अशा तऱ्हेनें मात करतो म्हणून काळाला मृत्यु म्हणणें हें चुकीचें आहे, असें मला वाटतें. तुम्ही मरता — तुमच्या शरीराची हालचाल बंद पडते, हा काहीं काळाचा अपराध नव्हे !

या प्रश्नावर एका सुप्रसिद्ध तत्त्ववेत्त्याचें मत मी वाचीत होतों. त्यानें एक दोन सुंदर उदाहरणें देऊन काळाची कल्पना करण्याचा प्रयत्न केला आहे. समजा, एक प्रतिभावान् चित्रकार आहे. त्याच्या एका हातात रंगफलक, आणि दुसऱ्या हातात कुंचले आहेत. रंगफलकावर नाना तऱ्हेचे रंग आहेत. इतर सर्व सामुग्री जय्यत तयार आहे. एक सुंदर स्त्री त्याच्यासमोर उभी आहे; आणि या स्त्रीचें चित्र तो काढणार आहे तें चित्र कसें होईल हें सर्वसाधारणपणें आपणाला सांगतां येईल. तें चित्र त्या स्त्रीसारखें दिसेल. त्यांत त्या कलावंताचेंही थोडेंसें व्यक्तित्व असेल, पण त्यांत आणखीही असें काहीं असेल, कीं जें आपणाला अगोदर मुळींच सांगता येणार नाहीं. एखाद्या कॅमेऱ्यानें तें चित्र काढायचें असेल तर तें कसें होईल याची पूर्ण कल्पना आपणाला बांधता येईल. तें कुठेंही आणि केव्हाही काढलें तरी ठराविक वेळ नि ठराविक सामुग्री असली कीं तें कसें होईल तें आपणाला सांगतां येईल. पण हा चित्रकार तयार करणार ती कलाकृति. त्यांत निर्मितीचा भाग असणार. त्यात एक अपूर्व जिवंतपणा — जीवन — असणार. आणि हा जिवंतपणा — हें जीवन — येण्याकरितां काळ लागतो.

किंवा असें पाहा. लांकडाच्या ठोकळ्यांचें मुलांचें एक विशिष्ट खेळणें असतें. ते ठोकळे विशेष तऱ्हेनें जोडले कीं बंगला तयार होतो. हा बंगला तयार करायला त्या मुलाला कांहीं काळ खात्रीनें लागतो. पण तत्त्वार्थानें त्याला काळ म्हणतां येत नाहीं; कारण हा बंगला त्यानें काल केला काय, आज केला काय, पांच मिनि-

टांत जोडला काय, किंवा पंधरा मिनिटांत जोडला काय, तरी तो बंगला प्रत्येक खेपेला तसाच. त्यांत फरक नाहीं; म्हणजेच निर्मिती नाहीं, जीवन नाहीं किंवा जिवंतपणा नाहीं. एखाद्या ठिकाणीं पन्नास वर्षें असलेल्या दगडाला आपण तो पन्नास वर्षांचा आहे असें म्हणतों. पण त्या शब्दांना कांहींच अर्थ नाहीं; कारण पन्नास वर्षें काय आणि पांचशें वर्षें काय, पांच मिनिटें काय किंवा पांच सेकंद काय, त्या दगडाचा विचार करतांना काळ नावाची गोष्टच उद्भवत नाहीं.

आपणांत जीवन असतें किंवा जिवंतपणा असतो, म्हणजेच आपणांत सारखा फरक पडतो, किंवा आपला विकास होतो. या विकासाचें मोजमाप करण्याकरितां काळ या नांवाची एक कल्पना आपण शोधून काढली आहे. जीवन आहे – विकास आहे – म्हणून ही कल्पना करावी लागते. म्हणूनच मी म्हणतों, कीं काळाला कांहीं म्हणायचेंच असेल तर त्याला मृत्यु म्हणूं नका! काळ म्हणजे जीवन!



७९

## गप्पा आणि गप्पीदास !

माझ्या ओळखीचे एक सद्गृहस्थ आहेत. ते नेहमीं मला उपदेश करतात कीं, ' गप्पा झोडण्यात तूं फार वेळ घालवतोस; तोच वेळ तूं लिहिण्या-वाचण्यांत घालवलास तर तुझा कितीतरी फायदा होईल. ' त्याचा उपदेश मला पटतो. पण स्वतः गप्पा मारण्याचा आणि इतरांच्या गप्पा ऐकण्याचा मोह मात्र मला आवरत नाहीं. आणि खुद्द या गृहस्थाचें वाचनाचें वेड पाहून तर वाचण्यापेक्षा गप्पाच केलेल्या बऱ्या, असें अलीकडे मला वाटूं लागलें आहे. ' घरीं, दारीं, शय्येवरि, रतिसुखाचे अवसरीं ' सगळ्याची लाज सोडून भगवच्चिंतन करावें, असें कुणीसें म्हटलें आहे. हा गृहस्थ भगव-च्चिंतनाऐवजीं सारखें वाचन करीत असतो ! सकाळीं उठल्याबरोबर चहा पितांना वृत्तपत्र वाचतो. नंतर एक दोन पुस्तकें टेबलावर उघडून ठेवलेलीं असतात तीं इकडे तिकडे फिरतांना अधून-मधून वाचतोच. जेवतांना उजव्या हातानें घास घेत असतां डाव्या हातांत पुस्तक घेऊन वाचीत असतो. आणि असा जेव्हां जेव्हां त्याला प्रसंग मिळतो तेव्हां तेव्हां रामदासांच्या उपदेशा-प्रमाणें तो ' अखंडीत वाचीत जातो ' ! मात्र या अचाट वाचनाचा परि-णाम असा झाला आहे, कीं त्याला विचार करायला एक क्षणसुद्धा वेळ मिळत नाहीं. त्याला स्वतःचा असा विचारच नाहीं. जगांतल्या मोठमोठ्या विचारवंतांच्या मौल्यवान् विचारांच्या गोणी तो मोठ्या अभिमानानें आपल्या

पाटीवर वाहतो. त्याला पाहिलें, कीं बादशहाचा खजिना मी आपल्या पाठीवरून वाहतों म्हणून प्रौढी मिरवणाऱ्या कुठल्याशा गोष्टींतल्या गाढवाची मला आठवण होते !

छे छे ! अशा तऱ्हेनें 'अखंडीत वाचीत जाण्या'पेक्षां आमच्या गप्पाच कितीतरी बऱ्या. एखादी लोणकढी ठेवून द्यायची म्हणजे विचार करावा लागतो; इतकेंच नव्हे, तर चांगल्या कलावंताची कल्पनाशक्तिही लागते; कारण जातिवंत गप्पा म्हणजे कांहीं नुसती घडलेली हकीकत सांगणें नव्हे; तर ती मीठ-मसाला लावून सांगणें, किंवा जें घडलेंच नाहीं त्याचें मसालेदार वर्णन करणें !

कलावंताच्या प्रतिभेची व्याख्या जर नवनवोन्मेषशालिनी अशी असेल, तर गप्पीदासाला कलावंत म्हटलेंच पाहिजे. आणि कलावंत गप्पीदासाचे प्रकारही पुष्कळ आहेत. माझ्याच माहितींतल्या तीन गप्पीदासांपैकीं प्रत्येकाची कला वेगळी आहे. एकानें गप्पा मारायला सुरुवात केली, कीं तुम्ही 'थांब' म्हणेपर्यंत त्याच्या गप्पा थांबूंच शकत नाहींत. त्याच्या पद्धतीचें वर्णन मी असें करतों : 'एक बीं होतें. तें रुचत घातलें. त्याला अंकुर फुटला. त्याचें रोप झालें. रोपट्याचें झाड झालें. झाडाला फुलें आलीं. फुलानंतर फळें आलीं. फळें पिकून फुटलीं; आणि त्यातलें बीं खालीं जमिनीवर पडलें. तें रुजलें. त्याला अंकुर फुटला, त्याचें रोप झालें. रोपट्याचें झाड झालें. झाडाला फळें आलीं. तीं फुटून त्यातलें बीं खालीं पडलें... ' आणि याप्रमाणें तुम्ही 'थांब' म्हणेपर्यंत गोष्ट पुढें चालू !

दुसऱ्या कलावंताची पद्धत याहून जरा वेगळी आहे. शेक्सपीअर ज्याप्रमाणें आपल्या नाटकाकरिता स्वतंत्र कथानकाचा विचार करण्याच्या भानगडींत पडत नसे, कुठल्याही जुन्या कथापुराणांतली गोष्ट घेत असे, आणि मग ती आपल्या प्रतिभेनें रंगवीत असे; त्याप्रमाणेंच स्वतंत्र गोष्ट किंवा गप्पा शोधून काढण्याचा त्रास आमचा हा मित्र घेत नाहीं. तुम्हीं त्याला जें सकाळीं सांगितलें असेल तेंच खूप भडक रंगांत रंगवून तो तुम्हांला संध्याकाळीं सांगतो ! एकदां मी पुण्याहून डेक्कन क्वीननें आलों, आणि त्याला सहज म्हटलें, 'काय छान गाडी आहे डेक्कन क्वीन ! इतक्या

प्रचंड वेगानें जाते, पण काहीं त्रास होत नाहीं. ' त्याच दिवशीं संध्याकाळीं, सकाळीं काहींच झालें नाहीं असा चेहरा करून तो मला सांगूं लागला, ' अरे, डेक्कन क्वीन म्हणजे काय सुंदर गाडी आहे ! माझ्या ओळखीचा एक गृहस्थ आजच सकाळीं डेक्कन क्वीननें आला. कांठोकांठ पाण्यानं भरलेलं एक ग्लास त्यानं तीन तास पुण्यापासून मुंबईपर्यंत आपल्या पुढयातल्या टेबलावर ठेवलं होतं, त्यातला एक थेंब खालीं सांडला नाहीं. आणि गाडी ऐंशी मैल वेगानं सारखी धावत होती ! ' मी त्याच्या तोंडाकडे पाहातच राहिलों !

मात्र आमचा तिसरा गप्पीदास मित्र खरा अव्वल दर्जाचा कलावंत ! तो एकदा मला सांगूं लागला, ' अरे, अमेरिकेंतला नवीन शोध तुला कळला का ? '

मीं म्हटलें, ' काय ? '

' हल्लीं आगगाडीच्या इंजिनाला डबे जोडीत नाहींत, तिथं इंजिनाच्या मागं एक मोठं थोरलं लोहचुंबक असतं; आणि डब्याच्या पुढल्या बाजूला लोखंडाचा पत्रा असतो. त्याचप्रमाणं प्रत्येक डब्याच्या मागं एक लोहचुंबक असतं; त्यामुळं कशाला कांहीं जोडावंच लागत नाहीं. '

' काय. म्हणतोस काय ? ' मी उद्गारलों.

मी पुढें काहीं बोलायच्या आत तो चट्दिशीं म्हणाला, ' अरे, अशी एकानं मला थाप मारली ! '

माझें बोलणेंच खुंटलें !

या आणि असल्या गोड गप्पा ऐकायच्या सोडून वाचनात वेळ कशाला फुकट घालवायचा तेंच मला समजत नाहीं.



## ८०

### हें मन !

एकदां एका मित्रानें मला सहज थट्टेनें विचारलें, ' काय रे, अमुक अमुक गृहस्थ असा असा प्रसंग त्याच्यावर आला तर काय करील हें तुला सांगतां येईल का ? '

' छे छे ! ' मीं तावडतोब उत्तर दिलें, ' त्या गृहस्थाचं राहूं दे, पण तसा प्रसंग माझ्यावर आला तर मी स्वतः काय करीन हें सुद्धा मला आज सांगतां येणार नाहीं. माझ्या स्वतःच्या मनाचा जिथं मला थांग लागलेला नाहीं, तिथं दुसऱ्याच्या मनाचं मी काय सांगूं ? '

माझ्या या बोलण्याचें माझ्या मित्राला मोठें आश्चर्य वाटलें. पण आश्चर्य वाटण्यासारखें त्यात कांहींच नाहीं. असा प्रसंग आला तर आपण असें करूं, असें खात्रीपूर्वक आपणाला वाटत असतें. पण खरोखरच तो प्रसंग आला म्हणजे आपण भलतेंच काहीं तरी करतों. माझा असा अनेक वेळचा अनुभव आहे. माझा एक अत्यंत जुना आणि विश्वासू असा नोकर होता. माझा त्याच्यावर इतका अपरंपार विश्वास होता, कीं पैसे आणि इतर मौल्यवान् वस्तू मी त्याच्या विश्वासावर वाटेल तर उघड्यावर टाकून जात असें. एखादी वस्तु हरवली असली तर एक वेळ मी माझा संशय घेतला असता, पण त्याचा कधींच घेतला नसता. गणूकाका मला नेहमीं म्हणत, ' तुझा हा ढिला कारभार आपणाला पसंत नाहीं. कांहीं तरी घेऊन तो पळाला तर ? '

त्यावर मी हंसून म्हणालों, ‘ तें शक्यच नाहीं, गणूकाका. ’

‘ पण समज, ’ गणूकाका म्हणाले, ‘ आलंच त्याच्या मनांत कधीं कांहीं काळंबेरं तर ! ’

‘ तर – ’ मी म्हणालों, ‘ तर मात्र तो माझ्या हातून जिवंत सुटणार नाहीं. मी त्याची चामडी लोळवून काढीन ! ’

या बोलण्यानंतर बरेच दिवस गेले आणि माझें एक भारी किंमतीचें घड्याळ चोरीला गेलें. सारें घर धुंडाळलें. इकडे शोधून पाहिलें, तिकडे शोधून पाहिलें, पण कांहीं पत्ता लागेना. त्या नोकरानेंही तें शोधण्याकरितां माझ्याबरोबर शर्थ केली होती. एक-दोन दिवसानंतर बाहेरून संध्याकाळीं मी घरीं परत आलों, तों माझ्या दरवाजापाशीं मोठी गडबड उडालेली दिसली. माझे दोन-चार शेजारी तिथें जमून त्यांनीं माझ्या नोकराला धरून ठेवला होता. आणि माझ्या येण्याची ते वाटच पाहात होते. तें घड्याळ दुसऱ्या एका गड्याला दाखवीत असतां एका शेजाऱ्यानें माझ्या त्या विश्वासू नोकराला पकडला होता. मी येईपर्यंत त्याला त्यानीं चांगलाच मारला होता; आणि मी त्याला यथेच्छ बडवून पोलिसाच्या हवालीं करीन म्हणून ते माझी वाट पाहात होते. मीं जेव्हा तें घड्याळ आणि त्याला तसा धरून ठेवलेला पाहिला, तेव्हा माझ्या डोळ्यांवर माझा विश्वासच बसेना. कुणी-तरी अवचितपणें मागून येऊन डोक्यावर टोला हाणला म्हणजे माणूस जसा स्तिमित होतो, तसा स्तिमित होऊन मी उभा राहिलों. आणि राग येण्याऐवजी माझा चेहरा एकदम फिका पडला. मला त्याच्याकडे पाहवेना. तोही खालीं मान घालून उभा होता. तें घड्याळ मीं हातांत घेतलें. आणि ‘ तूं माझ्या डोळ्यांसमोरून निघून जा. मला पुन्हा तोंड दाखवूं नकोस ! ’ असें म्हणून मी तडक खोलींत शिरलों; आणि दार लावून घेऊन बिछान्या-वर पडलों. घड्याळ मिळाल्याचा आनंद दूरच राहो, पण या प्रकारानें दोन दिवस मला चैन पडत नव्हतें. चामडी लोळवण्याच्या गोष्टी करणारा मी त्याच्याविरुद्ध बोटही उचलूं शकलों नाहीं ! आणि तें अगदीं साहजिकच होतें. ज्याच्यावर आपण इतका अमर्याद विश्वास टाकतों त्याच माणसानें जर आपला असा ध्यानीं-मनीं नसतां गळा कापला, तर माणूस दुःखानें इतका

थिजून जातो, कीं त्याला राग येणें मुळींच शक्य नसतें. मग कुठलें मारणें आणि कुठलें चामडी लोळवणें! प्रसंग नसताना आपण खूप बोलतों, पण प्रसंग आला कीं असें काहींतरी करतों

याच्या उलट दुसरा एक खेळ मानवी मन खेळतें. तो असा, कीं प्रसंगीं आपण करतों एक आणि नंतर सागतों दुसरेंच! एखाद्या कारकुनाला त्याच्या हातून घडलेल्या चुकीबद्दल साहेबानें खूब दम भरला आणि नोकरी-वरून काढून टाकण्याची धमकी दिली, कीं 'स स-स-र' करीत तो माफी मागतो व पुन्हा चूक न करण्याची हमी देऊन कशी तरी आपली नोकरी बचावतो. पण तोच कारकून घरीं परत आल्यावर हाच प्रसंग जेव्हा आपल्या बायकोला किंवा मित्राला सागतो, तेव्हा तो पुढीलप्रमाणें सांगतो — 'साहेब ओरडल्याबरोबर तितकाच आवाज चढवून मीं त्याला साफ सांगितलं, कीं 'स्वाभिमानापेक्षा मला नोकरीची पर्वा नाहीं. उपाशी मेलों तरी बेहत्तर, — या क्षणाला माझा राजीनामा घ्या पाहिजे तर,' असं ठणकावून सागितल्याबरोबर सुतासारखा सरळ आला साहेब! 'तसं नव्हे, मिस्टर, माझं म्हणणं इतकंच,' असं कांहींतरी पुटपुटत मला बाहेर जायला सागितलन् त्यानं. हो, या लोकांची तरी मिजास आपण फार चालूं देता कामा नये!'

अशी बेमालूम थाप तो कारकून ठोकून देतो. पण मला असली थापेबाजी क्षम्य वाटते. फार काय, मानवी जीवनांत ती अपरिहार्य आहे. साहेबानें अपमान केल्यामुळें त्या कारकुनाच्या मनांत धुमसत असलेला राग त्यानें कसा तरी व्यक्त केलाच पाहिजे. आपण जें करायला पाहिजे होतें, पण करूं शकलों नाहीं, तें आपण केलें असें सागण्यानेदेखील मनाला एक प्रकारचें समाधान वाटतें — मन मोकळें होतें. आपल्या गुदमरलेल्या भावना अशा कल्पित कथा सागून कां होईना, पण माणसानें जर व्यक्त केल्या नाहींत, तर त्याला जगणें अशक्य होईल. कोंडून ठेवलेल्या भावनांचा स्फोट होऊन एखादे वेळीं त्याची हृदयक्रिया बंद पडेल. म्हणूनच मी म्हणतों, कीं या असल्या थापा नुसत्या स्वाभाविक आहेत इतकेंच नव्हे, तर त्या अत्यंत आवश्यक आहेत. मानवी मनच असें विचित्र आहे, कीं आपण बोलतों तसें तें करूं देत नाहीं, आणि करतों तसें बोलूं देत नाहीं!

●●●

## ८१

## चांगुलपणाचे तोटे !

मी कांहीं तरी लिहीत बसलों होतों, इतक्यांत गणूकाका आत आले.

' काय, नेहमींप्रमाणं आपल्या अकलेचे तारे तोडीत बसलायस कीं काय ? ' स्वतःच्या कोटीवर स्वतः खूश होऊन काका म्हणाले.

' काका, माझ्या लिखाणाला काय वाटेल ते नाव ठेवा. ' मी म्हणालों, ' आतापर्यंत इतकं भिकार लिखाण कुणीं लिहिलं नसेल असं म्हणा पाहिजे तर, पण तेवढी अकलेचे तारे तोडण्यासंबंधीं कोटी करूं नका, बुवा ! '

' का ? त्या कोटीमुळें अगदीं मर्मभेद झाला का तुझा ? ' काका म्हणाले.

' छे छे, ' मी म्हणालों, ' म्हणतों ना, कीं मला काय वाटेल तें म्हणा पण तेवढी कोटी करूं नका ! तुमचा अधःपात मला पाहवत नाहीं ! '

' माझा अधःपात ? ' काका डोकीवरील रुमाल सांवरीत उद्गारले.

' हो, अधःपात ! ' मी म्हणालों, ' अहो, हे लेख लिहितांना जी कोटी मीं कित्येक वेळां स्वतःच्या विरुद्ध स्वतःच केली आहे, तिचाच तुम्हीं पुनरुच्चार करावा, हा अधःपात नाहीं तर काय ? तुमच्यासारख्या मोठ्या माणसानं माझ्यासारख्या सामान्य माणसाचं उच्छिष्ट उचलावं हें खरोखरच मला बघवत नाहीं ! '

माझा युक्तिवाद ऐकून काका सर्दच झाले. पुन्हा ते असल्या शिळ्या कोट्या करण्याच्या भानगडींत पडतील असें मला वाटत नाहीं. अर्थात्

गणूकाका असल्या गोष्टी निव्वळ भोळेपणामुळें करतात. पण सर्वच माणसें मात्र अशीं भोळीं नसतात. स्वतःचा कमीपणा कबूल करण्याचा एखाद्यानें भलेपणा दाखवला, तर तावडतोब त्याचा फायदा घेऊन त्याच्यावरच कुरघोडी करण्याचा हे लोक प्रयत्न करतात. मी हे अकलेचे तारे तोडले आहेत—यात काहीं तथ्य असेल तर पाहा, असें म्हणणाऱ्याला त्याच्याच शब्दाचा आधार घेऊन बेअकली ठरविण्याचा प्रयत्न करणें म्हणजे स्वतःच्या अकलेचें दिवाळें वाजल्याचें जाहीर करण्यासारखें आहे. एखाद्यानें तुमच्या-वर विश्वास टाकून केवळ भलेपणामुळें दिलेल्या कबुलीजबाबाचा त्याच्या-विरुद्ध उपयोग करणें, हा माझ्या मतें मनाचा हलकेपणा होय.

केवळ वादांत विजय मिळविण्याकरिता प्रतिपक्षाच्या चांगुलपणाचा त्याच्याच तगड्या तोडण्याकरिता उपयोग करणें यात मनाचा हलकेपणा असला तरी ती एक क्षुल्लक बाब झाली. पण दुसऱ्याच्या चांगुलपणाचा भरपूर फायदा घेऊन वर तो आणखी चांगुलपणा दाखवीत नाहीं म्हणून सात्त्विक संतापानें तक्रार करणारे हरींचे लालही मीं पाहिले आहेत! माझ्या ओळखीच्या एका गृहस्थाला फिल्म कंपनी काढण्याकरिता त्याच्या एका उदार मित्रानें पन्नास हजार रुपये दिले. त्या पन्नास हजार रुपयाची चटणी करून आणखी दहा हजार तो आपल्या मित्राकडे मागूं लागला. त्यानें ‘ नाहीं ’ म्हटलें तेव्हा संतापानें फणफणत हा गृहस्थ मला सांगूं लागला, ‘ काय विश्वासघातकी माणूस आहे! आता दहा हजार त्यानं दिले असते तर गेलेले पन्नास हजार तर मिळालेच असते, पण आणखी वीस हजार फायदा झाला असता. आयत्या वेळीं हरामखोरानं गळा कापलान् माझा! ’

‘ अस्सं होय? ’ मी म्हणालों, ‘ पण कदाचित् त्याचे साठ हजार गेले असते. ’

‘ मग, गेले तर गेले,— काय थोडा पैसा पडलाय् त्याच्याजवळ? ’ तो दुखावलेला हुतात्मा कळवळून उद्गारला. त्याचे हे उद्गार ऐकून मी थक्क झालों.

खरेंच. मानवी मनाचें काय हें औदार्य!— स्वतःखेरीज इतर सर्व चांगले असावेत असें प्रत्येक माणसाला वाटतें!

● ● ●

८२

## प्रतीक कीं प्रतिबिंब ?

माझा एक चित्रकार मित्र बंगाली चित्रकलेचा एकनिष्ठ भक्त आहे. एका प्रख्यात बंगाली चित्रकाराचें ' प्रणयी युगुल ' नावाचें एक चित्र घेऊन एकदा तो माझ्याकडे आला, आणि त्या चित्राची अवास्तव स्तुति करूं लागला. मीं तें चित्र न्याहाळून पाहिलें. चित्रातली रंगसंगति मोहक होती. एकंदर वातावरणही सुंदर चितारलें होतें. मात्र त्या चित्रातला तो प्रेमी पुरुष कपडे घातलेला हाडाचा सापळा असून, त्याची प्रियकरीण क्षयरोगाच्या तिसऱ्या अवस्थेंत गेल्यासारखी दिसत होती !

' खरोखरच, प्रेमाचं इतकं अमर स्वरूप दाखविणाऱ्या या चित्रकाराचं अभिनंदन केलं पाहिजे. ' मी गंभीरपणाचा आव आणून म्हणालों, ' हीं दोन माणसं आता मरतात कीं उद्या मरतात अशा स्थितींत असतानासुद्धां एकमेकाविषयीं इतक्या उत्कट प्रेमाचा आविष्कार करीत आहेत, हा प्रेमाचा केवढा विजय ! '

' थट्टा करतोस वाटतं त्या चित्राची ? ' माझा स्वर ओळखून माझा मित्र म्हणाला, ' शरीराशीं काय करायचं आहे ! तें गुबगुबीत असो, कीं अस्थिपंजर असो, त्यांच्या प्रेमाचं अंतःस्वरूप — त्याचा आत्मा — रंगांच्या

मुलायम मिश्रणानं आणि रेषांच्या नाजूक छटांनी चित्रकाराला व्यक्त करायचा आहे.'

'अस्सं!' मी म्हणालों, 'आत्मा अस्थिपंजरांतच राहूं शकतो वाटतं? तेजःपुंज, निरोगी शरीरात आत्मा वास करूं शकत नाहीं कीं काय?'

यावर माझ्या मित्रानें कला म्हणजे निसर्गाची नक्कल नव्हे; निसर्गाचें रहस्य, जीवनातलें चैतन्य, मानवाचें आत्मस्वरूप व्यक्त करणें हेंच कलेचें कार्य वगैरे वगैरे खूप गूढवादी तत्त्वज्ञान मला चारलें. आणि त्यातलें बरेंचसें मला पटलेंही. पण मानवाचें तेजस्वी आत्मस्वरूप दाखवितांना, त्याच्या बाह्य स्वरूपाचें विकृत रूप — त्याच्या शरीरांतल्या हाडांचा वेडावाकडा सापळा का दाखविला पाहिजे, तें मला अजूनही कळत नाहीं.

यावर हे लोक असें म्हणतात, कीं कला हें जीवनाचें प्रतीक आहे, प्रतिबिंब नव्हे. मनुष्यामध्यें ज्याप्रमाणें शरीरापेक्षां त्याचा आत्मा किंवा त्याचें अंतःस्वरूप याला खरें महत्त्व आहे, त्याचप्रमाणें जीवनाचें रहस्य — अंतःस्वरूप दाखविणारी जी प्रतीकवादी कला तीच खरी कला. मला हें म्हणणें पूर्णपणें मान्य आहे. 'जीवनाचें प्रतीक', 'शरीरापेक्षा आत्म्याचें महत्त्व' हे शब्दप्रयोग मला छानदार वाटतात आणि पटतातही. फक्त एकच गोष्ट मला या लोकांच्या नजरेस आणावीशी वाटते आणि ती म्हणजे हीच, कीं 'प्रतीक', 'आत्मा' हे शब्द उच्चारतांना त्यांच्या अगोदर 'जीवन', 'शरीर' हेही शब्द तुम्ही वापरता. मग कृतींतच या शब्दाचा विसर तुम्हांला कां पडतो? जीवन नसतें तर कला जन्माला आली असती काय? किंवा शरीराशिवाय 'आत्मा' नांवाचा कांहीं पदार्थ कुठें भटकतांना तुम्हांला दिसतो काय? शरीर नसून नुसता आत्मा असलेला जिवंत मनुष्य, किंवा आत्म्याशिवाय नुसतें शरीर असलेला जिवंत माणूस, तुम्हीं कुठें पाहिला आहे काय? आणि कलेंत नुसतें प्रतीकच दाखवायचें असेल, तर मग 'प्रणयी युगुला'चें चित्र काढतांना, त्या दोन प्राण्यांचीं मोडकीं-तोडकीं शरीरें आणि हाडांचे सांपळे तरी कशाला दाखवायला पाहिजेत? स्त्रीच्या प्रेमाचीं आणि पुरुषाच्या प्रीतीचीं हिरवीं-तांबडीं कांहींतरी प्रतीकें एकमेकासमोर काढावीं, आणि त्याला 'प्रणयी युगुल' असें नांव द्यावें!

निसर्गाची नुसती नक्कल किंवा जीवनाचें हुबेहूब प्रतिबिंब म्हणजे कला नसेल; पण आत्म्याला शरीराची जितकी जरूरी आहे, तितकीच जीवनाच्या योग्य प्रतिबिंबाची जरूरी कलेला आहे, असें मला वाटतें. प्रेमी माणूस दाखवायचा असेल, तर वेडेवांकडे हातपाय असलेला पाप्याचा पितर काढून, कुशल रंगसंगतीनें आणि सूक्ष्म रेखाचित्रणानें, त्याच्या प्रेमाचें अंतःस्वरूप व्यक्त करण्यापेक्षां, माणसासारखा माणूस काढून रंगरेखा-कौशल्यानें त्याच्या अंतरात्म्याचा आविष्कार केल्यास ती कला अधिक आनंददायी आणि म्हणूनच अधिक यशस्वी होईल, असें मला वाटतें.

या कट्टर प्रतीकवाद्याच्या दुसऱ्या टोंकाला कर्मठ प्रतिबिंबवादी उभे राहतात. या कर्मठ प्रतिबिंबवादाचा एक उत्साही पुरस्कर्ता एकदां एक चित्रकला-प्रदर्शन पाहून आला. त्यातलें एक चित्र पाहून तो हर्षातिशयानें अगदीं वेडावून गेला होता.

'एवढं त्या चित्रांत आहे तरी काय ? ' मीं त्याला विचारलें.

'आहे काय ? ' तो उत्साहभरानें मला सांगू लागला, 'अरे, अगदीं साध्या फुलाचा गुच्छ त्या चित्रकारानं काढला आहे, पण इतकं हुबेहूब चित्र आहे, कीं बागेंत नेऊन ठेवलं तर त्या फुलांभोंवतीं भुंगे एकच गर्दी करतील ! '

'एवढंच ना ? दुसरं कांहीं नाहीं ना ? ' मी म्हणालों, 'म्हणजे भुंग्यासारख्या क्षुद्र प्राण्याना फसविण्याइतकी निसर्गाची नक्कल किंवा जीवनाचा आभास निर्माण करणं, एवढंच उत्कृष्ट कलेचं काम आहे कीं काय ? '

माझ्यासारख्या अरसिकाला कलेचें मर्म या जन्मात कधीं काळीं कळणार नाहीं, अशा तऱ्हेचा दृष्टिक्षेप करून तो कट्टा प्रतिबिंबवादी तिथून चालता झाला. नुसतें फुलासारखें फूल काढणें, हेंच जर कलेचें कार्य असेल तर कलावंतानें काढलेलें चित्र पाहण्याची आटापीट हवी कशाला ? बाजारात पैशाला पसाभर फुलें मिळतात !

कलावंताचें फूल हें नुसतें फूल नसतें. तें निसर्गातल्या एखाद्या फुलाचें प्रतिबिंब असतेंच असतें, पण कुशल कलावंत त्या प्रतिबिंबावर आपल्या

प्रतिभेची काडी फिरवून अशी कांहीं जादूगिरी करतो, कीं तें फूल विश्वातल्या साऱ्या फुलाचें — अखिल फूलपणाचें — प्रतीक होतें. निसर्गातलें एखादें फूल कोमेजून जाईल, सुकेल, मरेल; पण जगातल्या फूलपणाला ना जरा, ना मरण. आणि म्हणूनच कलावंताचें फूल अजर आणि अमर!

आमचे प्रतिबिंबवादी मोठ्या तोऱ्यात सागतात, कीं प्रतीक, अंतःस्वरूप, निसर्गाचें रहस्य वगैरे आम्ही काहीं जाणत नाहीं. निसर्गाचें बिनचूक चित्र, जीवनाचें हुबेहूब प्रतिबिंब उभें केलें, कीं आमचें काम संपलें. मला वाटतें, शिवाजींची अगर नेपोलियनची बेमालूम नक्कल करणारा एखादा नकल्या पाहून याना अधिक समाधान होईल; शिवाजी अगर नेपोलियन या थोर विभूतींना प्रत्यक्ष पाहून होणाऱ्या उदात्त आनंदाची आणि अलौकिक समाधानाची याना जरूर नाहीं.

चित्रकलेचा किंवा वाङ्मयकलेचा मी विचार करूं लागलों, म्हणजे माझ्या डोळ्यासमोर एक उपमा उभी राहते. जीवन-रसानें रसरसणारा मानव म्हणजे ज्याप्रमाणें नुसता साकार देह नव्हे किंवा निराकार चैतन्य नव्हे, तर या दोहोंचा मानवी मनाला कुंठित करून टाकणारा संयोग; त्याचप्रमाणें जिवंत कला म्हणजे जीवनाचें नुसतें प्रतीकही नव्हे किंवा प्रतिबिंबही नव्हे, तर या दोहोंची अद्भुतरम्य एकजीवता!

● ● ●

८३

## मोठेपणाच्या मर्यादा

मोठ्या लोकावर माझा मोठा राग आहे. मोठ्या लोकाच्या मोठेपणाची जेव्हा मी सूक्ष्म छाननी करूं लागतों, तेव्हा तर माझा राग अधिकच द्विगुणित होतो. अर्थात् या मोठ्या माणसांचा वेळीं अवेळीं ' उदो ' ' उदो ' करणारा त्याचा भक्तगण, या मोठ्या माणसामुळें जगाचा केवढा फायदा झाला, याचीं मोठीं रसभरित वर्णनें करतो, आणि इतिहासकारही इतिहासाचीं बगीचशीं पानें असल्या वर्णनानीं अडविनात. पण मी छातीठोकपणें सागतों कीं या मोठ्या माणसापैकीं एकही जरी जन्माला आला नसता तरी जगाचें काडीइतकेंही नुकसान झालें नसतें !

समजा, शिवाजी जन्मालाच आला नसता, तर मराठ्याच्या इतिहासांत असा काय मोठा फरक पडणार होता ? त्या वेळीं महाराष्ट्राची परिस्थितीच अशी झाली होती, कीं शिवाजीनें जी कामगिरी केली ती दुसऱ्या कुणींतरी केलीच असती. मुसलमानी राज्यकर्त्यांच्या जुलमामुळें सर्व प्रजा ' त्राहि भगवन् ' झाली होती. धार्मिक छळामुळें जनतेच्या असंतोषाला आधिकच तीव्र स्वरूप प्राप्त झालें होतें. आणि बंडाळीच्या वणव्याची आग धुमसतच होती. अशा वेळीं राजकीय, सामाजिक व धार्मिक कारणांमुळें खवळून गेलेल्या परिस्थितीच्या प्रचंड लाटेवर शिवाजी उचलला गेला इतकेंच ! यावर कुणी असें म्हणेल कीं,

‘ दुसरा कुणी कां शिवाजीसारखा उचलला गेला नाहीं ? शिवाजीच त्या लाटेच्या माथ्यावर आरूढ होऊन मोठेपणाला का चढला ? ’ या प्रश्नाला मीं अगोदरच उत्तर दिलें आहे. मीं म्हटलेंच आहे, कीं ‘ शिवाजी नसता तर दुसऱ्या कुणींतरी त्याची कामगिरी केली असती. ’ नाहींतरी शिवाजीनें एकट्यानें काय केलें ? तानाजी, नेताजी इत्यादि त्याचे शेंकडों ज्ञात आणि अज्ञात सहाय्यकर्ते, त्याचप्रमाणें स्वदेशासाठीं आणि स्वधर्मासाठीं जिवावर उदार झालेले असंख्य मराठे होतेच कीं नाहीं ? झालें तर मग. त्याच्यापैकीं एखाद्यानें शिवाजीची जागा भरून काढली असती.

यावरून शिवाजीविषयीं इतर कुणाहीपेक्षां मला यत्किंचित्‌हि कमी आदर आहे, असें कुणींच समजूं नये. माझ्या म्हणण्याचा अर्थ इतकाच कीं एखाद्या मोठ्या माणसाचें जेव्हा आपण अवास्तव स्तोम माजवितों, तेव्हा त्याच्या मोठे-पणाला कारणीभूत झालेल्या भौतिक परिस्थितीचा आणि इतर अनेक आनुषंगिक गोष्टींचा आपणाला विसर पडतो. एका विशिष्ट माणसाच्या -- मग तो माणूस कितीही मोठा असो -- मोठेपणामुळें मनुष्य-जातीची प्रगति झाली, मानवी सुधारणेचें पाऊल पुढें पडलें, हें मी केव्हांही कबूल करणार नाहीं. मानवी समाजाच्या सामुदायिक प्रयत्नानीं -- मनुष्य-जातीच्या असंख्य अज्ञात घटकाच्या कळत अगर नकळत केलेल्या श्रमानीं प्रगतीच्या मार्गावरील एका विशिष्ट टप्प्याला मानवी समाज येऊन पोहोंचलेला असतो; एक विशिष्ट भूमिका तयार झालेली असते. आणि म्हणूनच ‘ मोठा ’ म्हटल्या जाणाऱ्या एखाद्या माणसाला आपला मोठेपणा दाखवायला अवसर सापडतो.

पण माझा मोठ्या माणसावर राग आहे तो निराळ्याच कारणाकरितां. हीं मोठीं माणसें आपल्या मोठेपणानें सर्वसाधारण जनतेचे डोळे इतके दिपवून टाकतात कीं त्याची तारतम्यबुद्धि अजिबात आंधळी होते. ती इतकी कीं त्याच्या दृष्टीनें एका पत्नीशीं जन्मभर इमानानें वागणारा रामही मोठा माणूस, आणि चार-पांच बायकांचा दादला शिवाजीही मोठाच माणूस ! सर्वसाधारण जनतेचीच गोष्ट कशाला ? ‘ राष्ट्रीय कवि ’ ‘ राष्ट्रीय कवि ’ म्हणून मिरविणारे शिष्टसुद्धां आणखी काय जास्त अक्कल दाखवतात ? राष्ट्राला पारतंत्र्यशृंखलांतून मुक्त करण्याकरितां आज विसाव्या शतकांत

शिवाजीनें जन्म घ्यावा, असें याना वाटतें! आणि म्हणून नाना जातींच्या वृत्तातून हे कवीश्वर ‘ रायगडच्या राण्या ’ला आळवतात! या बेवकूब लोकाना इतकी अक्कल नाहीं कीं आज विसाव्या शतकातल्या भौतिक परिस्थितींत जन्म घेऊन शिवाजी करणार काय? सतराव्या शतकांत त्या महापुरुषानें यशस्वी केलेले लष्करी डावपेंच आणि अमलात आणलेलें युद्धतंत्र विसाव्या शतकात काडीइतकें तरी उपयोगी पडेल काय? आज जर शिवाजी दगड-गोफणी घेतलेल्या मावळ्याच्या सहाय्यानें एखादी खिंड लढवू लागला तर एका मशीनगनच्या सहाय्यानें एक सोजीर शिवाजीसकट शिवाजीच्या मावळ्याची चटणी उडवून टाकील! सतराव्या शतकातली हिंदुस्थानची भौतिक परिस्थिति आणि त्या वेळीं पारतंत्र्यात पडलेल्या महाराष्ट्राचा प्रश्न, आणि साम्राज्यशाहीच्या अजस्र अजगरानें ग्रासून टाकलेल्या विसाव्या शतकातील हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचा प्रश्न, यात जमीन-अस्मानाचा फरक आहे. पण इतिहासाचें जर इतकें ज्ञान असेल, तर हे पोकळडोके लोक ‘ राष्ट्रीय (?) कवि ’ होतील कशाला?

केवळ मानवी प्रगतीचा इतिहास, म्हणजे मोठ्या लोकाच्या अचाट कृत्याचा इतिहास असें जव्हा काहीं लोक प्रतिपादन करतात, तेव्हा त्याना उत्तर म्हणून मोठेपणाच्या मर्यादा दाखविणारें उपरोक्त विवेचन करण्याच्या भानगडींत मी पडतों. काहीं लोकाना माझें म्हणणें पटणार नाहीं. फार कशाला? गणूकाकाच मला म्हणाले, कीं ‘ मोठ्या लोकाविषयीं असे अकलेचे तारे तोडण्याकरितांच का लेखणी हातात घेतली होतीस? ’ गणूकाकांना ‘ होय! ’ म्हणून उत्तर देण्याखेरीज माझा इलाज नव्हता. कारण मीं तोडलेले हे अकलेचे तारेच नाहीं तर काय? पण या ताऱ्याच्या तुटतां तुटतां पडलेल्या क्षणिक प्रकाशांत सत्याची इवलीशी कां होईना—एखादी अदृष्टपूर्व नवीन बाजू जर लोकाच्या दृष्टीला पडली, तरी मी माझें काम झालें असें समजेन.

• • •

## ८४

## महापुरुषांचें महत्त्व

मागील लेखाच्या शेवटीं गणूकाकानीं जेव्हा मला विचारलें, कीं ‘ शिवाजीसारख्या मोठ्या लोकांविषयीं असे अकलेचे तारे तोडण्याकरितांच का लेखणी हातात घेतली होतीस ? ’ तेव्हां त्यांना ‘ होय ’ म्हणून मीं उत्तर दिलें होतें. आणखी असेंही म्हटलें होतें कीं मानवी प्रगतीचा इतिहास म्हणजे केवळ मोठ्या लोकांच्या अचाट कृत्यांचा इतिहास, असें जेव्हा कांहीं लोक प्रतिपादन करतात, तेव्हां त्यांना उत्तर म्हणून मोठेपणाच्या मर्यादा दाखवून एखादा मोठा माणूस जन्माला आला नसता तर इतिहासांत विशेष काहीं फरक पडला नसता, अशा तऱ्हेचें एकातिक विधान मी करतों !

याचा अर्थ इतकाच, कीं मानवी इतिहासांत महापुरुषांचें महत्त्व काय आहे, याची मला पुरेपूर जाणीव आहे. पण मोठ्या माणसांचे अंधभक्त जेव्हा एका टोंकाला जाऊन त्याच्या अचाट कृत्यांखेरीज इतर सामाजिक परिस्थितीला कःपदार्थ लेखतात, तेव्हां त्यांच्या अंधभक्तीची झांपड खाडकन् उडवून टाकण्याकरितां दुसऱ्या टोंकाला जाऊन महापुरुषाचें कार्य म्हणजे कांहींच नव्हे, मानवी समाजाच्या सामुदायिक प्रयत्नांनींच इतिहास घडला जातो, अशा तऱ्हेचे परिणामकारक पण अर्धसत्य शब्द मी वापरतों !

कारण वरील शब्द जर पूर्णसत्य असतील, तर माझ्यासारखे भौतिकतावादी आणि ' असेल माझा हरी तर देईल खाटल्यावरी ' — परिस्थिति काय करायचें तें करील, माणसाला मुळींच हातपाय हालवायला नकोत, असें म्हणणारे दैववादी यांत कांहींच फरक राहणार नाहीं. पण मी दैववादी मुळींच नाहीं. परिस्थिति ज्याप्रमाणें मानवी जीवनावर परिणाम करूं शकते, त्याचप्रमाणें मानवाची स्वतंत्र इच्छाशक्तिही ( Free will ) परिस्थितीवर परिणाम करूं शकते, असें माझें ठाम मत आहे. आणि साधारण माणसेंसुद्धां जर परिस्थितीवर परिणाम करूं शकतात, तर शिवाजी, बोनापार्ट, मार्टिन ल्थर, शंकराचार्य, याच्यासारखे बलाढ्य इच्छाशक्ति असलेले महापुरुष परिस्थितीवर निःसंशय परिणाम करीत असले पाहिजेत, हें निर्विवाद आहे.

शिवाजी जन्मालाच आला नसता, किंवा लेनिन लहानपणींच झारच्या हातून मारला गेला असता, तर महाराष्ट्राच्या किंवा रशियाच्या इतिहासांत विशेष फरक पडला नसता, हें वादाकरितां क्षणभर म्हणणें सोपें आहे; पण थोडा सूक्ष्म विचार केला असतां या म्हणण्यात पूर्णसत्य नाहीं, हें ध्यानांत येईल; कारण नेहमींच परिस्थिति मोठ्या माणसाला निर्माण करते, हें जर सर्वस्वी खरें असेल, तर जेव्हा जेव्हा एखादा देश पारतंत्र्यानें कंटाळून गेला असेल, तेव्हां तेव्हा तेथें नियमितपणें आणि अगदीं अचूक स्वातंत्र्य-वीर जन्माला येतील ! पण खरोखर वस्तुस्थिति तशी नाहीं. शिवाजी जन्माला आला नसता तर त्या वेळीं नाहीं तरी आणखी पाच-पन्नास वर्षांनीं महाराष्ट्र स्वतत्र झाला असता किंवा लेनिन नसता तरी केव्हा ना केव्हां रशियांतली कामगार क्रांति यशस्वी झाली असती, हें कदाचित् खरें असेल; तरी पण पाच-पन्नास वर्षें का होईना, इतिहासाला मागें खेंचण्याकरितां लागणारी प्रचंड इच्छाशक्ति आणि अतुलनीय संघटना-कौशल्य एकट्या शिवाजींतच किंवा लेनिनमध्येंच होतें. रशियाची १९१७ सालांत जी परिस्थिति होती, तीच परिस्थिति १९२१ मध्यें जर्मनींत आली होती. जर्मनीचा कामगार-वर्ग रशियन कामगारांपेक्षांही क्रांतीच्या डावपेंचांत अधिक तरबेज होता; आणि तरीही लेनिनसारख्या एखाद्या महान् पुढाऱ्याच्या अभावीं जर्मन क्रांतीचा पराभव झाला.

परिस्थिति उपकारक असेल, पण तिचा भरपूर फायदा घेऊन चिरस्मरणीय ऐतिहासिक कार्य घडवून आणणें यातच महापुरुषाचें महत्त्व आहे.

म्हणूनच आजच्या परिस्थितीचा फायदा घेऊन हिंदुस्थान देशाला साम्राज्यशाहीच्या मगरमिठींतून सोडवायचा असेल, तर शिवाजीसारख्या संघटना-कुशल आणि बलाढ्य इच्छाशक्ति असलेल्या महापुरुषाची खरोखरच जरूरी आहे. पण मात्र तो शिवाजी तथाकथित राष्ट्रीय कवींना वाटतें त्याप्रमाणें मावळे घेऊन लढणारा आणि ' मराठा तितुका मेळवावा ' या वचनाप्रमाणें चालणारा प्रांतिक शिवाजी असून चालणार नाहीं. कारण आजच्या हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचा प्रश्न केवळ मराठ्याचा, केवळ हिंदूंचा, अगर केवळ मुसलमानांचाच नाहीं. आजचा प्रश्न हा साम्राज्यशाहीकडून आणि तिचा हिंदु, मुसलमान, पार्शी, खिस्ती, काळ्या-गोऱ्या भांडवल-वाल्या हिंदी साथीदाराकडून भरडल्या जाणाऱ्या हिंदु-मुसलमान आणि इतर जातींच्या असंख्य दलित जनतेचा आहे.

तो प्रश्न सोडविणारा शिवाजी स्वतःला महाराष्ट्रीय म्हणविणार नाहीं, हिंदु म्हणविणार नाहीं अगर मुसलमानही म्हणविणार नाहीं. त्याचा झेंडा सबंध मानवी जातीच्या रक्तासारखा लाल असेल. आणि हिंदुस्थानातल्या दलित जनतेची संघटना लोक-क्रांतीच्या व्यापक पायावर करून नुसता साम्राज्यशाहीचाच नव्हे, तर तिच्या हिंदु, मुसलमान, इत्यादि काळ्या साथीदाराचा आणि त्याचप्रमाणें जुन्या निवृत्तिमार्गी संताच्या चरित्राचें बोधामृत भोळ्या जनतेला पाजून साम्राज्यशाहीशीं चाललेल्या लढ्याचा विसर पाडूं पाहणाऱ्या पोटभरू पुराणिकाचा आणि मौलानाचा, आणि आर्य, अनार्य, हिंदु, मुसलमान असले जातिभेद आणि धर्मभेद फुगवून दाखवून आपला नीच स्वार्थ साधणाऱ्या भुरट्या लेखकांचा आणि वर्तमान-पत्रकारांचा, तो शिवाजी निर्दयपणें निःपात केल्याशिवाय राहणार नाहीं!

• • •

८५

## मोठें शून्य

सबंध दिवस डोकं खाजवून देखील एखादी गोष्ट केव्हां केव्हा मुळींच आठवत नाहीं. तेव्हा वैतागून आपण तिचा नाद सोडून देतों आणि स्वस्थ झोंपी जातों. आणि मग सकाळीं उठावं तों ध्यानींमनीं नसता ती चट्कन् आठवते आणि एक प्रकारचा विलक्षणच आनंद आपणाला होतो. काल संध्या-काळीं गणूकाकाशीं बोलता बोलतां त्यांनीं जी एक गोष्ट सांगितली, तिच्यावर ते गेल्यानंतर विचार करतां करता माझं थोडंसं असंच झालं. पंचवीस-तीस वर्षांपूर्वी शाळेंत गणित शिकायला मीं सुरुवात केली तेव्हांपासून गणितांतला एक कूट प्रश्न मला सुटला नव्हता, तो काल इतक्या वर्षांनीं अगदीं सहजासहजीं सुटून गेला.

गणूकाका आपल्या एका शेजाऱ्याची गोष्ट सांगत होते. मुंबईच्या लोखंड-बाजारांत कांहीं तरी बारीक सारीक कामं करून महिनाकांठीं जेमतेम चाळीस-पन्नास रुपये तो मिळवीत असे. बायको आणि पाच-सहा मुलं यांचा संसार एवढ्या रकमेंत चालवतां चालवतां त्याच्या नाकीं नऊ येत असत, आणि बिचारा सदा त्रासलेला असे. पुढं लढाई सुरू झाल्यापासून लोखंड-बाजाराला तेजी येऊं लागली आणि त्याला चांगला पैसा मिळूं लागला. कुणा तरी भागीदारा-बरोबर त्यानं स्वतंत्र व्यापार सुरू केला आणि पन्नास-पन्नास साठ-साठ हजारांच्या

उलाढाली त्याच्या हातून होऊं लागल्या. खाण्यापिण्याची ददात नव्हती, कपडालत्ता भरपूर मिळूं लागला, टॅक्सीशिवाय तो फिरत नसे; पण धंद्याचा व्याप इतका वाढला होता कीं रात्रीं पांच-सहा तास झोंपायलासुद्धां त्याला फुरसद नसे. एक मूल आजारी पडलं तर बाहेरगांवीं जाण्याच्या धांदलींत डॉक्टर आणायलाही त्याला वेळ नव्हता. बायकोनं डॉक्टर आणले, उपचार केले, पण तें पोर शेवटीं दगावलं; आणि हा त्या वेळीं घरींही नव्हता! तो परत आला तेव्हां त्याच्या दुःखाला पारावार राहिला नाहीं. सहा महिन्यांपूर्वी क्षयानं आजारी पडून तो नुकताच वारला होता. 'मला जें राहून राहून आश्चर्य वाटतं तें हेंच,' गणूकाका सांगत होते, 'शेवटीं त्याच्या भागीदारानं धंद्याचा हिशेब करता करता सत्तर-बाहत्तर हजाराची उलाढाल झाली होती आणि सत्तर-बाहत्तर हजार रुपये देणंही होतं. चाळीस पन्नास रुपये उत्पन्न आणि चाळीस पन्नास रुपये खर्च असताना कोंकणांत त्याचं जें एक घर होतं तेंच आता बाहत्तर हजाराची उलाढाल होऊनही बायको-मुलांना शिल्लक उरलं होतं!'

गणूकाका घरीं निघून गेल्यानंतर विचार करतां करतां नुकतीच कुठं तरी वाचलेली एक मजेदार गोष्ट मला आठवली उंच उडण्याचे अनेक उच्चांक मोडणारी एक ऑस्ट्रेलियन वैमानिक स्त्री तिबेटांतल्या एका पठारावर एकदां उतरली होती. तिथं एका गुहेंत कित्येक वर्षे तपश्चर्या करीत बसलेला कुणी तरी एक लामा आहे असं तिला कळलं. तेव्हां मोठ्या प्रयासानं त्याची परवानगी मिळवून ती त्याला भेटायला गेली.

'हं, काय करतेस तूं?' त्यानं तिला विचारलं.

'एका उड्डाणात मी ऑस्ट्रेलियाहून हिंदुस्थानात आलें.' ती म्हणाली.

'बरं, पुढं?' तो म्हणाला.

'आणखी एका उड्डाणात मी विलायतेला पोहोंचेन!'

'बरं, पुढं?'

'तिथून एका उड्डाणांत अमेरिकेला.'

'बरं, पुढं?'

'आणखी एकाच उड्डाणांत ऑस्ट्रेलियाला.'

'बरं, पुढं?'

' वीस हजार फूट उंचीचा उच्चांक मीं मोडला आहे. आतां तीस हजारावर जाण्याचा मी प्रयत्न करणार आहें. '

' बरं, मग पुढं ? '

' पुढं आणखी काय ? ' असं म्हणून वैतागून ती तिथून निघून गेली म्हणतात; आणि नंतर कसला तरी उच्चांक मोडतांना विमान कोसळून मरून गेली.

' पुढं काय ? ' ' पुढं काय ? ' असं तिला विचारण्यात मला वाटतं, त्या लामाचा उद्देश हाच होता कीं एवढे उच्चांक मोडून मोडून तूं पुढं काय करणार, तर शेवटीं मरणारच ना ? मग मी इथं वर्षानुवर्षे एका जागेवर बसून निर्वाण साधतों आहें तेंच अधिक चागलं नाहीं का ? मात्र हीच गोष्ट त्या लामावर तिलाही उलटविता आली असती, असं मला वाटतं. ' तूं काय दहा वर्षे तपश्चर्या केलीस; पुढं ? आत्म्याचं ज्ञान; पुढं ? निर्वाण; पुढं ? ' पुढं काय सांगणार होता तो लामा ? भौतिक प्रगतीची पराकाष्ठा करून ती मेली, आणि आध्यात्मिक प्रगतीचा उच्चाक गाठून तोही मरणार; पुढं काय, तर वजाबाकी शून्य !

गणूकाकाच्या त्या शेजाऱ्याला चाळीस-पन्नास रुपये मिळत तेव्हा उद्या काय होईल म्हणून संसाराची चिंता, सत्तर हजारांच्या उलाढाली केल्या तेव्हा तितकेच पट-अधिक धंद्याच्या चिंता. सुख जितक्या पटींनीं वाढत गेलं तितक्याच पटींनीं दुःखही वाढत जात होतं. लोक म्हणत होते, त्याची भरभराट होते आहे. धंद्याचीही अशीच प्रगति होत होती. पन्नास रुपयाची आवक आणि पन्नास रुपयाची जावक होती, त्याऐवजीं पन्नास हजारांची आवक आणि पन्नास हजाराची जावक झाली !

मागं एकदा गणूकाकानीं आधुनिक सुधारणेवर हल्ला चढविला होता. ' कसली आली आहे सुधारणा, ' ते म्हणाले होते, ' पूर्वी लोक कसे सुखात होते. धांदल नाहीं कीं गडबड नाहीं. मोटरी-विमानाच्या गोष्टी तुम्ही सागतां, पण या सुखाबरोबर अपघाताचीं नी हजार यातायातींचीं दुःखं वाढलीं की ! ' त्याच्या या प्रतिगामी विचारसरणीला खोडून काढताना मी मोठा पुरोगामी आव आणून म्हणालों होतों, ' पायथ्याशींच रखडणाऱ्या माणसानं, डोंगरमाथ्यावर उभा राहून सृष्टिसौंदर्य पाहणाऱ्याला हंसावं हवं तर, ' सृष्टिसौंदर्याचं

सुख मिळत असेल त्याला, पण ऊर फुटेपर्यंत वर चढायचं दुःख सहन करावंच लागतं कीं नाहीं पहिल्यांदा ! ' आणि हीच तर्कपद्धति पुढं चालवायची असेल तर दगड माणसापेक्षांही बरा; त्याला सुखदुःखाची कसलीच यातायात नाहीं ! जीवन म्हणजे लढा; काका, मोठं जीवन म्हणजे मोठा लढा; त्या लढ्यांतल्या जखमाही मोठ्या नी विजयही मोठा आणि अर्थात् त्या मोठ्या विजयाचं सुखही मोठं. '

प्रगतीचं हें सर्व तत्त्वज्ञान ठीक होतं. त्यांत कांहीं चूक नाहीं. दगडाला दुःख नाहीं आणि सुखही नाहीं. मागासलेल्या मानवाला सुख थोडं, पण त्याबरोबर दुःखही थोडं. प्रगत मानवाला सुख मोठं आणि दुःखही मोठं. म्हणजे शेवटीं वजाबाकी शून्यच. मग प्रगति म्हणजे काय ? अर्थात् मोठं शून्य ! लहानपणीं गणितं शिकवितांना पांचातून पांच गेले शून्य आणि पांच हजारांतून पांच हजार गेले तरी शून्यच हा घोंटाळा मला कळत नसे. पांच हजारातून पांच हजार गेले म्हणजे पांचांतून पांच गेल्यानंतर निघालेल्या शून्यापेक्षां मोठं शून्य आलं पाहिजे, असं मला वाटे. आणि मास्तरांना मी एकदां तसं म्हणालोंही. पण मास्तरांनीं ' गाढव आहेस; चल, चालता हो ! ' म्हणून मला हाकलून दिलं होतं. जवळ जवळ तीस वर्षांनीं तें कोडं सुटलं !



## ८६

## देवदारु आणि चक्रवाक्

सर्वांनाच असं होतं कीं काय कुणाला ठाऊक! मला मात्र असं केव्हां केव्हां होतं खरं. गेलीं पंचवीस-तीस वर्षे मुंबईच्या एका विशिष्ट रस्त्यावरून मी जातों-येतों आहें. पण परवां एक मोठी गंमत झाली. रस्त्यावरून जातांना नेहमीं आपण समोर पाहात चालतों. त्या रस्त्यावरून जातांना परवां सहज मीं वर मान केली आणि मला आश्चर्याचा धक्काच बसला! माझ्या दृष्टीला पडलेली इमारत इतकी सात मजले उंच असेल, आणि तिच्या शेवटच्या मजल्यावरील दगडी कमानी-वर इतक्या सुंदर चित्राकृति कोरलेल्या असतील, असं मला पूर्वी कधींच वाटलं नव्हतं गेलीं पंचवीस-तीस वर्षे ती इमारत त्या जागेवर आहे; गेलीं पंचवीस-तीस वर्षे त्या रस्त्यानं मी अगणित वेळां गेलों आहें; पण त्या इमारतीची ही भव्यता आणि हें सौंदर्य परवां मीं सहज मान वर केली तेव्हां माझ्या दृष्टीला पडलं. किती तरी वेळ माझं मलाच आश्चर्य वाटत होतं आणि मी त्या इमारतीकडे पाहात उभा होतों.

आणि असाच अनुभव कांहीं कांहीं शब्दांच्या बाबतींत मला आला आहे. एखाद्या खेळण्याच्या बाबतींत लहानपणीं होतं ना, तसंच शब्दांच्या बाबतींत माझं झालं आहे. लहानपणीं कुणीं तरी मला एक रंगीत पेटी बक्षीस दिली होती. दोन-चार महिने त्या पेटीचं कौतुक केल्यानंतर मुलांच्या नेहमींच्या संवयी-

प्रमाणं त्या पेटीवरचं माझं लक्ष उडालं आणि ती अडगळींत पडलेल्या इतर खेळण्यात जाऊन पडली. वर्ष दोन वर्षांनीं ती अडगळ चिवडीत असता ती पेटी माझ्या हातीं आली आणि उगाच त्या पेटीवर इकडेतिकडे मी टिचक्या मारूं लागलें ! एक टिचकी चुकून नेमकी त्या पेटींत असलेल्या कुठल्या तरी कळेवर बसली आणि त्या पेटींतून एक क्षण दोन क्षण टिन् टिन्...टण्... टण्...अशी सुंदर स्वरमालिका बाहेर पडली. त्या पेटींत अशी कांहीं कळ असेल हें पूर्वी मला माहीतच नव्हतं. मला ती एक साधी रंगीत पेटी वाटत होती. त्या पेटींतली ही नवीन गंमत अनुभवाला आल्याबरोबर माझ्या आनंदाला पारावार उरला नाहीं. या खेळण्यासारखंच पुष्कळ वेळां काही शब्दांचं होतं. ते शब्द अनेक वेळा आपण पाहात असतों, ऐकत असतों, वापरीत असतों, त्याचा अर्थ आपणाला पूर्णपणानं अवगत असतो; पण त्याच्यात दडलेलं एखादं अननुभूत सौंदर्य एकदम अनपेक्षितपणं केव्हा केव्हा आपल्या दृष्टीला पडतं.

देवदारु आणि चक्रवाक् या दोन संस्कृत शब्दातलं अदृष्टपूर्व सौंदर्य असंच माझ्या एकदा नजरेला आलं. देवदारु म्हणजे देवदाराचं झाड. एक विशिष्ट प्रकारचं लाकूड या झाडापासून मिळतं आणि त्याचे अनेक उपयोग आपण करतों; एवढं आपणा सर्वांना माहीत आहे. अमकं देवदाराचं लांकूड हेंही आपण ओळखूं शकतों. पण देवदारु – देवाचा वृक्ष – हेंच नाव या झाडाला का दिलं असेल याचा विचार आपल्या डोक्यात कधीं येतो का ? माझ्या डोक्यात तरी कधीं आला नव्हता. खुर्ची या शब्दाचा विचार करताना 'खु' आणि 'र्ची' या अक्षरांना कांहीं अर्थ असेल हा विचार जसा आपण कधीं करीत नाहीं, त्याप्रमाणंच देव व दारु याला कांहीं अर्थ असेल असं मला वाटत नव्हतं खुर्चीं म्हणजे अमुक एक वस्तु त्याप्रमाणंच देवदार म्हणजे अमुक एक झाड, इतकंच. पण काश्मीरात फिरत असतांना या शब्दामागं दडलेला भव्योदात्त अर्थ एकदम माझ्या ध्यानात आला. जीं झाडं पाहून देवदारु हें नांव संस्कृत भाषेंत स्फुरलं असेल तीं खरीं देवदाराचीं झाडं काश्मीरांतच दिसतात. बरीचशी संस्कृत भाषा याच प्रदेशांत बनली आणि कालिदासादि संस्कृत कवि याच वनश्रीचं अनेक वेळा वर्णन करतात. काश्मीरांतला हा देवदारु माडाइतका किंवा माडापेक्षाही उंच सरळ

आकाशात गेलेला असतो. निळसर हिरव्या रंगाच्या त्याच्या निबिड पर्णसंभाराचा घेर खालीं केवढा तरी मोठा असतो आणि तो लहान होत होत वर शेंड्याकडे देवळाच्या कळसाप्रमाणं अगदीं निमुळता होतो. देवालयाची किंवा चर्चची इमारत मुद्दाम एका विशिष्ट पद्धतीनं बांधलेली असते. वर निमुळती होत होत तिचा कळस उंच आकाशांत गेलेला असतो. हेतु हा, कीं पाहणाराचं मन वर, उंच, आकाशाकडे, देवाच्या निवासस्थानाकडे, ओढलं जावं.

एखादं भव्य देवालय पाहतांना जशा पवित्र मंगल भावना मनात जागृत होतात, अगदीं तशाच भावना काश्मीरातला हा भव्य सुंदर देवदारु पाहताना अनुभवाला येऊन मन प्रसन्न होतं. हा वृक्ष पाहिल्याबरोबर ज्यानं कुणीं देवदारु हें नाव त्याला पहिल्यादा दिलं असेल, त्याच्या तोंडातून तो शब्द अगदीं सहज बाहेर पडला असेल. तो धिप्पाड, भव्य, सुदर वृक्ष पाहिल्याबरोबर तो माणूस उद्गारला असेल, ‘ हीं इतर सटर-फटर वृक्ष-झाडं आम्हां माणसाचीं — हा महान् वृक्ष देवाचा वृक्ष — देवदारु ! ’ काश्मीरातला देवदार पाहिल्याबरोबर ‘ देवदारु ’ या शब्दातला हा सर्व अर्थ क्षणात माझ्या डोळ्यासमोर उभा राहिला.

देवदारु या शब्दाप्रमाणंच चक्रवाक् हा शब्द कित्येक वर्षे संस्कृत वाङ्मयात मी वाचतों आहें. चक्रवाक् हा एक पक्षी आहे. रात्र झाली कीं चक्रवाक् आणि चक्रवाकी या दोघाच्यामध्यें फक्त एक कमळाचं पान असतं; पण तीं एकमेकाना दिसत नाहींत आणि सारी रात्र दोघाना विरहव्याकुलतेंत काढावी लागते, असा संस्कृत वाङ्मयात एक सुंदर संकेत आहे. हें सर्व मला माहीत होतं. पण चक्र आणि वाक् हे चक्रवाक् या नावातले दोन्ही भाग किती अर्थपूर्ण आहेत याचा अनुभव असाच एकाएकीं काश्मीरातच मला आला. एका लहान गावांत नदीच्या काठाशीं असलेल्या एका हॉटेलांत मी राहात होतों. मध्यरात्रीं मी सहज जागा झालों. पहाडावरून उड्या मारीत वाहणाऱ्या नदीच्या पाण्याचा धो धो आवाज आणि आजूबाजूच्या प्रचंड पहाडावरील गर्द झाडींतून येणारा किर्रे ध्वाने कानावर येत होता. पण या सर्व आवाजाना मागं टाकणारा एक चमत्कारिक सूर माझ्या कानांवर पडूं लागला. कुणी तरी दोन पक्षी आळीपाळीनं आक्रंदन करीत होते. एकाचा करुण आर्त सूर चढत चढत वर जाई; आणि तो

हवेंत विलीन होतो न होतो तोंच दुसऱ्याचा वेगळा पण तितकाच आर्त करुण स्वर त्या हाकेला उत्तर देई. आणि हे स्वर इतके भेदक होते, कीं किती तरी वेळ मी तें ऐकतच राहिलों. नोकराला जागा करून हे कोण पक्षी आहेत म्हणून विचारतां त्यानं कांहीं तरी काश्मीरी नांव सांगितलं आणि नदीकांठीं असणारे हे पक्षी सबंध रात्रभर असाच आवाज करीत असतात असं तो म्हणाला. मी झोंपण्याचा प्रयत्न करूं लागलों; पण ते सूर अविरत माझ्या कानांवर पडत होते. मला ते दुसरं कांहीं सुचूंच देईनात ! किती वेळानं मला झोंप लागली कुणाला ठाऊक, पण सकाळीं जागा झाल्याबरोबर ते सूर ऐकूं येत नव्हते. तरीही सारखे तेच माझ्या कानांत घुमत होते. एकदम माझ्या डोक्यांत कल्पना चमकली. हीच ती चक्रवाकाची जोडी. एकदां पहिल्याचे विशिष्ट सूर, नंतर दुसऱ्याचे, नंतर पहिल्याचे, नंतर पुन्हा दुसऱ्याचे असं सारखं रात्रभर त्यांच्या वाचेच चक्र चालू असतं म्हणून ते चक्रवाक् ! एकानं हाक मारायची आणि दुसऱ्यानं तिला साद द्यायची. अशा त्यांच्या त्या स्वरमालिकेंत इतकी विलक्षण आर्तता असते, कीं हे दोन पक्षी अगदीं एकमेकाजवळ असून कांहीं तरी कारणानं एकमेकापाशीं जाऊं शकत नाहींत ही कल्पना कुणाच्याही मनांत अगदीं सहजासहजीं यावी. रात्रीच्या वेळीं त्या पक्ष्याच चाललेलं तें अविरत आक्रंदन कानांवर पडल्याबरोबर कमल-पत्रानं दोघं दूरावल्याचा तो मनोहर संकेत एखाद्या संस्कृत कवीच्या मनात अगदीं सहज संभवला असेल यांत नवल नाहीं.

● ● ●

८७

## प्रसिद्धि आणि प्रसिद्धि

बरेच दिवस गणूकाकांची गांठ पडली नव्हती. म्हणून सहज मी त्या दिवशीं सकाळीं त्यांच्याकडे गेलों. नाकावर चष्मा ठेवून कांहीं तरी वाचीत ते आराम खुर्चीवर पडले होते. मी आंत गेल्याबरोबर त्यांनीं वर्तमान-पत्र बाजूला टाकलं, आणि टेबलावर पडलेल्या एका मासिकाचा अंक हातांत घेत चष्म्यावरून माझ्याकडे पाहात ते म्हणाले, ' काय रे, हें शोभतं काय रे तुम्हां लोकांना ? '

मला वाटतं नुकतंच त्यांनीं तें मासिक वाचलं होतं, आणि मला केव्हां एकदां त्याचा जाब विचारीन असं त्यांना झालं होतं. आणखी थोडा वेळ मी आलों नसतों, तर तेच माझ्याकडे यायला निघाले असते. त्या मासिकांत माझे बरेचसे वेगवेगळे फोटो आणि माझ्याविषयीं बराचसा मजकूर आला होता.

' काय ? ' मी अगदीं निरपराध चेहरा करून म्हणालों.

' काय ही प्रसिद्धीची हांव ! ' सात्त्विक दुःखानं माझी कींव करीत ते म्हणाले.

' कुणाला ? ' मीं विचारलं.

' जसं काय कांहींच झालं नाहीं असं ढोंग करतोस काय ? ' ते बोलूं लागले, ' या मासिकांतले स्वतःचे हे फोटो तूं पाहिले नाहींस ? '

' पाहिले ना, ' मी म्हणालों, ' दोन प्रती आहेत त्या मासिकाच्या माझ्याकडे. फारच छान आहेत फोटो ! '

' काय निर्लज्ज माणूस आहेस ! स्वतःची अशी प्रसिद्धि करून घ्यायला तुला काहींच वाटत नाहीं ? ' निर्भर्त्सनेच्या स्वरात काकांनीं विचारलं.

' हें पाहा, काका ', मी शांतपणं म्हणालों, ' मला दोष द्यायच्या आधीं तुम्हीं दोन गोष्टी सिद्ध केल्या पाहिजेत. एक, प्रसिद्धि ही गोष्ट वाईट आहे; आणि दोन, ती मिळवण्याचा मीं खटाटोप केला. एक गोष्ट मी स्पष्टच सांगून टाकतों. या मासिकात माझा एक लेख आणि माझ्यासंबंधीं एक-दोन लेख यायचे होते म्हणून त्या मासिकाच्या संपादकानं माझे एक-दोन फोटो माझ्या-कडून मागवले आणि एक-दोन स्वतः होऊन पैदा केले. पण मी तुम्हाला हेंही सांगतों, कीं माझ्या प्रसिद्धीकरिता खटाटोप करण्याकरिताही मी मागंपुढं पाहणार नाहीं. प्रसिद्धीकरिता खटाटोप करणं, हें नेहमींच वाईट असतं असं मला मुळींच वाटत नाहीं. मला एखादं चांगलं कार्य करायचं असेल तर त्या कार्याची आणि त्याबरोबर माझीही भरपूर प्रसिद्धि करायचा मी जरूर खटाटोप करीन ! काय समजलांत ? '

' समजलों—समजलों, ' काका ओरडले, ' प्रसिद्धिविन्मुख असलेले मोटमोठे देशभक्त आणि थोर थोर लेखक हे सर्व वेडे आणि तू एक काय तो शहाणा ! समजलों ! '

' काय हो, काका, ' मीं मिस्किलपणं विचारलं, ' हे तुमचे मोठमोठे देश-भक्त आणि थोर थोर लेखक एवढे जर प्रसिद्धिविन्मुख आहेत, तर हे लोक मोठमोठे आणि थोर थोर आहेत ही गोष्ट तुमच्यासारख्या घरांतून फारसा बाहेर न पडणाऱ्या एका रिटायर्ड पेन्शनराच्या कानावर येऊन कशी काय थडकली ? त्याच्या प्रसिद्धिविन्मुखतेची खूपच प्रसिद्धि झालेली दिसते ! '

" ते स्वतः होऊन सांगत फिरत नाहींत आपला मोठेपणा. लोक बोलतात त्याच्याविषयीं. ' काका म्हणाले.

' स्वतः होऊन स्वतःचा मोठेपणा सांगत फिरावा, असं मी म्हणत नाहीं; पण प्रसिद्धि ही मुळातच जर इतकी वाईट घाणेरडी गोष्ट असती, तर या मोठ्या लोकांनीं आपलं नांव स्वतःच्या घराबाहेर, फार काय, स्वतःच्या तोंडा-बाहेरही जाऊं दिलं नसतं — स्वतः आहोत कीं नाहीं याचीही कुणाला दाद लागूं दिली नसती. तेव्हा प्रसिद्धि ही कांहीं तुम्ही म्हणतां तितकी वाईट गोष्ट

दिसत नाहीं ! ' यावर काका काहीं तरी वितंडवाद घालूं लागले; पण त्याच्या बोलण्यांत काहीं अर्थ नव्हता.

काकांसारखंच बऱ्याच लोकांचं आहे. कुणी तरी एक गोष्ट वाईट म्हणतो. तो म्हणतो म्हणून दुसरा म्हणतो. दुसरा म्हणतो म्हणून तिसरा म्हणतो. आणि मग सर्वच ती गोष्ट वाईट म्हणू लागतात. खरोखर त्यात वाईट काय आहे आणि बरं काय आहे याचा कुणीच विचार करीत नाहीं. प्रसिद्धिलोलुपता ही गोष्ट वाईट आहे, असं कुणी तरी म्हणतो. त्यातली लोलुपता लुप्त होते आणि प्रसिद्धिच वाईट आहे, असं प्रत्येकजण म्हणूं लागतो. लोलुपता प्रसिद्धिचीच कां, कुठल्याही गोष्टीची वाईट आहे. घट फोडून किंवा पट फाडून येन केन प्रकारेण एखादा माणूस प्रसिद्धि मिळवण्याचा प्रयत्न करूं लागला कीं तो आपोआपच हास्यास्पद ठरतो. एखादा ' क्ष ' मनुष्य एखाद्या ' य ' स्त्रीशीं लग्न करतो आणि दुसरं कसलंही सत्कृत्य त्यापूर्वी केलं नसताना किंवा त्यापुढं करण्याचा विचार नसताना आपले सहकुटुंब फोटो छापून यावे म्हणून खटपट करीत असतो. तेव्हा त्याला लोक हंसतात, हें ठीकच आहे. अर्थात् यांतही मला फारसा भयंकर गुन्हा आहे असं वाटत नाहीं. मानवी मनाची ही अगदीं एक क्षम्य दुर्बलता आहे. माणूस हा कळप करून राहणारा प्राणी आहे, आणि चार माणसानीं आपणाला ओळखावं, चार माणसानीं आपणाला बरं म्हणावं असं त्याला वाटलं तर त्यात कांहीं फारसं वाईट आहे असं मला वाटत नाहीं.

म्हणूनच प्रसिद्धि-विन्मुखता हें एक थोतांड आहे, असं माझं स्पष्ट मत आहे. एखादा मोठा माणूस स्वतःचा फोटो छापूं देत नाहीं, किंवा चारचौघात येऊन बोलत नाहीं, तेव्हा तो प्रसिद्धि-विन्मुख नसून विक्षिप्त किंवा माणूसघाण्या तरी असतो, किंवा आपण काहीं चागलं कार्य करतों आहोंत, याबद्दल त्याची स्वतःचीच खात्री नसते, अशी माझी ठाम समजूत आहे. आपण करीत आहोंत तें चागलंच करीत आहोंत असा ज्याला आत्मविश्वास वाटत असतो, त्याला आपल्या कार्याची आणि साहजिकच त्याबरोबर आपलीही भरपूर प्रसिद्धि व्हावी, जास्तींत जास्त लोकांना आपल्या कार्याची महती पटावी आणि त्या कार्याचा सर्वत्र प्रसार व्हावा, असं जरूर वाटलं पाहिजे. प्रसिद्धीकरिता कांहीं तरी करणं वाईट असेल, पण कांहीं तरी केल्याची प्रसिद्धि झालीच पाहिजे.

● ● ●

## ८८

### सीलबंद चांगुलपणा ?

लहानपणीं ज्या कारणाकरितां मला माझ्या आजीचा केव्हां केव्हां राग येई, त्याच कारणाकरितां आतां मोठेपणीं माझ्या काहीं अगदीं जिवलग मित्राचा मला कधीं कधीं राग येतो. माझ्या आजीनं माझ्याकरितां खूपच कष्ट केले होते, आणि माझ्या बऱ्याकरितांच ती तसं बोले; पण मला वाटतं त्यामुळं माझा स्वाभिमान दुखावला जाई आणि मला राग येई.

माझ्या मनाच्या कणखरपणाचा आतां माझे मित्र केव्हां केव्हा संशय घेतात. ती माझ्या शरीराच्या शक्तीचा संशय घेत असे. पण एकंदरीनं माझ्या मनावर तोच परिणाम होतो. काय गंमत होई ती सांगतों. शाळेंत असताना मीं एका व्यायाम शाळेंत नांव घातलं होतं. थोडे दिवस व्यायाम केल्यानंतर माझं शरीर बरंचसं कमावलं आहे, असं मला वाटूं लागलं. माझ्या बरोबरीच्या एका मुलाबरोबर मी कुस्ती खेळणार होतों. मी मोठ्या ऐटींत आजीला सांगूं लागलों, ' आजी, उद्यां मी मन्याबरोबर कुस्ती खेळणार आहें. त्याला पाडून टाकतों बघ ! '

' चल, खुळा कुठला ! ' आजी एकदम म्हणाली, ' उगाच कुठं तरी दुखवून घेशील, — हाडबीड मोडेल— कुस्ती कसली करतोस ! '

माझ्यावरल्या मायेमुळं मला कुठं लागूं नये म्हणूनच ती बोलली खरी; पण माझा चेहरा एकदम पडला. मला तिचा राग आला. माझ्या शक्तीवर हिचा इतका विश्वास नाहीं काय ? मन्याला मी पाडूं शकणार नाहीं ?—मीच पडेन ?

अगदीं अस्संच माझे मित्र मला उपदेश करूं लागले म्हणजे मला होतं. मला ते फार चांगला माणूस समजतात आणि चांगलाच राहावं, — माझ्या चांगुलपणाला गालबोट लागूं नये या उदात्त उद्देशानंच ते बोलत असतात, हें अगदीं खरं आहे. त्यांच्या मित्रभावाचा मी मुळींच संशय घेत नाहीं. तरी पण मला वाईट वाटतं. तें असं होतं.

कुठल्या तरी, सर्वसामान्यपणं शिष्ट लोकात वाईट समजल्या जाणाऱ्या एका मासिकात माझ्या चार-पाच लेखाची एक लेखमाला एकदा येऊन गेली. ती लेखमाला चालू असतां दोन-तीन भले मित्र मला मुद्दाम भेटायला आले.

'काय हें, तुझ्यासारख्यानं त्या मासिकांत लेख द्यायचे ?' ते अगदीं कळवळून म्हणाले.

'मी म्हणजे कोण टिक्कोजीराव ?' मी मुद्दाम रागानं म्हणालों, 'मी स्वतःला भलताच शिष्ट समजत नाहीं !'

'तसं नव्हे रे — तुझे लेख चांगले आहेत. पण त्या मासिकांत तूं द्यायला नको होतेस !'

'का ?— तो मासिकवाला माझ्याकडे येतो, माझ्याशीं चांगलेपणानं वागतो, माझ्या लेखात एका अक्षराचाही बदल करीत नाहीं. आणि योग्य मोबदलाही देतो. मी तर म्हणतों, तिथं लेख दिल्याबद्दल तुम्हीं माझं मनःपूर्वक अभिनंदन केलं पाहिजे !'

'कां बुवा ?'

'त्या मासिकांत लिहिल्यामुळं माझे लेख तर वाईट झालेले नाहींत ना ? तुम्ही नेहमीं अपेक्षा करतां तितके चांगले आहेत ना ते ?"

'होय.'

'मग माझं अभिनंदन करा. कारण त्या मासिकाच्या एकंदर वाईटपणांत तेवढाच चांगलेपणा माझ्यामुळं आला ! हो, — मीं जर लेख दिला नसता तर तीही जागा वाईटानं भरली असती. हें सत्कृत्य केल्याबद्दल माझं अभिनंदन नको करायला तुम्हीं ?'

'करतों बुवा, — तुझी हवी तर मिरवणूक काढतों !'

'हें पाहा, असं थट्टेवर नेऊं नका. — तुम्हाला दुसरी एक गोष्ट सांगतों.'

'हं, आणखी काय!'

'तुम्ही सर्व मला चांगले लोक वाटता, आणि तुम्ही चागले आहातच. होय ना?'

'अर्थात्!'

'मग ताबडतोब चौपाटीवर जाऊन जीव द्या बघूं!'

'म्हणजे?'

'म्हणजे, जग हें वाईटानं भरलेलं आहे, — चागलं फार थोडं. तेव्हां चांगल्या लोकांनीं या वाईट जगात राहायचंच कशाला! — वाईटाशीं मुळींच संबंध ठेवूं न इच्छिणाऱ्या तुमच्यासारख्या चागल्या लोकानीं ताबडतोब आत्महत्याच केली पाहिजे!'

माझ्या मित्रांचा मला इतका राग यायचं कारण त्यांच्या मनात जरी नसलं तरी त्या उपदेशाच्या मागं कल्पना ही होती, कीं मी एक कमकुवत मनाचा माणूस आहें. वाईटाकडे गेल्यामुळं वाईटाचं थोडंबहुत चागलं करण्याऐवजीं मीच वाईट होईन, असं त्याना वाटलं. जग वाईट असलं तरी आपण चागले आहोंत आणि जग सोडून जायचं आपणाला काहीं कारण नाहीं; कारण वाईट जगाच्या संपर्कानं आपण वाईट होण्याऐवजीं जगाचंच आपण काहींतरी चागलं करूं अशी मात्र त्याची खात्री होती. आणि हाच मुख्य मुद्दा आहे. निर्भेळ वाईट किंवा निर्भेळ चागलं असं जगात काहींच नाहीं. प्रत्येक माणसांत, प्रत्येक गोष्टींत, प्रत्येक घटनेंत चागल्या-वाईटाचं मिश्रण असतंच. वाईट अधिक असलं आणि चागलं थोडं असलं कीं आपण त्या गोष्टीला वाईट म्हणतों; चागलं अधिक असलं कीं चागली म्हणतों. जगांत जें हें थोडं चागलं आहे तेंच सर्व वाईटाला बरोबर घेऊन जगाला पुढं नेत असतं. म्हणूनच मी म्हणतों, कीं चागल्यानं वाईटाकडे मुद्दाम गेलं पाहिजे. वाईटाला टाळा का? — हिम्मत असेल, तर वाईटाकडेच जा!

● ● ●

## ८९

## हेतुमापन यंत्र आहे कुठें ?

कांहीं पुरुष स्त्रियांना उगाच त्रास देतात, तेव्हां स्त्रियांनीं आपला दुबळेपणा सोडून देऊन स्वावलंबी व्हावं आणि त्या पुरुषाचं ताबडतोब पारिपत्य करावं, असं आपण सांगत असतों. आणि तें ठीक आहे. पण आमच्या या सांगण्या-मुळं कांहीं स्त्रियाच्या डोक्यात वारा शिरून जगातल्या सर्व स्त्रिया म्हणजे सद्-गुणाच्या खाणी आणि सर्व पुरुष म्हणजे गटारपाणी, अशी कल्पना त्या करून घेऊं लागल्या आहेत कीं काय असा दाट संशय मला अलीकडे येऊं लागला आहे.

एक अत्यंत सात्त्विक वृत्तीचा कॉलेज-विद्यार्थी माझ्या ओळखीचा आहे. चिमणीएवढं तोंड करून परवां तो माझ्याकडे आला आणि एक गोष्ट सांगूं लागला तेव्हा माझा संताप अनावर झाला. मुंबईतल्या कॉलेज-विद्यार्थ्यांची कुठं तरी एक सभा होती. विद्यार्थी-विद्यार्थिनींची खूप गर्दी झाली होती. हा विद्यार्थीही त्या सभेला गेला होता. एवढ्या मोठ्या गर्दीत चुकून त्या विद्यार्थ्याचा एका विद्यार्थिनीला धक्का लागला. तो ताबडतोब वळला, आणि ' मला वाईट वाटतं ! ' असं म्हणाला. पण त्याचे ते शब्द पुरे व्हायच्या आंतच त्या मुलीनं पायांतली चप्पल काढली, आणि त्याच्यावर उगारून अपशब्दांचा वर्षाव ती त्याच्यावर करूं लागली. तो तोंड घेऊन तिथून निसटला, आणि घरीं परत आला.

' झालं तें ठीक झालं — तुला तसंच पाहिजे, ' मी रागानें म्हणालों.

‘ म्हणजे — तुम्हीं पण, ’ तो चाचरला.

‘ तुझा अपराध नव्हता ना ? — तूं दिलगिरी प्रदर्शित केली होतीस ना ? ’

‘ हो. ’

‘ मग तिनं चप्पल उगारल्याबरोबर तूं खाड्‌कन तिच्या एक थोबाडींत मारायला हवी होतीस ! ’ मी म्हणालों.

‘ का...काय ? ’

‘ तुला काय म्हणायचंय् तें आलं माझ्या लक्षात. एका स्त्रीच्या अंगावर हात कसा टाकायचा ? होय ना ? ’

‘ हो ! ’

‘ मूर्खा, या जुन्या जमान्यांतल्या गोष्टी झाल्या. आतां स्त्रियाना समान हक्क द्यायचे आहेत ! तुझी धाकटी बहीण अचरटासारखी वागली, तर तिला एक चापटी मारून तूं ताळ्यावर नाहीं का आणीत ? सणसणीत थप्पड मारणाऱ्याच्या हेतूचा कुणी संशय घेऊंच शकत नाहीं. सात्त्विक संताप हा एकच हेतु त्या वेळीं असूं शकतो. विनयभंगाचाही आरोप येऊं शकणार नाहीं. स्त्रीचा विनयभंग करूं पाहणारा माणूस कधीं तिच्या थोबाडींत मारतो ? पांच-पन्नास लोकांसमोर दिवसा उजेडीं एका मुलीच्या थोबाडींत मारणाराला सात्त्विक संतापच आला असला पाहिजे, — तसंच काहीं तरी कारण झालं असलं पाहिजे यावर कुणीही न्यायाधीश विश्वास ठेवील. तूं एक चांगला माणूस आहेस, — तुझ्या हातून वाईट गोष्ट होणं शक्य नाहीं, याबद्दल माझी खात्री आहे; पण पळून जाऊन तूं स्वतःलाच नव्हे तर इतरांनाही अन्याय केलास म्हणून तुझा मला अतिशय राग आला. ’

‘ इतरांना अन्याय ? ’

‘ हो. ज्याचा ज्याचा म्हणून चुकून कुठं धक्का लागेल त्या प्रत्येक चांगल्या माणसाला ती मुलगी आता वाईट समजणार. ’

खरोखरच त्या मुलाच्या भित्रेपणामुळं त्या मुलीच्या मूर्खपणाला उत्तेजन मिळालं, असं मला वाटतं. एका मुलाचा धक्का लागल्यामुळं तिच्या सद्‌गुणांची सात मजली इमारत एकदम खालीं कोसळली असेल, असं मला मुळींच वाटत नाहीं. तिनें तो जो देखावा केला, तो थोडक्या श्रमांत एक वीर-स्त्री म्हणून सवंग

लोकप्रियता मिळवण्याच्या हेतूनं. यावरून स्त्रियाना धक्के देणारे सर्व लोक सत्पुरुष असतात, अशी माझी कल्पना असल्याचा कुणींही गैरसमज करून घेऊं नये. चागले सोज्वळ दिसणारे कित्येक पुरुष मवालीपणा करूं शकतात, हें मी कबूल करतों. पण सात अपराधी लोक निर्दोष म्हणून सुटले तरी हरकत नाहीं, पण एक निरपराध मनुष्य फांसावर लटकता कामा नये, हें कायदेशास्त्रांतलं तत्त्व व्यवहारांतही कसोशीनं पाळलं गेलं पाहिजे. कोणतं कृत्य वाईट हेतूनं केलं गेलं आणि कोणतं चांगल्या हेतूनं केलं गेलं याला व्यवहारात काहीं तरी मर्यादा आहे. म्हणूनच वाईट हेतूनं केल्या गेलेल्या कृत्याचीही केव्हा केव्हां दखल घेता येत नाहीं. कारण सुक्याबरोबर ओलं विनाकारण जळून जायच. धक्के देणारे काहीं मवाली असतील, पण ते मवाली सुटून गेले; आणि माझ्या गरीब, सात्त्विक मित्राच्या अब्रूला मात्र काळोखी लागली आणि त्याला जीव नकोसा झाला. इतकी ठिसूळ अब्रू असलेल्या बायानीं गर्दीत जाऊंच नये. जायचंच असेल, तर बऱ्या-वाईट माणसाचे धक्के लागणार, हें धरून चालावं. आणि इतकं झाल्या-वरही चप्पल उगारून वीर-माता, वीर-पत्नी, वीर-भगिनी, वीर-स्त्री म्हणून कीर्ति मिळवायची असेल, तर माणसाच्या मनातला हेतु अचूक दाखवणारं एक हेतु-मापक यंत्र त्यानीं बरोबर बाळगावं !



## १०

## ही पाहा संस्कृति !

' तुम्ही सुंदर आहा ! ' या शब्दानीं एखाद्या स्त्रीच्या सौंदर्याला एखाद्या पुरुषान प्रशस्तिपत्र दिलं, तर तिला बरं वाटतं; पण तेंच एखाद्यानं नुसत्या डोळ्यानीं दिलं तर तिला राग येतो, या गोष्टीचं मला राहून राहून आश्चर्य वाटतं. एखादा पुरुष एखाद्या स्त्रीकडे मुद्दाम पाहतो तेव्हां तिच्यांत कांहीं तरी पाहण्यासारखं आहे, ती सुंदर आहे हें तो एक प्रकारं कबूल करीत असतो. पण स्त्रियाना ही गोष्ट आवडत नाहीं. जुन्या, कर्मठ स्त्रियांची गोष्टच सोडा, पण चांगल्या आधुनिक, चारचौघात मिसळणाऱ्या, खेळाडू वृत्तीच्या तरुण स्त्रियाही ' अमका माझ्याकडे पाहतो; तमका मला न्याहाळतो ! ' अशा प्रकारच्या तक्रारी करीत असलेल्या आढळतात.

माझ्या माहितींतली एक मुलगी नेहमीं अशा तक्रारी करीत असे. एके दिवशीं मीं तिला चांगलाच जबाब दिला.

' माझ्या वर्गातला अमुक अमुक मुलगा एकसारखा माझ्याकडे पाहतो, ' ती म्हणाली.

' नशीब तुझं, ' मीं म्हटलं, ' त्याचे आभार मान ! आमच्याकडे कुणी पाहात नाहीं म्हणून आम्ही दुःखी-कष्टी होतों; आणि तुझ्याकडे लोक पाहतात म्हणून तूं रडतेस. काय मनुष्य-स्वभाव आहे ! '

‘ थट्टा काय करता ? ’ ती म्हणाली, ‘ तो मुलगा फार वाईट आहे. ’

‘ तुझ्याकडे तो नुसता पाहतो आहे तोंपर्यंत त्याच्यांत कांहीं वाईट आहे, असं मला मुळींच वाटत नाहीं. तुझ्यात कांहीं तरी पाहण्यासारखं आहे,— तरुण आहेस, सुंदर आहेस तोंपर्यंत लोक तुझ्याकडे पाहताहेत तरी; आणखी पांच-दहा वर्षांनीं तूं पैसे देऊन पाहा म्हटलंस तरी कुणी पाहणार नाहीं ! जा घरीं, आणि फारच त्रास होत असेल तर बुरखा घेऊन फिरत जा ! ’

माझी खात्री आहे कीं लोक आपल्याकडे पाहतात याचा मनांतून तिला आनंद होत होता; पण बाहेरून ती उगाच कांगावा करीत होती. याचं कारण अगदीं उघड आहे. पुरुषांनीं आपणाकडे पाहिलं कीं आपणाला आनंद होतो, असं आपण दाखवलं तर लोक आपणाला वाईट म्हणतील. तेव्हा दुसऱ्यालाच अगोदर वाईट ठरवून टाका ! युद्ध-शास्त्रांतला जो नियम आहे कीं, ‘ आक्रमण हेंच उत्तम आत्मरक्षण ! ’ ( Offensive is the best defensive ) तोच नियम स्त्रिया पाळीत असाव्या !

मात्र माझं हें तत्त्वज्ञान माझ्या एका मैत्रिणीला मीं तावातावानं सांगत असता तिनं माझे चागलेच कान उपटले. तिच्या म्हणण्यांत बरंच तथ्य होतं, आणि मला तें पटलंही.

‘ पुरुषजातीचे एक महान् कैवारी म्हणून मी तुमचं अभिनंदन करतें, ’ ती म्हणाली, ‘ जरा कुणीं पाहिलं कीं ‘ इश्श ’ ‘ इश्श ’ म्हणून नाक उडवणाऱ्या कांहीं स्त्रिया तुम्ही म्हणतां त्या प्रकारच्या असतील,' आणि एखाद्या चागल्या पुरुषानं आमच्याकडे पाहिलं तर आम्हांला बरं वाटतं, हेंही मी कबूल करतें; पण एखादा मनुष्य तुमच्याकडे एकसारखा पाहायला लागला,— मग त्याचे हेतु कांहींही असोत, तुम्हाला कसंसंच वाटतं कीं नाहीं ? ’

‘ हो, वाटतं ना, ’ मी म्हणालों.

‘ झालं तर, ’ ती म्हणाली, ‘ कणखर मनाच्या तुम्हा पुरुषांना जर कसंसंच वाटतं, तर आम्हां बायकांना थोडं कसंसंच वाटलं तर तुम्हाला नवल कां हो वाटतं ? दुसऱ्याला कसंसंच वाटायला लावणं बरं का ? ’

‘ कबूल आहे, बुवा ! ’ मी उद्गारलों.

कबूल केल्याशिवाय मला गत्यंतरच नव्हतं; कारण पुरुषांनीं बायकानाच काय पण कुणीं कुणालाच कधींही कसंसंच वाटायला लावूं नये, असं मला वाटतं. माणसाच्या संस्कृतीची माझी मुळीं व्याख्याच अशी आहे. आपल्या बोलण्यानं, चालण्यानं, वागण्यानं कुणाला कधींही कसंसंच वाटूं न देणं म्हणजेच संस्कृति ! आणि ही संस्कृति नुसती पुस्तकं वाचून, पदव्या घेऊन किंवा जगभर प्रवास करून येतेच, असं नाहीं. मनाचीच तशी घडण असावी लागते, असं मला वाटतं. म्हणूनच गणूकाका फारसे शिकलेले नाहींत, फार कुठं फिरलेले नाहींत, तरी पण गणूकाकाना मी माझ्यापेक्षां किती तरी अधिक सुसंस्कृत समजतों. एकच उदाहरण देतों. गणूकाकाना मीं एक काचेची सुंदर फुलदाणी दिली होती. एकदा मी, काका आणि दुसरा एक गृहस्थ काकाच्या खोलींत कांहीं तरी गप्पा करीत बसलों होतों. तो हातवारे करून कांहीं तरी सागत होता; त्याचा चुकून त्या फुलदाणीला हात लागला, आणि ती खालीं पडून तिचे तुकडे तुकडे झाले. थोडाच वेळ कां होईना, पण ती सुंदर फुलदाणी फोडल्याबद्दल मला त्या गृहस्थाचा राग आला. मी कांहीं बोललों नाहीं तरी पण माझ्या चेहऱ्यावर नापसंतीच्या रेषा खात्रीनं उमटून गेल्या असणार. कांहींच झालं नाहीं, असं मोठ्या प्रयासानं मीं दाखवलं त्या गृहस्थाचं माझ्या चेहऱ्याकडे लक्ष गेलं असतं तर त्याला कसंसंच वाटलं असतं. त्यानं पाह्यलं नाहीं, ही गोष्ट वेगळी. पण त्या वेळीं काका किती सहजपणं वागले. त्या गृहस्थाच्या तोंडून कांहीं दिलगिरीचे शब्द बाहेर पडायच्या आंतच काका एकदम म्हणाले,

‘ अहो. त्यांत कांहीं नाहीं. त्या शेजारच्या बंडूनं कालच तिचे दोन तुकडे केले होते. टाकून देण्याऐवजीं मीं आपले जुळवून ठेवले होते. तुम्ही उगाच निमित्त झालांत, एवढंच. ते तुकडे मीं टाकायला पाहिजे होते ! ’

त्या गृहस्थाच्या मनावरचं ओझं एकदम उतरलेलं दिसलं.

तो निघून गेल्यावर मी काकांना म्हटलं, ‘ ते फुटके तुकडे उगाच कशाला जुळवून ठेवले होतेत, काका ? ’

‘ अरे, कुठं फुटले होते ! चांगली धड होती ती ! ’

‘ म्हणजे ! ’

'एकदां फुटली ती पुन्हा का सांधणार होती ? त्या बिचाऱ्याला वर आणखी वाईट वाटायला कशाला लावायचं ?'

मी थक्क झालों. काकांचा मला अभिमान वाटला. मात्र काकांच्या सुसंस्कृत-पणाविषयीं मला काय वाटतं तें मी त्यांच्या तोंडावर कधींच बोललों नाहीं आणि बोलणारही नाहीं; कारण माझ्याच शब्दांचा आधार घेऊन ते माझ्या डोक्यावर चढून बसायचे आणि मला पदोपदीं हिणवायचे !



## ११

## मला ‘ आचारी ’ हवेत !

मुद्दाम होऊन तंबाखू ओढायची मला संवय नाही; पण कधीं कुणी सिगार किंवा सिगारेट दिली तर मी नाहीं म्हणत नाहीं; ओढून टाकतों. मला अमुक व्यसन नाहीं नी तमुक व्यसन नाहीं, असं सांगायचा माझा मुळींच उद्देश नाहीं; कारण तंबाखू ओढणारांत माझ्यापेक्षा किती तरी चांगले लोक आहेत, आणि तंबाखूला स्पर्शही न करणारात वाईट लोक काहीं थोडे नाहींत, याची मला पूर्ण जाणीव आहे. तंबाखू ओढण्यात मला आनंद वाटला असता, तर मीं भरपूर तंबाखू ओढली असती; पण प्रकृतींतल्या काहीं तरी वैशिष्ट्यामुळं मला तंबाखू आवडत नसावी. आणि म्हणून मी ओढीत नाही, इतकंच. मग सिगरेट कुणी देऊं केली तर मी कां घेतों? कदाचित् भिडस्तपणामुळं किंवा दुसऱ्याला उगाच एवढ्याशा कारणासाठीं वाईट वाटायला कशाला लावा, म्हणून असेल. कदाचित् याहीपेक्षां दुसरं एक कारण असावं, असं मला वाटतं. आपण कुणी तरी शिष्ट आहोंत, असं इतरांना भासवल्यास ते आपणांशीं विरोधी वृत्ति धारण करतील, या भीतीनं इतरांपेक्षां आपणाला श्रेष्ठ ठरवणारं एखादं वैशिष्ट्य आपणांत असेल तर तें दुसऱ्याच्या डोळ्यावर न येईल असं करण्याचा तर यांत हेतु नसावा? माणसाला माणसांत राहायचं असल्यामुळं शक्य तों त्याला इतरांची सहानुभूति हवी असते. आपण कुणी तरी वेगळे आहोंत, इतरांपेक्षां आपणांत विशिष्ट व्यक्तित्व आहे

या कल्पनेनं माणसाला आनंद होत असला, तरी दुसऱ्याची सहानुभूति गमावूं नये म्हणून इतरांपेक्षां आपण वेगळे नाहीं, असं दाखवण्याचा तर माणूस प्रयत्न करीत नसावा? उगाच वांकडी टोपी घालून कुणी मुद्दाम पेटींत चालत असला, कीं त्याची टोपी उडवावी अशी अनावर इच्छा इतराना होते. तेव्हा इतरा-प्रमाणं सरळ टोपी घालून जाव, हेंच बरं !

दुसऱ्याना वाईट वाटूं नये म्हणून सरळ टोपी घालून जाणं हा त्या टोपीच्या मालकाचा भलेपणा झाला; पण एखाद्याची टोपी उंच आहे किंवा झोंकदार आहे म्हणून ती उडवण्याची इच्छा होणं ही काहीं चागली गोष्ट आहे, असं मी मुळींच म्हणत नाहीं. मळकट कपडे असलेल्या एखाद्या माणसासमोर एखादा स्वच्छ कपडेवाला शेखी मिरवायला गेला, तर मळकटाला राग येणं आणि त्यानं त्या परीटघडीवाल्याच्या अंगावर थोडी धूळ उडवण्याचा प्रयत्न करणं साहजिक आहे. पण आपण मळकट आहोंत म्हणून सर्व जगाचे कपडे मळकट व्हावे अशी इच्छा जर एखादा धरूं लागला, तर त्याचा तो निव्वळ दुष्टपणा होईल. एक थट्टेखोर मनुष्य समाजवादाची व्याख्या करताना असं म्हणाला होता, कीं जगातले बरेचसे लोक अनवाणी जातात आणि काही-थोडयाच्या पायात जोडे असतात, हें समाजवाद्याना बघवत नाहीं; त्याना सर्वांनींच अनवाणी जावं, असं वाटतं ? समाजवादाची व्याख्या अशी मुळींच नाहीं. त्याच्याच भाषेत सांगायचं म्हणजे त्या कांहीं थोडयांच्या पायात जोडे आहेतच. पण जगाला पुरून उरेल इतका जोडयाचा साठा त्याच्याजवळ असूनही किमती वाढवून स्वतःचा फायदा करण्याकरिता त्यानीं ते कडीकुलुपात ठेवले आहेत. आणि सर्व जगाला अनवाणी जायला ते लावीत आहेत; तीं कडीकुलुपं तोडून सर्व जगाला जोडे वाटणं म्हणजे समाजवाद ! सहज आटवली म्हणून ही गोष्ट सांगितली; पण वर सांगितलेला दुष्टपणा जग बराच वेळ दाखवतं यांत शंका नाहीं.

चित्रपटसृष्टींतला एक श्रेष्ठ कलावंत माझा स्नेही आहे. त्याचा मोटेपणा आता सर्वांनीं मान्य केला आहे. पण सुरुवाती-सुरुवातीला आपले पाय ओढा-यचा सर्वजण कसा प्रयत्न करीत होते याची हकीकत मला तो एकदा सागत होता : ‘ पण मला एका गोष्टीचं मोठं आश्चर्य वाटतं, ’ तो म्हणाला, ‘ हेच लोक आता माझा तोंड भरून ‘ उदो ’ ‘ उदो ’ करीत आहेत ! ’

'त्यांत आश्चर्य वाटायचं कांहींच कारण नाहीं,' मी म्हणालों, 'एखादा मनुष्य आपल्यापेक्षां वर जाऊं लागला कीं लोक त्याचे पाय ओढून त्याला खालीं आपल्याबरोबर आणायचा प्रयत्न करतात; पण तो फारच वर गेला कीं त्याचे पाय त्याच्या हातातून सुटतात, आणि त्याचे हात एकमेकाना लागून आपोआपच जोडले जातात!'

एखाद्यांत जर कांहीं विशेष असला तर त्या विशेषाची वाढ होण्यांतच जगाचा फायदा आहे त्या माणसाला 'कांहीं काळ वेळ न लावतां आपुल्या-सारिखा तात्काळ करण्यांत' काय हंशील? मात्र त्या विशेषवाल्यानंही एक गोष्ट कधींही विसरता कामा नये, कीं जग आहे म्हणूनच आपल्या विशेषाला कांहीं किंमत आहे. कुणींसं म्हटलं आहे, कीं सर्व जग जर तालबद्ध पावलं टाकीत असतं, तर उदयशंकरला कोण विचारणार होतं? आणि सर्वांच्याच गळ्यांतून सुरेल आवाज निघत असते तर करीमखासाहेबाना कुणी ओळखलं असतं तरी काय? म्हणूनच आपणात कांहीं विशेष असेल, तर इतरांना हिणवण्याची किंवा नम-वण्याची आपणाला इच्छा होता कामा नये, असं मला वाटतं. कुठं तरी एकदां बोलतांना मोठ्या आवेशांत येऊन मी ओरडलों, 'मला दुराचारी नकोत, त्याप्रमाणं सदाचारीही नकोत; मला आचारी हवेत!' माझं तें सुभाषित ऐकून लोक मोठमोठ्यानं हंसूं लागले. तेव्हां माझ्या ध्यानांत आलं कीं 'आचारी' म्हणजे 'स्वयंपाकी' असा अर्थ त्यांनीं घेतला! माझ्या म्हणण्याचा उद्देश इतकाच होता कीं स्वतःच्या सदाचाराचा टेंभा मिरवणारे लोक मला नकोत; आपणही 'माणूस' आहोंत हें ओळखणारे लोक मला हवेत.



## १२

## कारणाशिवाय फुलें

मला असा अजून एकही नवरा दिसलेला नाहीं, कीं ज्याच्याविरुद्ध त्याच्या बायकोची काहीं ना काहीं तरी तक्रार नाहीं. कुणाचा नवरा वेळेवर घरीं येत नाहीं, तर कुणाचा नाटक सिनेमा दाखवीत नाहीं. कुणाचा वेण्या विकत घेत नाहीं, तर कुणाचा हवे ते कपडे देत नाहीं. ' हे ' ' पहिल्या 'सारखे राहिले नाहींत ही प्रत्येकीची तक्रार ऐकून मला हंसू येतं. पहिल्यासारखे राहतील कसे ? नाहीं राहात हेंच बरोबर आहे. प्रेयसी आणि पत्नी यातला फरक हाच आहे. एखादी स्त्री ' प्रेयसी ' असते तेव्हा तिला खूश करण्याकरितां सतरा लटपटी आणि अठरा खटपटी कराव्या लागतात; पण तीच ' पत्नी ' झाल्या-वर उगाच धडपड करण्याची आवश्यकता काय ? ' प्रेयसी ' आपली आहे याबद्दल खात्री नसते; ' पत्नी ' आपली झालेली असते. धांवण्याच्या शर्यतींत एका विशिष्ट खांबाकडे जाऊन पोहोंचायचं असतं. धावणारा त्या खांबाजवळ जाऊन पोहोंचल्यावर ' का रे बाबा, आता तूं धावत कां नाहींस ? ' असें विचारण्याइतकंच ' हे ' ' पहिल्या 'सारखे राहिले नाहींत हें म्हणणं हास्यास्पद आहे !

यावरून मीं माझ्या मनाशीं आपला एक ठाम सिद्धान्त बसवून टाकला आहे, कीं चांगला नवरा आपल्या बायकोची फारशी पर्वा करीत नाहीं ! लग्न

होऊन बरेच दिवस झालेला एखादा माणूस आपल्या बायकोला खूश करायचे फाजील प्रयत्न करूं लागला, कीं मला एकदम कसंसंच वाटूं लागतं. नियमाला अपवाद होतो आहे, कांहीं तरी चुकतंय, कुठं तरी पाणी मुरतंय, असा संशय मला येऊं लागतो. आणि दुर्दैवानं एक असं उदाहरण मला दिसलं, तिथं हा संशय खरा झाला. एका गृहस्थाच्या बायकोचा शेजार-पाजारच्या सर्व बायका मनःपूर्वक हेवा करीत असत. फुलं, अत्तरं, नवे नवे कपडे तो बायकोला नेहमीं आणून द्यायचा, नेमानं फिरायला जायचा, आठवड्यातून दोन-दोन सिनेमा दाखवायचा. शेजारची प्रत्येक बाई म्हणायची, 'ते पाहा, आपल्या बायकोचं कस कौतुक करतात; — नाहीं तर आमचे 'हे'!' आम्ही सर्व आश्चर्य करीत होतों. शेवटीं, त्या गृहस्थाची बाहेर कांहीं तरी 'भानगड' होती, याचा निःसंदेह पुरावा आम्हाला मिळाला, आणि एका अमेरिकन मासिकांत कधीं तरी वाचलेलं एक वाक्य विजेसारखं माझ्या डोळ्यासमोर चमकलं: 'When a husdand brings flowers for his wife without any reason, there is a reason!' आतां माझ्या मित्राची कुणीही बायको कांहीं तक्रार करूं लागली, कीं मी तिला एकदम सांगतों; 'वहिनी, लक्षात ठेवा; नवरा कांहीं कारणाशिवाय उगाच फुलं आणूं लागला, कीं कांहीं तरी कारण असतं! तेव्हां तो आणीत नाहीं हेंच बरं आहे!'

जरा कांहीं पाहिलं, कीं त्यातून एकदम एक बडा सिद्धान्त काढायच्या माझ्या या संवयीवर गणूकाका फारच संतापतात. माझा हा नवा सिद्धान्त त्याना मीं सांगितल्याबरोबर ते उसळून म्हणाले, 'मूर्खा, असले कांहीं तरी सिद्धान्त काढून तरुण नवऱ्याच्या हातांत तूं चांगलंच कोलीत देतो आहेस. बायकोसाठीं कांहीं करूं नये आणि वर आणखी आपण कांहीं न करण्यांतच तिचा फायदा कसा आहे हें तिला सोपपत्तिक पटवून द्यावं!' बाकी गणू-काकांचं म्हणणं अगदींच चुकीचं आहे, असं मला वाटत नाहीं. एकदम सिद्धान्त काढणं जरा धोक्याचंच आहे. कॉलेजात असताना आमच्या एका बावळट मित्राला आम्ही नेहमीं सांगत असूं, कीं स्त्रियाना धाडसी पुरुष आवडतात. बरेच दिवस आमचं म्हणणं ऐकून घेतल्यानंतर त्याला एक दिवस एकदम चेव आला, आणि दोन-चार सुंदर स्त्रिया आत बसलेल्या पाहून भर

वेगात चाललेल्या एका ट्रॅममध्यें उडी मारून बसायचा त्यानं अचाट प्रयत्न केला ! स्त्रियांना आवडणं दूरच राहो, पण त्या प्रयत्नात तो इतक्या जोरानं खालीं आदळला, कीं त्याच्या डोक्याला भली थोरली खोंक पडली. वर आणखी त्या स्त्रिया फिदिफिदि हंसत होत्या, तें वेगळंच ! तात्पर्य काय, कीं सिद्धान्त जरूर काढा; पण ते अमलात आणताना जरा बेतानं वागा !



१३

## मोठ्यांचा लहानपणा

काहीं दिवसांपूर्वी कसल्याशा जुन्या आठवणी मीं लिहिल्या. त्या आठवणींचा विषय पाहता त्या आणखी खूपच छानदार रीतीनं रंगवता आल्या असत्या; पण मीं त्या तशा रंगवल्या नाहींत, असं माझ्या कांहीं मित्रांचं म्हणणं पडलं. मला त्या म्हणण्यासंबंधीं कांहींच लिहायचं नाहीं; पण त्याचा विचार करीत असतां मला दुसरी एक मजेदार गोष्ट आठवली. एक तरुण लेखक मला एकदां भेटायला आला होता. त्या वेळीं माझ्या उजव्या हाताचीं दोन बोटं कुठं तरी अपघातांत जखमी झालेलीं असल्यामुळं बांधलेलीं होतीं. हाताला काय झालं, म्हणून त्यानं विचारलं तेव्हां अमक्या ठिकाणीं माझीं बोटं चेंगरलीं म्हणून त्याला मीं सांगितलं होतं. त्या भेटीनंतर चार-सहा महिन्यांनीं बाहेरगांवच्या एका साप्ताहिकाचा अंक संपादकांनीं माझ्या नांवावर मुद्दाम पाठवलेला मला आढळला. 'मला भेटलेले आधुनिक साहित्यिक' या नांवाची त्या तरुण लेखकाची एक लेखमाला त्या साप्ताहिकांत चालू होती, आणि त्या अंकांत माझ्यासंबंधीं त्यानं लिहिलं होतं, असं मला दिसून आलं. माझ्याबद्दल फारच चांगले उद्गार त्यानं काढले होते; पण माझी स्तुति करण्याच्या भरांत एक न घडलेली गोष्ट त्यानं सांगून टाकली होती. 'मी जेव्हां म्हणालों,' त्यानं लिहिलं होतं, 'आतां बरेच दिवस तुम्हांला कांहीं लिहितां येणार नाहीं,' तेव्हां

ते आवेशानं म्हणाले कीं ' उजवा हात जायबंदी झालेला असला, तरी डाव्या हातानं लिहून मी माझ्या विरोधकांचा फडशा पाडीन ! ' मीं असं कांहींच म्हटलं नव्हतं, आणि म्हणायचं कारणही नव्हतं. त्या बिचाऱ्यानं अगदीं सद्धेतु-पूर्वक मला वीर-पुरुष बनवायचा प्रयत्न केला होता, पण वाचणाराना मात्र मी एक अचरट नाटकी माणूस आहें, असं वाटलं असेल.

आपणामध्यें ज्या अनेक ठराविक कल्पना आहेत त्यात हीही एक कल्पना आहेच. एखादा मनुष्य एखाद्या क्षेत्रात मोठा असला कीं सर्वच बाबतींत तो मोठा असतो,— सामान्य माणसातले गुणदोष त्याच्यात काहींच नसतात अशी एक आपली ठराविक कल्पना आहे; आणि या कल्पनेला बळी पडून आपण एखाद्या माणसावर अनेक प्रकारचा मोठेपणा लादीत असतों. म्हणूनच केव्हा केव्हा गमत करायचा मला अनावर मोह होतो. देशात काहीं तरी गंभीर परिस्थिति निर्माण झाली होती, आणि अखिल भारतीय कॉंग्रेस कमिटीची एक महत्त्वाची सभा मुंबईत चालू होती. माझ्या एका मित्राबरोबर मी त्या सभेला गेलों होतों. वृत्तपत्र-प्रतिनिधींची जागा पुढाऱ्याच्या बैठकीच्या अगदीं जवळ होती. आणि सर्व पुढाऱ्यांचे चेहरे आम्हाला चागले दिसत होते. देशात अत्यंत लोकप्रिय असलेले आणि आम्हा सर्वांचे एक अत्यंत आवडते पुढारी एका कोपऱ्यात अगदीं रडवा चेहरा करून बसले होते.

' देशावर आलेल्या संकटाच्या तीव्र जाणिवेनं त्याचा चेहरा किती पडला आहे, पाहा, ' माझा मित्र अगदीं कळवळून म्हणाला.

' तूं म्हणतोस तसल्या तीव्र जाणिवेनंच कशावरून ? — भयंकर अपचन किंवा बद्धकोष्ट झाल्यामुळं त्याचा चेहरा कशावरून पडलेला दिसत नसेल ! ' मी शातपणं म्हणालों.

माझा गंभीर प्रकृतीचा मित्र माझ्यावर अतिशय संतापला. ' सदासर्वदा उल्लूपणा करणं चागलं नव्हे ! ' तो चिडून म्हणाला.

'थट्टा करायचा माझा मुळींच उद्देश नाहीं, ' मी म्हणालों, ' खरोखरच मी तुला विचारतों, तूं म्हणतोस नक्की त्याच कारणानं त्यांचा चेहरा पडला असेल याला आधार काय ? — आणि एखाद्या माणसाला अपचन होणं,

आणि त्यामुळं त्याचा चेहरा पडणं यांत कमीपणा काय आहे ? तो पुढारी झाला तरी माणूसच आहे ना ? '

एखादा मनुष्य मोठा असला कीं तो सर्व दृष्टींनीं मोठा असतो हें मला मुळींच मान्य नाहीं. मी तर उलट म्हणतों कीं मोठ्या माणसांत सामान्य माणसांत आढळणारे सर्व लहानपणाचे प्रकार असतात; इतकंच नव्हे, तर ते फार मोठ्या प्रमाणांत असतात. किंबहुना एवढ्या मोठ्या लहानपणाला संभाळून तो इतरापेक्षा काहीं तरी मोठेपणा दाखवतो म्हणूनच तो मोठा ! मला नीटसं आठवत नाहीं, पण मला वाटतं टॉल्स्टॉयनंच कुठं तरी आपली एक आठवण सांगितली आहे. आपल्या आईवर टॉल्स्टॉयचं अतिशय प्रेम होतं. तिच्या मृत्युसमयींचं तो वर्णन देतो आहे. त्या वेळीं तो तरुण होता. तिचा प्राण गेला होता. सर्व मंडळी आजूबाजूला ओक्साबोक्शीं रडत होती. टॉल्स्टॉयला रडूंच येईना. त्याला भयंकर भूक लागली होती, आणि कांहीं तरी खावंसं वाटत होतं. त्याची त्यालाच लाज वाटूं लागली. दोन-तीन दिवसांनीं सर्व मंडळी शांत झाली, आणि आपापल्या कामधंद्याला लागून हंसूं-खेळूं लागली. पण जसजसे दिवस जाऊं लागले, तसतसं आईशिवाय टॉल्स्टॉयला ओकंओकं वाटूं लागलं, आणि त्याला हुंदके आवरेनात.

टॉल्स्टॉयसारख्या महात्म्याला आपली आई मरून पडली असता कांहीं तरी खावंसं वाटत होतं, यावर सामान्य माणसाचा विश्वासही बसणार नाहीं. टॉल्स्टॉनंच सांगून टाकलं म्हणून बरं. हीच गोष्ट आम्हीं कुणीं सांगितली असती, तर आम्ही उल्लू ठरलों असतों !

● ● ●

## १४

### म्हटल्यास कीं केल्यास —

परवां एका स्नेह्याबरोबर वादविवाद करीत असता चित्रपटांत दृश्याला किंवा चित्राला अधिक महत्त्व आहे, आणि नाटकांत श्राव्याला किंवा शब्दाला अधिक महत्त्व आहे, असं मी म्हणालों. त्याबरोबर चित्रपटांत शब्दाला महत्त्व नाहींच वाटतं, असं एकदम त्यानं उलटून विचारलं; आणि चित्रपटातही शब्दाला महत्त्व आहे, हें तो मला पटवून देऊं लागला. चित्रपटांत शब्द नाहीं कसा, तो मला विचारूं लागला. मी पुन्हा पुन्हा सांगत होतों कीं चित्रपटात दृश्य आणि श्राव्य हे दोन्ही भाग आहेत आणि नाटकांतही हे दोन भाग आहेतच; आणि नाटकांत दुसऱ्याला महत्त्व अधिक आहे. नाटकांत शब्दच असतात आणि दृश्य नसतं, आणि चित्रपटांत दृश्यच असतं आणि शब्द नसतात, असं माझं मुळींच म्हणणं नव्हतं पण तो कांहीं ऐकूनच घ्यायला तयार नव्हता. चित्रपटांत शब्दाला महत्त्व असतं, हें तो जीव तोडून मला पुनः पुनः सांगत होता. नाटक न पाहतां नुसतं पुस्तक वाचून एक कलाकृति म्हणून त्याचा आपण रसास्वाद घेऊं शकतों, किंवा रेडिओ-नाटकासारखं अजिबात दृश्य नसलेलंही एखादं नाटक होऊं शकतं, त्याचप्रमाणं शब्दांचा कांहींच संबंध नसलेले अनेक उत्कृष्ट चित्रपट होऊन गेले आहेत. आणि कलाकृतीचा पूर्ण आनंद त्यांनीं पाहणारांना दिला आहे; पण शब्दाशिवाय

नाटक किंवा दृश्याशिवाय चित्रपट या गोष्टीच शक्य नाहींत वगैरे वगैरे युक्तिवाद आम्ही सांगत होतों. पण आमचं काहीं चालेना. आमच्या मित्राला आमचं म्हणणं खरोखरच समजत नव्हतं, कीं मुद्दाम वितंडवादाकरिता तो तसं करीत होता, हा महत्त्वाचा प्रश्न नाहीं. आपण सर्वच पुष्कळ वेळा अशा एकेरी दृष्टिकोनानं जगाकडे पाहात असतों, आणि एकेरीवर येत असतों.

केव्हा केव्हा या एकेरी दृष्टीमुळं आपण किती हास्यास्पद होतों, याची आपणाला कल्पनाही येत नाहीं. एखादा माणूस चांगला असला, कीं आपण त्याच्याकडून इतक्या चांगलेपणाची अपेक्षा करतों की तो माणूस आहे हेंही आपण विसरतों. अत्यंत सात्त्विक वृत्तीचे असे आमचे एक हेडमास्तर होते. आम्हाला सर्वांना त्यांच्याविषयीं निरतिशय आदर वाटे. ते अविवाहित होते. काहीं दिवसांनीं त्यांनीं विवाह केला. पुढं एक दोन वर्षांनीं शाळा सोडून आम्ही कॉलेजांत गेलों. आमच्या बरोबरीचाच आमचा एक मित्र त्याच शाळेंत मास्तर होता. तोही अतिशय सात्त्विक वृत्तीचा होता. कुणाविषयीं कधीं वाईट बोलायचा नाहीं, आणि दुसरा कुणी कुणाबद्दल वाईट बोलत असेल तर आपले कान झांकून घ्यायचा. वर्ष सहा महिन्यांनीं आम्हाला तो भेटला, तेव्हा आम्हीं त्याला सहज विचारलं, ‘ का रे, हेडमास्तरांना काहीं मूलबील झालंय का ? ’ आमचा प्रश्न ऐकून त्याला धक्काच बसला, आणि तो एकदम उद्गारला, ‘ छे, छे; आपले हेडमास्तर ‘ तशा ’पैकीं नाहींत ! ’ त्याचं तें उत्तर ऐकून पहिल्यांदा आम्ही स्तिमित झालों, आणि नंतर पोट धरधरून हंसूं लागलों. त्या बिचाऱ्याची कल्पना अशी कीं आपला एवढा सालस, सात्त्विक, साळसूद हेडमास्तर स्वतः-ची बायको झाली म्हणून काय झालं, पण एका स्त्रीशीं अशी भलतीच सलगी कशी करील ! एकेरी दृष्टिकोनाचा हा परमोच्च बिंदु होय. हेडमास्तर हा माणूसच आहे; तो खातो, पितो, झोंपतो,— तें काहीं नाहीं. हेडमास्तर म्हणजे हेडमास्तर. आणि त्याचं सर्व जीवन म्हणजे हेडमास्तरकी !

हें झालं एक आत्यंतिक उदाहरण. पण आपण नेहमींच असं कांहीं ना कांहीं तरी करीत असतों. एखाद्या सुशिक्षित स्त्रीनं एखाद्या अशिक्षित माणसाशीं लग्न केलं, किंवा एखाद्या कलावंतानं एखाद्या सामान्य स्त्रीशीं विवाह केला, कीं आम्ही सर्व आश्चर्यसागरांत बुडून जातों, आणि एकमेकांना विचारूं लागतों,

' त्याच्यांत तिनं काय पाहिलं ? किंवा तिच्यात त्यानं काय पाहिलं ? ' असा प्रश्न अलीकडे कुणीं विचारला कीं, मी ताबडतोब उत्तर देतों, ' त्याच्यांत किंवा तिच्यांत तुम्हीं आम्हीं जें पाहिलं नाहीं, नक्की तेंच त्यांनीं पाहिलं ! ' जग हें नुसतं त्रिविध नव्हे, तर विविध आहे, हें आम्ही क्षणोक्षणीं विसरतों.

एखादा तत्त्वज्ञ आजूबाजूला पाहून जेव्हा म्हणत असतो, कीं ' म्हटल्यास असं आहे, आणि म्हटल्यास असं नाहीं, ' तेव्हा तो अगदीं खरं बोलत असतो. कारण जग खरोखरच तसं आहे. म्हटल्यास उजेड आहे, म्हटल्यास अंधार आहे. हिंदुस्थानात उजेड आहे तर अमेरिकेंत काळोख आहे; आणि अमेरिकेंत उजेड आहे तर हिंदुस्थानात काळोख आहे ! यावर कुणीही असा प्रश्न विचारील कीं हें जर खरं आहे, तर ' म्हटल्यास आहे नि म्हटल्यास नाहीं, ' असं म्हणणारा माणूस थट्टेचा किंवा उपहासाचा विषय कां होतो ? हा प्रश्न अगदीं बरोबर आहे. तो माणूस उपहासाचा विषय होतो, त्याचं कारण हें तत्त्वज्ञान चूक आहे, असं नव्हे. ' म्हटल्यास आहे, म्हटल्यास नाहीं ' करीत एखादा माणूस जेव्हां कांहींच करीत नाहीं, तेव्हा लोक त्याची थट्टा करतात. जगाच्या सर्व बाजू पाहणं म्हणजे कोणत्याच बाजूनं कांहीं न करणं नव्हे. एखाद्या प्रश्नाच्या सर्व बाजू पाहिल्यानंतर योग्य बाजू निवडून ताबडतोब कृति केली पाहिजे. मला अमुक एक गोष्ट उजेडांत करायची आहे, आणि जगात उजेडही आहे आणि अंधारही आहे, तेव्हा मी कांहींच करीत नाहीं, असं म्हणणारा उपहासास्पद होतो. आणि याचंही कारण पुन्हा एकेरीपणाच. विचार व कृति यांचा योग्य मेळ म्हणजे यशस्वी जीवन. हा माणूस सर्व बाजूंचा विचार करतो; पण विचार व कृति या जीवनाच्या दोन बाजूंपैकीं फक्त विचाराचीच एक बाजू संभाळल्यामुळं तो उपहासास्पद ठरतो ! म्हणजेच "म्हटल्यास नाहीं नि म्हटल्यास आहे, ' हें सर्व ठीक आहे; पण तें केव्हां ? हें सर्व ' म्हटल्यास ' झाल्यावर कांहीं तरी केल्यास !



## १५

## मोठीं विशेषणें — धोका !

मुंबईत अलीकडे एकसारखे होणारे जातीय दंगे कसे थाबवावे यासंबंधीं अनेक लोक अनेक प्रकारचे उपाय सुचवीत असतात. एकदां कुणींसं सुचवलं कीं, ज्यांना स्वतःच्या प्राणांची मुळींच पर्वा नाहीं, अशा निवडक लोकाचं एक स्वयंसेवक दल काढावं, आणि जिथं जिथं दंगा होईल तिथं तिथं एकमेकाना भोंकसणाऱ्या दोन जातींच्या लोकांमध्यें जाऊन या स्वयंसेवकांनीं दंगा थांबवण्याचे आणि लोकांचे प्राण वांचवण्याचे प्रयत्न करावे. ही कल्पना माझ्या एका मित्राला मीं सांगूं लागलों, तेव्हा त्यानं चटकन् विचारलं, 'हें स्वयंसेवक दल कशाला काढायचं ? लोकांचे प्राण वांचवण्याकरिता ना ?'

मी म्हणालों, 'होय.'

तेव्हा तो निक्षून म्हणाला, 'हे लोक मुळींच दुसऱ्यांचे प्राण वाचवूं शकणार नाहींत.'

मीं म्हटलं, 'कां ?'

'स्वतःच्या प्राणाची ज्यांना पर्वा नाहीं ते दुसऱ्यांचे प्राण काय वांचवणार ? प्राण वांचवणाराला आधीं पाणांची किंमत कळली पाहिजे ! स्वतःचा कां होईना, पण प्राण हा पदार्थ ज्यांना इतका कःपदार्थ वाटतो, ते दुसऱ्याचे प्राण वांचवण्याची खटपट तरी कितीशी मनःपूर्वक करणार ?'

त्याच्या उत्तरानं पहिल्यांदा मीं थोडासा गोंधळलों. जिवावर उदार झालेल्या शूराना इतरांचं संरक्षण करावयास तो नालायक ठरवीत होता, हें मला कसंसंच वाटलं. पण थोडासा खोल विचार करतां त्याच्या म्हणण्यात मला पुष्कळच तथ्य वाटूं लागलं. पहिल्याच धडाक्याला आपले डोळे दिपवून टाकणाऱ्या जगातल्या अनेक गोष्टींचा आपण जेव्हां शांतपणं विचार करतों. तेव्हां त्यापैकीं बहुतेक नुसत्या निरुपयोगीच नव्हे, तर अपायकारकही आहेत असं आपणाला आढळून येतं. जिवावर उदार होणं हा शब्दप्रयोग ऐकल्याबरोबर आपलं अंतःकरण थरारून जातं. पण माझ्या उपरोक्त मित्रासारख्या एखाद्या वास्तववाद्यानं कान धरून आपणाला ताळ्यावर आणलं, कीं वस्तुस्थितीची आपणाला योग्य जाणीव होते. स्वतःच्या प्राणाची पर्वा न करणारा दुसऱ्याचे प्राण वाचवणं दूरच राहूं द्या, पण एखादे वेळीं दुसऱ्याचे प्राण निःशंकपणं घेईलही; कारण त्याला प्राणाचं कांहींच वाटत नाहीं.

असामान्य बुद्धिमत्ता या शब्दानीं मी असाच एके काळीं दिपून जात असें. पण शाळेंत असतानाच नको ती असामान्य बुद्धिमत्ता,— सामान्यच पत्करली असें म्हणायचा प्रसंग माझ्यावर आला ! गणित शिकवण्याकरिता एकदां एक नवीन मास्तर आमच्या शाळेंत आले. एक असामान्य बुद्धिमत्तेचा गणिती म्हणून आम्हीं त्याची ख्याति ऐकली होती, आणि त्याच्या हाताखालीं आम्हांला शिकायला मिळणार म्हणून आम्हीं खुशींत होतों. ते मास्तर वर्गावर आले. गणितातले किचकट कूट प्रश्न, भूमितींतलीं कठीण प्रमेयं एकामागून एक भराभर फळ्यावर सोडवून दाखवीत ते पुढं जाऊं लागले. आमच्यापैकीं कुणीं कांहीं शंका विचारली, तर ‘ एवढी साधी गोष्ट तुम्हांला कळत नाहीं ? ’ म्हणून आमच्याच अंगावर ते खेकसूं लागले ! बरोबरच आहे. त्यांच्या असामान्य बुद्धिमत्तेला आमच्या अडचणी अगदींच साध्या वाटत होत्या. इतक्या साध्या गोष्टी समजूं न शकणारीं माणसं जगांत असतील याची त्या बिचाऱ्याना कल्पनाच नव्हती. त्यापेक्षां आमचे पूर्वीचे सामान्य बुद्धिमत्तेचे मास्तर आम्हांला बरे वाटूं लागले. सर्वसामान्य माणसांना काय अडचणी येतात याची त्याना स्वतःच्या अनुभवावरून पूर्ण कल्पना होती; आणि आम्हाला आलेली कुठलीही शंका ते पुनः पुनः मोठ्या समजूतदारपणं आम्हांला समजावून देत.

उदार या शब्दाची मला अलीकडे अशीच भीति वाटूं लागली आहे. अमका अमका आपल्या इष्टमित्रांवर वाटेल तसे पैसे उधळतो, असं कुठं ऐकलं कीं पूर्वी मला कौतुक वाटे. आता भीति वाटते. असे बरेचसे उदार लोक मीं पाहिले आहेत, आणि ब्ऱ्याच जणांचा अनुभवही घेतला आहे. स्वतःच्या पैशाची पर्वा न करणाऱ्याला दुसऱ्यांच्या पैशांचीही मुळींच कदर वाटत नाहीं. स्वतःचे पैसे बेफिकीरपणं उडवणारा दुसऱ्यांचे पैसे तितक्याच किंबहुना अधिक बेफिकीरपणं उडवतो किंवा थोडक्यात बोलायचं म्हणजे दुसऱ्याला बुडवतो. तो ज्यांच्यावर उडवतो ते अ आणि ब त्याला उदार-महोदार म्हणून त्याच्याभोंवतीं पिंगा घालीत असतात; पण ज्यांचे पैसे तो उडवीत असतो, म्हणजे ज्याना तो बुडवीत असतो ते क, ख, ग, घ, ङ त्याच्या नांवानं शंख करीत असतात! म्हणूनच, अमका अमका माणूस स्वतःचे पैसे कुणाकडून येणं असले तरी कधीं मागत नाहीं असं कुणी मला कौतुकानं सांगूं लागला कीं मी तावडतोब उत्तर देतों, 'बरोबरच आहे. कुणाचं देणं असलेले त्याला कधींच द्यायचे नसतात; तो स्वतः-चे पैसे मागेल कशाला?'

स्वतःचे पैसे रोखठोक मागणारा बहुधा दुसऱ्याचे पैसे रोखठोक देऊन टाकीत असतो. औदार्याचं सोंग आणून स्वतःचे पैसे न मागणाऱ्यानं बहुधा आपलं औदार्याचं भांडवल व्याजीं लावलेलं असतं, आणि त्याची सव्याज परतफेड होईल, अशी तो अपेक्षा करीत असतो. एका कंपनीच्या दोन भागी-दारांची मला माहिती आहे. त्यांपैकीं एक मोठा हिशेबी वृत्तीचा आणि दुसरा मोठा सढळ हाताचा म्हणून प्रसिद्ध होता. नोकर-चाकरांना तो सढळ हातानं बक्षीस द्यायचा; दुसरा जपून ठराविक वेळींच बक्षीस द्यायचा. पहिल्यावर नोकर-चाकर बेहद्द खूश होते; दुसऱ्याला ते कंजूष म्हणत. पुढं धंदा बसला, आणि कंपनी बंद व्हायची वेळ आली. तुंबलेले पगार मागण्याकरितां नोकर आले तेव्हां तो उदारहृदयी भागीदार सात्त्विक संतापानं त्यांच्या अंगावर ओरडला, 'इतके माझे पैसे खाल्लेत,— आतां पगारासाठीं धरणं धरून बसतां— लाज नाहीं वाटत?' दुसरा भागीदार शांतपणं उठून घरीं गेला, आणि बायकोचे दागिने विकून त्यानं नोकरांचे पगार चुकते केले.

स्वार्थत्याग करायचा असला, तरी त्याग करायला कां होईना, पण स्वार्थ

पाहिजेच ना ? नाहीं तर त्याग होतो एकाचा आणि अर्थ जातो दुसऱ्याचा ! एखादा चोर, खिसेकापू जवळ असला कीं जशी धोक्याची सूचना देतात, त्याचप्रमाणें असल्या उदार माणसांविषयीं मी माझ्या मित्रांना नेहमीं सांगतों, ' संभाळा हं — तो उदार आहे ! '



## १६

## मनाचे पिंजरे —

या पावसाळ्याच्या सुरुवातीला मीं दोन रुपयाना एक छत्री विकत घेतली. हो हो, दोन रुपयांना छत्री. साध्या छत्र्यांचीही किंमत या दिवसात दहा-बारा रुपये आहे,— फार काय, जुन्या बाजारातदेखील पांच-सहा रुपयाखालीं छत्री मिळत नाहीं, आणि दोन रुपयांत मला छत्री मिळाली तरी कशी याचं पुष्कळांना आश्चर्य वाटेल. इतराची गोष्ट कशाला ? जुन्या बाजारातल्या त्या दुकानदारालाही मीं ती छत्री निवडली तेव्हा आश्चर्य वाटलं. आधीं एक गोष्ट स्पष्टच सांगून टाकलेली बरी. पावसाळ्यांत छत्री वापरण्याच्या मी विरुद्ध आहें. पण शेवटीं छत्री घ्यायचीच असं ठरवलं, तेव्हां जुन्या बाजारांत गेलों आणि अगदीं कमींत कमी किमतीची छत्री मला दाखव म्हणून त्या दुकानदाराला सांगितलं. पांच-सहा रुपये किमतीच्या दोन-चार चांगल्या छत्र्या त्यानं दाखवल्या. त्यांपैकीं एक मी घेणार होतों; इतक्यांत कोपऱ्यांतल्या एका छत्रीकडे माझं लक्ष गेलं.

‘ त्या छत्रीची किंमत काय ! ’ मीं विचारलं.

‘ दोन रुपये, साहेब. ’ तो म्हणाला, ‘ पण ती घेऊं नका तुम्ही. सबंध पाणी अंगावर येईल बघा. ’

‘ पण तें कोंपऱ्यांत जें कांहीं आहे ती छत्री आहे ना ? आणि उघडून दोन-चार दिवस डोक्यावर धरतां येईल ना ? ’

‘ हो, ’ तो म्हणाला, ‘ पण साहेब — ’

